
नमो भगवते वासुदेवाय

अभिनव साहित्यमाला—ग्रंथ ४ ला......)

ॐ

नमो भगवते वासुदेवाय

# गीतरचनान्तर

किंवा

## श्रीमद्भगवद्गीतेचा रचनान्तररूप अभ्यास

( तज्ज्ञांच्या पूर्वविचाराकरतां )

ले:—भारद्वाज

मूल्य रु. २ [ सन १९३३

हरिः ॐ तत्सत्

ज्या सर्वसत्ताधारी जगन्नियंत्याच्या इच्छेशिवाय या दृश्य विश्वांत झाडाचें

पान देखील हलत नाहीं व ज्यानेंच प्रस्तुत कृतीची

प्रेरणा देऊन ती घडवून आणली त्या मूर्तरूप

**जनताजनार्दनाच्या चरणारविंदीं**

ही कृति अत्यंत नम्रपणें

अर्पण असो.

# अनुक्रमणिका

# शुद्धिपत्र

| पान | ओळ | अशुद्ध | शुद्ध |
|---|---|---|---|
| ३ | १ | वस्तू प्रमाण | वस्तूंच्या प्रमाणें |
| ८ | २९ | पठण | पठन |
| १० | ८ | श्रीभगवान् | श्रीकृष्णभगवान् |
| १० | १० | विभातिमत्व | विभूतिमत्व |
| ११ | १३ | ठऊन | ठेवून |
| १५ | ३ | अष्टमोध्याय: | अष्टमोऽध्याय: |
| १५ | १३ | ते हंस० | तेऽहंस० |
| १६ | १३ | पिचलेल्या | पिसलेल्या |
| १९ | १५ | अन्य विभूतिश्रेणींत | मुख्यविभूतिमालेंत |
| २० | ९ | असल्याच | असल्याचें |
| २८ | १७ | फार एकांगी | फारतर एकांगी |
| २९ | ६ | वर्णाश्रम | वर्णाश्रमधर्म |
| ३३ | ३ | असन | असून |
| ,, | १३ | जीवरूपी अपरा | जीवरूपी परा |
| ,, | १४ | देहरूपी परा | देहरूपी अपरा |
| ,, | १६ | जीवरूपी अपरा | जीवरूपी परा |
| ,, | १७ | ,, | ,, |
| ४३ | ९ | अविर्भाव | आविर्भाव |
| ४३ | २६ | १३-३० | ३-३० |
| ५४ | ५ | स्त्रियाची | स्त्रियांची |
| ५४ | २३ ब | रचनांतरित | रचनांतरीकृत |
| अन्यत्र्य संकल्पांत | | | |
| ५५ | ९ | उच्च वातावरणांतील | उच्च नैतिक वातावरणांतील |
| ५७ | ५ | हत्वार्थकामास्तु | हत्वार्थकामांस्तु |
| ६८ | २५ | अन्तकालीं तुला | अन्तकालीं ईश्वराला |
| ७२ | २५ | या पदातील | या वचनांतील |
| ७४ | ७ | ज्ञानद्वारां आराधन | ज्ञानद्वारां आकलन |
| ८२ | ८ | लय एकच | लय या एकाच |

| पान | ओळ | अशुद्ध | शुद्ध |
|---|---|---|---|
| ८२ | १४ | टकणारा | टाकणारा |
| ८४ | २० | कल्पनचा | कल्पनेचा |
| ८५ | २ | ११–१२ | १५–१२ |
| ,, | ४ | ११–१३ | १५–१३ |
| ८६ | १० | सर्वस्यचाह | सर्वस्य चाहं |
| १८६ | ११ | ११-१५ | १५-१५ |
| ८७ | १४ | पाहू | पाहूं |
| ९० | १८ | वृद्धी | वृद्धि |
| ९२ | २३ | नैशनै० | शनैशनै [illegible] |
| ,, | २६ | र्व | सर्व |
| १११ | ५ | महर्षि, मनु | महर्षी. मन |
| ११ | २० | तेषा | तेषां |
| ११५ | २ | २०-२२-३ | १०-२२-४ |
| ,, | १३ | १९-२७-१ | १०-२७-१ |
| ,, | १५ | १९-२८-४ | १०-२८-४ |
| ,, | २९ | पितृणामहम् | पितॄणामहम् |
| ११७ | २ | १०-३०-४ | १०-३२-४ |
| ११७ | ७ | ,, | १०-३६-२ |
| ११८ | ५ | नीति | नीति १ |
| १२१ | ८ | माह | मोह |
| १२३ | ८ | विश्वरूपम् | विश्वरूप |
| १२५ | १९ | जिभल्या | जिभाळ्या |
| १३७ | २१ | एकाकी | एकांगी |
| १३९ | ५ | ७-५१ | ७-२५ |
| १३९ | १० | ७-२५ | ७-२६ |
| १४० | २० | त्याची | त्यांची |
| १४२ | ७ | निसंगपणें | निःसंगपणें |
| १४२ | १२ | सर्वभूताना | सर्वभूतानां |
| १५३ | ९ | बपरीतांश्च | विपरीतांश्च |
| १५७ | २४ | मनोरथ | मनोरथम् |

| पान | ओळ | अशुद्ध | शुद्ध |
|---|---|---|---|
| १६१ | १७ | त्यांना | ज्ञात्यांना |
| १६२ | ८ | कम | कर्म |
| १६३ | १४ | त्याचें | त्यांचें |
| १६४ | २० | आंगवळणी न पडलेल्याँ | अंगवळणीं पडलेल्या |
| १६५ | ९ | त्यांच्याजवळ | त्यांच्या केवळ |
| १६७ | ८ | ज्ञानाचें | ज्ञान्याचें |
| १६८ | २५ | ज्ञानानें | ज्ञान्यानें |
| १६९ | ११ | कमयोगो | कर्मयोगो |
| १७८ | २३ | करीत आहे | करीत आहेत. |
| १८० | १९ | संन्याशी | संन्यासी |
| १८० | २२ | गातत | गीतेंत |
| ,, | २३ | अस | असें |
| १८३ | २३ | कर्मफलप्राप्तिहि | कर्मफलप्राप्ति ही |
| १८४ | ५ | स्वतः सर्व कर्त्या० | स्वतः कर्त्यानें |
| १८५ | १० | क्राध | क्रोध |
| १८६ | १७ | वर्णाश्रमविहितप्रकृति-धर्मा० | स्वप्रकृतिधर्मानुसार वर्णा-श्रमवि० |
| १८७ | ४ | भावानुरूप कर्माचा स्वीकार | स्वभावानुरूप कर्माचा कर |
| १८९ | १२ | ज्ञानकर्म | दानकर्म |
| ,, | २१ | सत्त्वशीलकर्माच्या | सत्त्वशीलपुरुषकर्माच्या |
| १९० | २ | विशेषपणें | निःशेषपणें |
| ,, | १८ | कृषिगोरक्ष | कृषिगौरक्ष्य |
| १९१ | ३ | कर्मभमि | कर्मभूमि |
| ,, | २१ | बळ | वेळ |
| १९२ | ६ | व्यक्ती या सर्व | सर्व व्यक्ती या |
| ,, | ७ | नियंतत्त्व | नियंतृत्व |
| १९७ | २० | ती तिच्याच | तो त्याच्याच |
| २०४ | १७ | युद्धस्व | युध्यस्व |

# प्रस्तावना

पुराणमित्येव न साधु सर्वं न चापि काव्यं नवमित्यवद्यम् ।
भवेद्धि किंचित्सुविचारणीयं पुराणदृष्टं नवशास्त्रसिद्धम् ॥

श्रीमद्भगवद्गीतेच्या रचनांतराचा प्रस्तुत ग्रंथ वाचकांच्या हातीं देतांना त्याचा लेखक फारच कचरत आहे. कारण, एक तर, गीताग्रंथ हा जसा पुराण तसाच पवित्र, जितका तत्त्वबोधक तितकाच व्यवहारप्रेरक. नीति व धर्म यांना आधार, आणि आर्यावर्तांतच काय पण अखिल भूपृष्ठावरहि सर्वमान्य झालेला, थोडक्यांत तो एक दिव्य ग्रंथ होय; आणि दुसरें म्हणजे त्याच्या प्रस्तुत रचनेच्या ऐवजीं अन्य रचना सुचविणारा त्याचा लेखक अगदीं नवाशिक्या, वाङ्मय, काव्य, नीति, धर्म, तत्त्व, वगैरे कोणत्याहि विषयांत प्रावीण्यपद न मिळालेला व मराठी वाचकांना सर्वतोपरी अपरिचित असा आहे. लेखनविषय व लेखक यांचा हा संयोग सकृद्दर्शनींच विषम स्वरूपाचा होय आणि रचनांतराच्या उच्छृंखल कृतीनें ही विषमता तर भीषणहि वाटण्याचा संभव आहे. अशा स्थितींत, प्रस्तुत लेखक हें धाष्टर्य कां करीत असावा हें वाचकांना कोडें पडल्यास त्यांत कांहीं नवल नाहीं. मतस्वातंत्र्याचा व लेखनस्वातंत्र्याचा हा केवळ दुरुपयोग होय, असेंहि त्यांना वाटणें अशक्य नाहीं.

या सर्व आक्षेपांबाबत प्रस्तुत लेखकाची सर्व वाचकांना एक अगदीं थोडी कैफियत व एक अत्यंत नम्र विनंति आहे. कैफियत ही कीं. प्रस्तुत प्रयत्न प्रस्तुत लेखकाकडून श्रीमद्भगवद्गीतेची केवळ यथामति सेवाच करण्याच्या शुद्ध हेतूनें केला जात आहे. लेखन हा या लेखकाचा चरितार्थाचा धंदा नव्हे, तर तो केवळ एक करमणुकीच्या व्यासंगाचा भाग होय आणि त्या क्रमांत गीतेचें निरीक्षण, अभ्यास व त्यावर विचार वगैरे मानसिक क्रिया कांहीं कालापासून होत राहिल्यामुळें जी एक विचाराची मूस बनून राहिली ती गीतेच्या सेवारूपाचीच आहे अशी त्याची खात्री झाल्यामुळें हा प्रयत्न त्याजकडून झाला आहे. ही कैफियत झाली. हिच्या जोडीस वाचकांस नम्र विनंति एवढीच कीं, त्यांनीं प्रस्तुत पुस्तकाबद्दल आपलें निश्चित मत बनविण्यापूर्वी प्रस्तुत पुस्तक एकदां अथपासून इतिपर्यंत वाचून—

ते सविकार मनानें होवो की निर्विकार मनानें होवो,—पुरें करावें, आणि त्यानंतर हें पुस्तक त्याज्य अगर ग्राह्य जसें ठरेल तसेंच अर्थात्च त्याला त्याचें स्थान द्यावें. विशेषतः लेखन व लेखक यांचा एकत्र विचार त्यांनीं यथाशक्य करूं नये. किंबहुना वाचक या पुस्तकाच्या लेखकाकडे जितकी थोडी दृष्टि देतील तितकें बरें. याप्रमाणें प्रस्तावनेचा हा कांहींसा असामान्य भाग संपवून नंतर तींत येणाऱ्या सामान्य मुद्याकडे वळूं.

भगवद्गीतेच्या रचनांतराच्या कल्पनेचा व्यक्तिगत इतिहास बराच जुना आहे. लोकमान्य टिळकांनीं लिहिलेलें गीतारहस्य १९२३ सालीं वाचीत असतां निरनिराळ्या विषयांवरील श्लोकांचें स्थानांतर होईल तर बरें असें वाटलें होतें व तशा तऱ्हेचे लहानसहान प्रयत्न मधूनमधून करमणुकी-करतां केले जात असत. १९३१च्या चातुर्मास्यांत लक्ष विशेषेंकरून याच विषयाकडे लागलें व भगवद्गीतेची उपलब्ध नसलेली विषयसूचि तयार करून, तिच्या साहाय्यानें प्रत्येक विषयावरील श्लोकांची सुसंबद्ध रचना तयार करून, त्याप्रकारें प्रत्येक विषयावर एक एक गीताश्लोकमय निबंध तयार करणें व या सर्व विषयांवरील निबंधांना एकसूत्रीपणा आणून त्यांच्यामुळें गीतेंतील प्रतिपाद्य विषयांची सुयुक्त व ऐक्यपूर्ण रचना तयार करणें हें शक्य कोटींतील असावें असें वाटूं लागलें. अर्थात्च या दृष्टीनें प्रयत्न करतांकरतां 'भगवद्गीतेचें पृथक्करण व तदनुसार रचनांतर' अशा प्रकारचा ग्रंथ तयार होण्यास सुरुवात झाली. तथापि, पृथक्करणाचा मुख्य हेतु रचनान्तर हा होता आणि केलेलें रचनांतर समाधानकारक वाटल्यास त्याची केवळ पूर्वतयारी म्हणून त्याला पृथक्करण जोडलें जावें असें मनानें घेतलें व मग त्या दिशेनें प्रयत्नहि सुरू झाले. अखेरीस प्रत्येक अध्यायाचें रचनांतर पुरें होऊन गीतेंतील अधिभौतिक, दृश्य जगाच्या अध्यात्मिक, अधिदैविक व अधिभौतिक या त्रिसंयुक्त घटनेनुसार ज्ञान, भक्ति व कर्म यांना वाहिलेल्या अध्यायांची मानसपृथक्करणशास्त्रां-तील आविर्भावा( Projection )च्या कल्पनेनुसार नवयोजना करण्यांत आली व रचनांतराची ही स्थूल पद्धति कां स्वीकारली गेली हें स्पष्ट करण्याकरतां या रचनांतराला 'रचनांतराचें कारण' व 'रचनांतराचें धोरण' हीं दोन स्पष्टीकरणात्मक प्रकरणेंहि जोडण्यांत आलीं. याप्रकारें रचनांतर केलेला हस्त-लिखित ग्रंथ फारच थोड्या मित्रांनीं पाहिला आहे. तथापि, रचनांतराची जरूरी

प्रस्थापित करणारी विवादप्रणालिका व संभाव्य नवरचनेची स्थूल रूपरेषा बऱ्याच तज्ज्ञ मित्रांनीं पाहिली आहे व ती त्यांना पटत आहे, असें दिसून आल्यानंतर, केवळ पूर्वविचाराकरतां प्रसिद्ध केलेलें हें प्रस्तुत रचनांतर तज्ज्ञांस संमत वाटल्यास त्यांस अगर, जरूर तर, सहृदय तज्ज्ञांची या रचनांतरावर जी टीका येईल, अगर हें रचनांतर सुधारण्याच्या ज्या सूचना येतील त्यांचा योग्य उपयोग करून जें यथाशक्य बहुसंमत रचनांतर होईल, त्यासच 'श्रीमद्-भगवद्गीतेचें पृथक्करण व रचनांतर' या संकल्पित ग्रंथांत स्थान द्यावें या बुद्धीनें हें अग्रगामी प्रसिद्धीकरण करण्यांत येत आहे.

प्रस्तुत रचनांतरांत अनेक प्रकारांच्या फेरफारांचा समावेश होतो ही गोष्ट लपवून ठेवूनहि न लपण्यासारखी आहे. फक्त संहितेचे ७०० श्लोक व १८ अध्याय हीं प्रचलित गीतेची बाह्यांगें कायम आहेत. अध्यायांच्या योगांचीं नामाभिधानें अर्वाचीन व पाठभेदांनीं युक्त आहेत, असें दिसून आल्यानंतर त्यांमध्येंहि कांहीं थोडे नवीन पाठभेद घातले आहेत. अध्यायांचीं स्थानांतरेंहि बरींच झालेलीं आहेत व प्रत्येक अध्यायांतील श्लोकसंग्रह अध्यायनामाच्या स्वरूपास साजेल असा अगर पूर्वयोजनेप्रमाणें गीतेंतील सामग्री वापरून अध्यायांतील विषयावर एक, यथाशक्य पूर्ण निबंध होईल असा अनेक अध्यायांतून निवडून घेतलेला आहे. श्लोकांचें वैयक्तिक स्वरूप यथाशक्य अबाधित आहे, परंतु क्वचित् कांहीं स्थलीं चरणान्तरहि इष्ट वाटल्यावरून केलेलें आहे. हा प्रकार विभूतियोगावरील अध्यायांत विशेषेंकरून दृग्गोचर होईल. श्लोकांतील मूळ शब्दरचनेंत पाठभेद मात्र केला नाहीं असें म्हटलें तरी चालेल. फारतर केवळ एकादें उदाहरण त्या नमुन्याचें सांपडल्यास सांपडेलहि. परंतु तें उपेक्षणीय मानावयास हरकत नसेल.

या सर्व प्रकारचीं अन्तरें घडवून आणतांना केवळ अन्तराकारितां अन्तर न घडेल व पूर्वस्थिति यथाशक्य आणि संदेहाच्या प्रसंगीं अगदीं अस्पृष्ट राहील अशी काळजी घेतली आहे. तथापिहि हीं यथाशक्य व हेतुपुरःसर केलेलीं अंतरें सर्वच सर्वसामान्य होतील असें सांगतां येत नाहीं आणि क्वचित् कांहीं ठिकाणीं अवास्तविक ढवळाढवळहि नकळत अगर निष्काळजीपणें झालीच नसेल असें निक्षून सांगणें तितकें सोपें नाहीं. कारण मनुष्यस्वभाव हा स्खलनक्षम आहे.

प्रस्तुत प्रयत्नावर नाना आक्षेप घेणें शक्य आहे हें हा लेखक जाणून आहे. किंमत, बाह्यांग, बांधणी, कागद, चित्रें, छपाई, मजकुराची पृष्ठांवर योजना, शुद्धाशुद्ध, भाषा, भाषान्तराचा बिनचूकपणा, वगैरे अनेक बाह्य आक्षेप विचारबाह्य ठरविले तरी औचित्यभंग, शिष्टाचारभंग, परंपरोच्छेद, पचांगवादाप्रमाणें जुनी व नवी अशा दोन गीता करून गीतेच्या पावित्र्याबद्दल सामान्य जनाचा बुद्धिभेद केल्याचा दोष, त्याचप्रमाणें गीताभक्तांच्या भावना दुखविल्याचा दोष व शिवायहि मूलभ्रष्टता, नव संदर्भांतील अयुक्तता, रसभंग, विषयविक्षेप, सिद्धान्त-विपर्यास, वगैरे अनेक व एकापेक्षां एक गंभीर असे आक्षेप प्रस्तुत कृतीवर घेतां येणें शक्य आहे हेंहि प्रस्तुत लेखक जाणून आहे. परंतु, त्याला जी गोष्ट करणें इष्ट वाटलें ती त्यानें सद्धेतूनें केलेली आहे व त्यांत गीताग्रंथाचा अगर गीताभक्तांचा अगर सामान्य जनांचा अनादर, भावनाभंग अगर बुद्धिभेद करण्याचा त्याचा इरादा नाहीं. त्याच्या स्वतःच्या कल्पनेप्रमाणें त्याला " वेडें वांकुडें " गाऊन गीतासेवाच करावयाची आहे, हें पुनःपुन: स्पष्ट करावयास हरकत नसावी. तथापि मूळ गीता-संहिता भ्रष्ट केल्याच्या आरोपास तो पात्र नाहीं. कारण ही प्रस्तुत कृति मूळ गीता नसून तें केवळ रचनांतर असल्याचें तो उघडउघड प्रतिपादन करीत आहे. श्लोकांचें स्थानांतर व क्वचित् रूपांतर करण्यास पुरेसा पूर्वास्तित्वाचा पाठिंबा त्याला असल्याचें त्यानें 'रचनान्तराच्या कारणां'त स्पष्ट दर्शविलें आहे. संदर्भहानी, नवसंदर्भांतील अयुक्तता अगर काव्यदृष्ट्या रसभंग, विषयविक्षेप, सिद्धान्तविपर्यास वगैरे जे आक्षेप येतील ते प्रस्तुत मूळ गीतेवरहि नाहींत असें अगदींच नाहीं, ही गोष्ट ग्रंथारंभीं 'रचनांतराचें कारण' या प्रकरणांत त्यानें स्पष्ट केली आहे. तथापि, प्रस्तुत रचनांतरानें हे सर्व आक्षेप नाहींसे होतात अशीहि त्याचा घमेंडखोर कैफियत नाहीं, तर तो फक्त भगवद्गीतेचें रचनांतर करणें हें एक प्रस्तुत पिढीच्या विद्वानांचें प्राप्तकाल कर्तव्य आहे, एवढेंच या रचनांतराच्या प्रतीकानें सर्वांना दर्शवीत असून, फार तर त्या दृष्टीनें विचाराला साधन म्हणून हें रचनांतर तज्ज्ञांच्या हातीं देत असल्याचें तो नम्रपणें नमूद करीत आहे. शिवाय या सर्व गोष्टी येथें नमूद करून प्रस्तावनेची जागा अडविण्यांतहि त्याचा हेतु एवढाच कीं प्रस्तुत कृतींतील त्याच्या हेतूचा टीकाकारांकडून

विपर्यास होण्याचें व अप्रस्तुत मुद्यांवर भर देण्याचें टळून फक्त मुख्य व उद्दिष्ट कार्याकडेच सर्वांचें लक्ष लागावें.

श्रीमद्भगवद्गीतेच्या प्रस्तुतच्या १८ अध्यायात्मक ७०० श्लोकी प्रतीची गेल्या सुमारें दीड हजार वर्षांची सुप्रतिष्ठितता व परंपरा लक्षांत ठेवून त्याच अध्याय-श्लोक-मर्यादेंत गीतेचें रचनांतर करण्याचें कार्य हें अर्थात्च सोपे नाहीं. या कार्याचें स्वरूप उपमा देऊन स्पष्ट करावयाचें तर असें म्हणतां येईल कीं, खवा, रवा, सपीट, डाळपीठ, साखर, केशर, तूप, वेलची दाणे, बेदाणे, चारोळी, गुलाबकळी वगैरे पदार्थ प्रत्येकीं विशिष्ट प्रमाणांत दिलेले घेऊन ते न निवडतां, न पुरवतां, न उरवतां, त्यांचें सर्वांचें मिळून एक सुंदर पक्वान्न करणें जितकें सोपें अगर अवघड आहे, तितकेंच प्रस्तुत गीतेच्या रचनांतराचे कार्य सोपें अगर अवघड आहे. गीतेच्या रचनांतराचें कार्य म्हणजे एकादे अंकगणितांतलें—पुष्कळ आंकड्यांचें देखील—उदाहरण नव्हे कीं, ज्याचें उत्तर —दीर्घ प्रयत्नांतीं कां होईना—पण एकच व निश्चितरूपच काढतां आलें पाहिजे; तर, हें कार्य निरनिराळ्या कर्त्यांच्या आंगच्या निरनिराळ्या कसबानुसार निरनिराळ्या नमुन्यांचें, कांहीं कमीअधिक दर्जाचें व कांहीं वैयक्तिक मतभेदाच्या क्षेत्रांतलें व तथापि समान किंमतीचें असणें असंभाव्य नाहीं.

मात्र या प्रश्नाचा विचार करतांना ज्या एका मुद्याला कांहीं स्थिर रूप असणें संभवतें तो मुद्दा, गीतेचें रचनांतर ज्या धोरणानें करावयाचें त्या स्थूल आणि सर्वव्यापी धोरणाचा मुद्दा, हीच बाब उपमा देऊन स्पष्ट करावयाची म्हटल्यास वरील पाकशास्त्रांतील उपमा थोडीशी बदलून शिल्पशास्त्रांतील उपमा घेणें इष्ट होईल. भगवद्गीत-मंदिराची नवरचना जी करावयाची ती शिल्पकलेच्या एका विशिष्ट पद्धतीनेंच करणें इष्ट व शक्य वाटतें. त्याकरतां वाटेल ती पद्धति चालेल असें वाटत नाहीं. ज्याप्रमाणें एकाद्या कबर-स्थानावर गोथिक पद्धतीचें देवालय शोभणार नाहीं, अगर ख्रिस्तालयावर दक्षिण हिंदुस्थानांतील गोपूररचना शोभणार नाहीं; त्याचप्रमाणें भगवद्गीत-मंदिरांतील रहस्याचा विचार महत्त्वाचा म्हणून लक्षांत ठेवूं गेल्यानंतर, तप-शिलाचा भाग सोडून दिला तरी, मुख्य रचना ही श्रीमद्भगवद्गीतांतर्गत तत्त्व-ज्ञानाला शोभेल अशीच असणें जरूर आहे. शिवाय या तत्त्वज्ञानाचें स्वरूपहि प्राकृतिक क्रियावाद, भावनाप्रधान भक्तिवाद अगर बुद्धिप्रधान ज्ञानवाद

असल्या कसल्याच एकेरी, एकांगी स्वरूपाचें असणें संभवत नसून व्यावहारिक जगांत, पूर्ण वर्तनाच्या दृष्टीनें, ज्ञानपूर्वक–भक्तियुक्त–क्रियावाद हेंच असणें संभवतें असें म्हटल्यावांचून राहवत नाहीं. सबब, तज्ज्ञ वाचकांनीं या मुद्याच्या चिकित्सेकडे योग्य लक्ष द्यावें, अशी विनंति करून हा प्रस्तावनेचा महत्त्वाचा भाग संपविण्यास हरकत नाहीं.

यानंतर प्रस्तावनेंत उरकून घेण्याच्या अन्य कांहीं मुद्यांचा निर्देश करूं.

श्रीमद्भगवद्गीतेंतील अठरा अध्यायांपैकीं प्रत्येकांतील विवेचन नीट लक्षांत यावें एवढ्याकरितां प्रत्येक अध्यायाच्या प्रारंभीं त्या अध्यायांतील महत्त्वाच्या मुद्यांचें साररूपानें प्राक्कथन ( Argument ) दिलें आहे. हें केवळ कांहीं इंग्रजी काव्यग्रंथांवर टीका लिहिणारांचें अनुकरण होय, असें वाटण्याचा संभव असला तरी, आगामी विषयाचें विवेचन लक्षांत येण्यासाठीं या प्राक्कथनाची चांगलीच मदत होते असें वाटल्यावरून हा वरील अनुकरणाचा संभाव्य आक्षेप पत्करूनहि हा उपक्रम केलेला आहे.

रचनांतर देतांना त्याच्या जोडीस श्लोकांच्या खालीं श्लोकांतील मतलब विषयाच्या महत्त्वानुरूप कमीअधिक शब्दांत दिलेला आहे. मात्र हा केवळ विशिष्ट श्लोकांचा मतलब अगर अर्थनिर्देश होय. तो वैय्याकरणांच्या पद्धतीनें केलेला शब्दार्थमय श्लोकार्थ नव्हे, ही गोष्ट लक्षांत ठेवून टीकाकारांनीं या अर्थाच्या भागाकडे जरा क्षम्य दृष्टीनेंच पाहणें इष्ट होईल. या अर्थाचा हेतु नवरचित श्लोकक्रमांतील आनुपूर्व्य लक्षांत यावें व गीतेचा अत्यंत सोपा व सरळ अर्थ थोडक्यांत वाचकांच्या लक्षांत यावा एवढाच आहे. याच दृष्टीनें अनेक सोप्यासोप्या श्लोकांचा अर्थ दिलेलाहि नाहीं. बुडाशीं क्वचित् कांहीं टीपा विशिष्ट खुलासा करण्याच्या दृष्टीनें दिल्या आहेत.

रचनांतरांत प्रथम प्रचलित गीताध्यायांतील श्लोकांचा अध्यायांसह अनुक्रम दिला आहे व त्यापुढें घोटाळा होऊं नये, म्हणून रचनांतरानुसार श्लोकानुक्रम अध्यायावर न देतां थेट १ ते ७००पर्यंत दिला आहे. या योगानें रचनांतरामुळें झालेल्या अदलाबदल्या सहज लक्षांत येतील व प्रत्येक श्लोक आपल्या नवसंदर्भांत कोठच्या जुन्या संदर्भांतून आला हें कळणें सोपें होईल. ग्रंथाच्या शेवटीं परिशिष्ट ( ऊ )मध्यें प्रचलित गीतेंतील विशिष्ट अध्यायांतील विशिष्ट श्लोक कोठें पहावयाचा तें कळण्याकरितां आद्याक्षरानुक्रमें चरणसूचि

मूळ श्लोकांकांसह व रचनांतरीकृत श्लोकांकांसह दिली आहे. चरणसूचि प्रस्तुत लेखकाच्या पाहण्यांत कोठेंहि आली नाहीं. तथापि, सर्व गीता पाठांत नसल्यास गीतेंतील अनेक महत्त्वाच्या चरणांचें व आडचरणी विधानांचें स्थान विस्तृत ज्ञानाकरितां अगर अवतरणाकरितां कोठें पहावयाचें ही अडचण प्रस्तुत लेखकाप्रमाणें प्रत्येक लेखकास वाटत असली पाहिजे असें वाटल्यावरून हा प्रयत्न केला आहे. विशेषतः गीतेच्या सांप्रतच्या रचनांतराच्या अनुषंगानें हा प्रयत्न तर अत्यंत अवश्य वाटला व त्याची उपयुक्तता नव्या अगर जुन्या गीतेच्याहि वाचकांना अनुभविण्यास मिळावी एवढ्याकरतां, चरणसूचींतील चरणांचें स्थान मूळ ग्रंथांतील व रचनांतरांतील अशा दोन्ही प्रतींतील दिलेलें आहे.

यानंतरचा व प्रस्तावनेंतील शेवटचा मुद्दा म्हणजे आभारप्रदर्शनाचा. कोणत्याहि कार्याबद्दलच्या कर्त्याच्या जबाबदारीच्या प्रश्नांचा विचार गीतेंत श्रीभगवंतांनीं, थोडक्यांत, शरीरवाङ्मनोभिर्यत्० ( १८–१५ ) या श्लोकांत जो थोडक्यांत सांगितला आहे तो, आपली जबाबदारी दुसऱ्यावर ढकलण्याकरतां नव्हे तर कोणतीहि बरीवाईट कृति ही केवळ वैयक्तिक असणें संभवत नाहीं, वैयक्तिक जबाबदारीचें तत्त्व हें परमावधीच्या व्यक्तिवाद्यांचें केवळ खूळ होय, ही गोष्ट नीट लक्षांत येण्याकरतां सांगितलेला आहे; आणि तो पूर्णपणें लक्षांत ठेवून असें म्हणावयाचें कीं, श्रीमद्भगवद्गीतेच्या रचनांतराची ही कृति वाचकांना अर्पण करतांना ती वैयक्तिक कृति या दृष्टीनें अर्पण केली जात नसून (आणि एवढ्याच कारणाकरतां प्रस्तुत लेखक आपलें वैयक्तिक नांव वाचकांपुढें नाचवूं इच्छित नसून केवळ गोत्रनामानिर्देशावरच भागवीत आहे) ती त्याची विशिष्ट मनोघटना बनविण्यास कारणीभूत झालेल्या अनेक, असंख्य व्यक्तींच्या विचारांचा संयुक्त, प्रगटरूप परिणाम या दृष्टीनें अर्पण केली जात आहे. तथापि, केवळ लौकिक व्यवहारदृष्ट्या व्यक्तीला जेवढें सत्यत्व आहे, तेवढें नाकारतां येत नाहीं व एवढ्याकरतांच हा लेखक त्याच्या या मनोघटनेच्या सर्व कारकांचे, त्यांचा वैयक्तिक निर्देश न करतांच, व प्रस्तुत कृतींत त्यांचे आभार मानण्यासारखें कांहीं असल्यास, मनःपूर्वक आभार मानीत आहे. शिवाय, केवळ छापण्याच्या साधनांच्या मुबलकपणामुळें मनास येतील ते विचार छापून सर्वत्र फैलावण्याचा अत्याचार जगावर करण्यापूर्वी त्या विचारांमध्यें

निदान निश्चितरूप दुष्परिणामकारक कांहीं नाहीं, अशी स्वतःप्रमाणेंच अन्य कांहीं जणांची तरी खात्री होणें जरूर वाटल्यावरून ही खात्री करून घेण्याकरतां प्रस्तुत कृतीचें हस्तालिखित बाचण्याची तसदी ज्या प्रो. स. वि. पंडित, एम्. ए., गुजराथ कॉलेज, अहमदाबाद, प्रो. श्री. ना. ताडपत्रीकर, एम्. ए., भांडारकर रिसर्च इन्स्टिटय़ूट, पुणें, श्री. कृ. पां. कुलकर्णी, एम. ए., बी. टी., व श्री. द. गो. फडके, बी. ए., एल्. एल्. बी., वकील, पुणें, या मित्रमंडळींना त्यानें दिली, त्यांचे या तसदीबद्दल अत्यंत मनःपूर्वक आभार मानणें जरूर आहे. अखेरीस हस्तलिखितांचें दुर्वाच्य व कमीजास्त प्रमाणांत अशुद्ध संभवणारें संस्कृत व मराठी लेखन शुद्ध व सुवाच्य मुद्रित स्वरूपांत आणण्याबाबत श्री. स. रा. सरदेसाई, बी. ए., एल्एल्. बी, चालक, समर्थ भारत छापखाना, पुणें, यांचीहि इतकी मदत व इतकें सहकार्य झालें आहे कीं, त्यापुढें त्यांच्याकडून ग्रंथमुद्रणाच्या बाबतींत अपरिहार्य-रीत्या झालेल्या कालातिपातजन्य उद्वेगाला कांहींच महत्त्व नाहीं, एवढेंच नव्हे तर त्यांचे उपरिनिर्दिष्ट सर्व प्रकारच्या मदतीबद्दल मनःपूर्वक आभार मानणेंच योग्य होईल.

चैत्र शुद्ध १, १८५५ ग्रंथकर्ता
भारद्वाजाश्रम, सदाशिव पेठ, पुणें शहर.

# श्रीमद् भगवद्गीतेचें रचनांतर

## प्रकरण १ लें

## रचनांतराचें कारण

गीता सुगीता कर्तव्या किमन्यैः शास्त्रविस्तरैः । —भगवान् व्यास.

जगांतील अत्यंत प्राचीन व पवित्र वाङ्मयांत हिंदुधर्मास आधारभूत व प्रमाणभूत असलेल्या वेदांची व उपनिषदांची गणना होते. वेदांच्या तोडीचे ग्रंथ रामायण व महाभारत हे होत. महाभारतास तर पांचवा वेद ही यथार्थ संज्ञा प्राप्त झाली आहे. महाभारतांत श्रीमद् भगवद्गीतेचा समावेश होतो, आणि श्रीमद् भगवद्गीतेला श्रीमद् भगवद्गीतोपनिषद् अशी जी बहुमानपूर्वक संज्ञा देण्यांत येते ती अगदीं सर्वथैव सार्थ व समर्थनीय आहे. किंबहुना, श्रीमद् भगवद्गीतोपनिषद् हें पूर्वीच्या उपनिषदांचा रस काढून व त्यांत स्वमताची मात्रा उगाळून अर्जुनाची व त्याच्यासारख्या अन्य व्यामोहितांची प्रकृति ताळ्यावर आणण्याकरतां त्यास देण्यासाठीं तयार केलेलें दिव्य रसायन होय. आणि याच कारणामुळें हा ग्रंथ सांप्रत जगद्वंदनीय होऊन बसला आहे. जगाच्या वाङ्मयांत या ग्रंथाला आद्य स्थान आहे, हें याबाबतचें श्री. पं. मालवीयांचें विधान अगदीं यथार्थ आहे. हिंदुस्थानांतील सर्व भाषांतूनच काय, पण हिंदुस्थानाबाहेरच्या इंग्रजी, जर्मन, फ्रेंच, ग्रीक, लॅटिन, फार तर काय पण आर्य संस्कृतीला कसून विरोध करणाऱ्या खासी, सिंधी, फारशी, उर्दू इत्यादि परकीय भाषांतूनहि श्रीमद् भगवद्गीतेचीं भाषांतरें झालीं आहेत. तीवर तत्तत्भाषाभिज्ञांनीं व नांवाजलेल्या प्राचीन अर्वाचीन व सद्यःकालीन विद्वद्वर्यांनीं निबंध लिहून श्रीमद् भगवद्गीतेची, एक अद्वितीय, उत्तमोत्तम ग्रंथ म्हणून मुक्तकंठानें स्तुति करून स्वतःचें महत्त्व वाढवून घेतलें आहे. या नाना भाषांतून श्रीमद् भगवद्गीतेस आज कमींतकमी सहाशें पंचवीसच्यावर प्रमुख ग्रंथांचा प्रशंसाहार सादर करण्यांत आल्याचें नमूद आहे. आणि यापेक्षां लहानसहान लघुग्रंथसुमनें आणि निबंधपत्रें श्रीमद् भगवद्गीतेच्या

चरणारविंदीं भक्तजनांनीं जीं वाहिलीं असतील त्यांची तर यादी करणेंच शक्य नाहीं. श्रीमद् भगवद्गीतेसारखा, अत्युच्च तत्त्वज्ञान आणि लौकिक व्यवहार यांचें यथायोग्य मीलन करणारा, धर्म व नीति यांनीं सजलेला व योग आणि भक्ति यांनीं ओथंबलेला—सारांश मानवी जीवितांतील सर्व भावांचें आकलन करून त्या सर्वांना उपयुक्त असें जीवन एकसमयावच्छेदेंकरून पुरविणारा जगांतील असामान्य, अद्वितीय व दिव्य ग्रंथराज श्रीमद् भगवद्गीताच होय, ही गोष्ट कोणीहि विचारक शिरसामान्य करील हें निर्विवाद आहे.

एवंगुणविशिष्ट श्रीमद् भगवद्गीतेसारख्या आज तीन[1] ते पांच[2] हजार वर्षांवर प्रचलित असलेल्या पुराणपवित्र व दिव्य ग्रंथाचें रचनांतर करण्याचा प्रयत्न हा धाडसाचा, उद्दामपणाचा, मूर्खपणाचा, ईश्वराधिक्षेपोन्मुखवृत्तीचा व प्रच्छन्न नास्तिक बुद्धीचा वाटला अगर मानला जाणें शक्य आहे. परंतु असलें कसलेंहि आरोपास्त्र प्रस्तुत लेखकावर प्रेरण्या झुगारण्यापूर्वीं सर्व सहृदय वाचकांना एक नम्र विनंति करावयाची आहे कीं, श्रीमद् भगवद्गीताग्रंथाविषयीं, त्या ग्रंथाच्या दिव्य वक्त्याश्रोत्या श्रीभगवानार्जुनांविषयीं अगर ग्रथित्या भगवान् वेदव्यासांविषयीं, प्रस्तुत लेखकाची आदरबुद्धि या ग्रंथाच्या वाचकांपैकीं कोणाहि वाचकाच्या आदरबुद्धीपेक्षां अणुमात्रहि कमी नाहीं, व रचनांतराचा हा जो प्रयत्न केला जात आहे तो या पवित्र ग्रंथाची सुधारणा वगैरे करण्याच्या आढ्य हेतूपेक्षां त्या ग्रंथाची यथामति अल्पस्वल्प सेवा करण्याच्या हेतूनेंच केला जात आहे, या बद्दल कोणीहि शंका मनांत आणण्याचें कारण नाहीं.

याहि उपरान्त प्रस्तुत लेखकाच्या या वृत्तीबद्दलच्या विधानांवर ज्यांचा विश्वास बसत नसेल अशा नितान्त गीताभक्तांना एवढेंच थोडें सविनय सुचवावयाचें आहे कीं, गीता, गंगा, गायत्री इत्यादि पवित्र वस्तूंचें पावित्र्य हें अग्नि,

---

* १ ख्रिस्तापूर्वी सुमारें ९०० वर्षें मूळ भारत व गीता प्रथम झालीं आहेत. ( गी. र. पा. ५५३ )

* २ ख्रिस्तीशकापूर्वी ३१०२ वर्षी मार्गशीर्ष शु॥ १३ स भारतीय युद्धारंभ झाला. व त्याच दिवशीं श्रीकृष्णानें अर्जुनास गीतोपदेश केला. गीताकाल अन्यसंबंध विषयः लेखक—रा. ब. चिं. वि. वैद्य, कल्याणमासिक, गीतांक.

सूर्य, इत्यादि दिव्य वस्तूंप्रमाणें अक्षय व अभंग असें आहे, व त्याला दूषित करूं पाहणारा एकादा मतिमंद, सूर्यावर थुंकणाऱ्याप्रमाणें अगर दावाग्नीवर फुंकणाऱ्याप्रमाणें, या पवित्र वस्तूंना कसलाच अपाय न करतां स्वतःच्या कृतीनें स्वतः फजीत पण शेवटीं पुनित होईल. या प्रकारच्या दाखल्यांचें अवडंबर न माजवितां थोडक्यांत असें म्हणतां येईल कीं, अगदीं साध्या रामनामाच्या अगाध महतीचा गंधहि ठाऊक नसणाऱ्या वाल्याकोळ्यानें स्वतःच्या वाटमाऱ्या वृत्तीला अनुसरून त्या नामाचा 'मारा' 'मारा' असा उलटा जप केला; आणि तरीहि त्यामुळें रामनामाच्या पावित्र्याचा विपर्यास होणें तर दूरच राहो, पण त्या सत्पवित्र रामनामाचें पावित्र्य प्रत्यक्ष त्या वाल्याकोळ्याबाबत देखील यत्किंचितहि कमी झालें नाहीं, तर त्यामुळेंच व्यवहारमार्गावर पाळत राखणाऱ्या वाटमाऱ्या वाल्याकोळ्याचा कोकिलकूजित करणारा वाल्मीकिऋषी होऊन तो आपल्या दिव्य वाणींतून रामचरितगान करिता झाला; व पूर्वींच्या त्या धंद्याच्या अगदीं उलट धंदा करूं लागून, तोच आजवर लाखों भाविकांचा मोक्षाचा वाटाड्या होऊं शकला. असें असतां अनन्यादरबुद्धीनें श्रीमद् भगवद्गीतेची रचनांतररूप यथामति सेवा करण्यांत त्या ग्रंथाचें पावित्र्य यत्किंचितहि कमी होईल अशी कोणास अल्पस्वल्प देखील भीति वाटणें जरूर नाहीं व तें कमी करण्याचा अशक्य असा प्रयत्न केल्याबद्दल कोणाची सात्त्विक रोषदृष्टि प्रस्तुत लेखकाकडे वळणें जरूर नाहीं.

पण भगवद्गीतेचे कांहीं वाचक जसे भावनाप्रधान असणें शक्य आहे तसेच अन्य कांहीं बुद्धिप्रधानहि असणें शक्य आहे व भगवद्गीतेच्या रचनांतरकार्यांत त्यांच्याहि विवेचक बुद्धीला दुखविणारें असें कांहीं नसून, कदाचित् त्या बुद्धीचें समाधान करणारेंहि कांहीं असूं शकेल, ही गोष्ट त्यांना पटवून देणें हें येथें अस्थानीं होणार नाहीं. या दृष्टीनें पहातां सकृद्दर्शनीं ही गोष्ट भगवद्गीतेच्या कोणाहि काळजीपूर्वक वाचकास भासली असेल कीं, श्रीमद् भगवद्गीतेंत त्रुटि, द्विरुक्ति, पौर्वापार्यसंबंधाभाव, क्वचित् आगंतुक विषयसमावेश वगैरे कांहीं अल्पस्वल्प दोष नाहींत असें नाहीं. कै. लोकमान्यांच्या गीतारहस्याचें 'गीताध्यायसंगति' हें चौदावें प्रकरण या मुद्याचा पूर्वपक्ष म्हणून मान्य करून त्याचें निरीक्षण करूं गेलें तरी गीतेंतील प्रतिपाद्य सिद्धान्ताची लोकमान्यांची मांडणी व गीतेंतील मांडणी या दोन पृथक् आहेत, हें या

प्रकरणाच्या सुरुवातीसच लोकमान्यांनीं मान्य केलें आहे. शिवाय गीतेंतील मांडणीचें त्यांनीं जें परीक्षण केलें आहे त्यांत ही मांडणी शास्त्रीय नसून पौराणिक आहे, हें उघडपणें दर्शविलें आहे; आणि यामुळें गीतार्थाची दुर्बोधता व नाना सांप्रदायिक अर्थापत्ति कशी उत्पन्न होते हेंहि त्यांनीं स्पष्ट केलें आहे. अर्थातच या टीकेनंतर ही श्रीमद् भगवद्गीतेची मांडणी कशी संगतवार आहे हें लोकमान्यांनीं दाखविण्याचा जो प्रयत्न केला आहे, त्यानें जेवढें समाधान होईल तेवढें वाचकांनीं पदरांत पाडून घेणेंच रास्त असलें तरीहि लोकमान्यांचें स्वतःचेंच याबाबत व्हावें तितकें समाधान झालेलें दिसत नाहीं. लोकमान्यांचीं याबाबत कांहीं विधानें पहा:–(१)"एषा तेऽभिहिता सांख्ये°"या सारखा श्लोक, "अशोच्यानन्व शोचस्त्वं° " या श्लोकापूर्वी आला असता तर हाच अर्थ अधिक व्यक्त झाला असता."(गी. र. पान ४४४). (२) "तथापि कांहीं म्हटलें तरी युद्ध केलेंच पाहिजे असा निश्चितार्थ सांख्य मार्गातील युक्तिवादानें पुरा होत नाहीं." (गी. र. पान ४४६). (३) "निरूपणाची पद्धति संवादात्मक असल्यामुळें शास्त्रीय पद्धतीपेक्षां ती थोडी ढिली आहे खरी." ( गी. र. पान ४५१ ). तथापिहि आहे या रचनेचें गीतारहस्यांत समर्थनच केलें आहे हा भाग वेगळा. शिवाय या समर्थनांत भक्तिनिष्ठेचा आगंतुकपणा लोकमान्यांना चांगलाच भासला आहे, व त्या निष्ठेचें ज्ञाननिष्ठेशीं ऐक्य अगर ज्ञाननिष्ठेंत अन्तर्गतत्व प्रस्थापित करण्याचाहि प्रयास त्यांना करावा लागला आहे. पुढें अखेरीस विषयसंगतीच्या दृष्टीनें अठरावा अध्याय हा पांचव्या अध्यायाच्या शेवटास येऊन बसतो तो बसतोच; व त्या अध्यायाच्या आरंभींच्या अर्जुनाच्या शंकेचें समाधान केल्यानंतर त्रिगुणवैचित्र्याचा पुनर्विचार या अध्यायांत द्विरुक्ति नव्हे असें कोणीहि म्हणणार नाहीं. परंतु समर्थनांत आक्षेपांना बगल देणाऱ्या युक्तीचा अवलंब करून लोकमान्यांनीं या गुंतागुंतींतून आपला मार्ग काढला आहे असें म्हणणें प्राप्त आहे.

याहिपेक्षां थोडें खोलांत शिरून पाहूं जातां जीं अन्य कांहीं कारणें वाचकांना दिसल्यावांचून राहणार नाहींत त्यांचा थोडा निर्देश येथें करूं:—

( १ ) अध्याय ३, ४, ५ व ६ यांमध्यें कर्मनिष्ठेचें व यज्ञाच्या स्वरूपाचें विवरण संपूर्ण येऊन गेल्यानंतर आठव्या अध्यायाच्या सुरुवातीस अर्जुनाचे ' किं तद् ब्रह्म किमध्यात्मं ' इ० जे प्रश्नात्मक श्लोक आहेत व पुढील

चार श्लोकांत त्यांचीं जीं त्रोटक उत्तरें श्रीभगवंतांनीं दिलीं आहेत, त्यांची संगति लावतां येत नाहीं. हीं उत्तरें पूर्वींच्या विवरणाच्या संकलनाच्या रूपाचीं म्हणावींत तर त्या अनुषंगानें जरूर असलेलें ब्रह्म इत्यादि विषयाचें विवरण पूर्वी झालेलें नाहीं. सबब अर्जुनाच्या या सप्तप्रश्नमय दोन श्लोकांची जागाच चुकली आहे असें सहज वाटतें.

( २ ) सातव्या अध्यायांतील दुसऱ्या श्लोकांत श्रीभगवान् " ज्ञानं तेऽहंसविज्ञानं° " आतां सांगतों असें म्हणतात; तर नवव्या अध्यायाच्या पहिल्या श्लोकांत पुन्हा 'ज्ञानं विज्ञानसहितं' अशा किंचित् शब्दभेदानें त्याच विषयाचा उपन्यास आलेला दिसतो. शिवाय या दोन्ही अध्यायांतील प्रतिपाद्य विषयांवरील श्लोकांची पुष्कळच गल्लत झालेली दिसते. याचें एक उदाहरण द्यावयाचें तर, " यो यो यां यां तनुभक्त : " ( ७-२१ ) व " यान्ति देवव्रता देवान् पितॄन् यान्ति पितृव्रता : " ( ९-२५ ) हें देतां येईल.

( ३ ) नवव्या अध्यायांत वर्णिलेला राजविद्याराजगुह्ययोग हा खरोखर भक्तिनिष्ठेच्या वर्णनानें इतका ओथंबलेला आहे कीं, तो सांगितल्यानंतर पुन्हां बाराव्या अध्यायांतील भक्तियोगाचें विवरण—ज्यांत फार तर भक्तीचें किमान स्वरूप व भक्तांचीं कांहीं लक्षणें दिलेलीं आहेत—तें त्यापुढें अगदींच फिकें वाटतें. शिवाय त्या अध्यायाची मागल्या व पुढल्या अध्यायांशीं संगति लावणें फार ओढाताणीचें होऊन बसतें.

( ४ ) अकराव्या अध्यायाच्या सुरुवातीस पूर्वार्धांत " अध्यात्मसंज्ञितम्" गुह्य सांगितल्याचा निर्देश अर्जुन करतो, (मदनुग्रहाय परमं गुह्यमध्यात्मसंज्ञितम् ...११-१) पण दहावा अध्याय हा अध्यात्म गुह्यानें भरला आहे असें म्हणण्यापेक्षां नवव्या अध्यायांतील राजगुह्य हेंच तें गुह्य ( इदं तु ते गुह्यतमं... ९-१ ) होय असें म्हणणें जास्त संगतवार दिसतें. या दृष्टीनें अकरावा अध्याय नवव्यानंतर लगेंच लावणें शोभतें.

( ५ ) सहाव्या अध्यायांत श्रद्धयोपेत अयतीचें काय होतें या प्रश्नास दिलेलें उत्तर आढळतें (श्लोक ६-४० ते ६-४५ ). पण पुढें आठव्या अध्यायांत याच विषयानुषंगानें असलेल्या अन्य व आद्य कांहीं मुद्यांचें विवरण आढळतें.

( ६ ) तेराव्या अध्यायांत ब्रह्मवस्तूचें जितकें सुसंगत व एकत्रित विवरण आढळतें तितकें आठव्यांत आढळत नाहीं. त्यांत भरती अन्यविषयांवरील श्लोकांचीच आहे, पण अक्षरब्रह्मयोग हें नांव मात्र आठवा अध्याय पटकावून बसला; व तेराव्या अध्यायांत क्षेत्रज्ञ जीवात्म्याचें वर्णन फार तर यथातथा आहे एवढेंच.

( ७ ) चवदाव्या अध्यायांतील गुणत्रयविभागयोग व सतराव्यांतील श्रद्धात्रयविभागयोग हे त्रैगुण्याचे म्हणजे क्षेत्राचेच खरोखर भाग होत, परंतु ते परस्परांपासून दूर गेले आहेत; आणि त्यांचाच कांहीं भाग अठराव्या अध्यायांत श्लोक अठरा ते चाळीस यांत गुंतलेला दिसतो.

( ८ ) कर्मनिष्ठेचें विवरण अध्याय तीन, चार, पांच व सहाव्या अध्यायांतील पहिले नऊ श्लोक यांच्यामध्यें जें आढळतें तेंच अगर त्याचेंच सातत्य अठराव्या अध्यायांत आढळतें व सहाव्या अध्यायांतील दहाव्या श्लोकापासून वेगळ्याच एका विषयाच्या प्रतिपादनाला सुरुवात होते. आणि सतराव्या अध्यायानंतर अठराव्या अध्यायाची संगति तर साफ लागत नाहीं असें म्हणणेंच रास्त होईल.

( ९ ) पंधराव्या अध्यायांतील पुराणपुरुषोत्तमयोगांत विवरण ब्रह्मशक्तीचें-प्राकृत सृष्टीचें, जीवाचें, त्याच्या मरणोत्तर संभाव्य अवस्थांचें कीं, या सर्वांचें; व सर्वांचें तर तें कोणत्या हेतूनें हें सांगणें कठीण आहे. एवंच हा अध्याय गीतेंतील सर्वोत्तम अध्याय मानला तरी गीताकथनाक्रमांत त्याचें हेतुदृष्ट्या स्थान काय तें सांगणें कठीण आहे.

येथपर्यंतचा विचार गीताध्याय व गीताध्यायांश यांच्या संगतीच्या दृष्टीनें झाला. यानंतर कांहीं वैयक्तिक श्लोकांच्या पौर्वापार्याचा विचार घेऊं.

( १० ) अध्याय तीन श्लोक २७ ते २९ मध्यें गुणदोष हे प्रकृतीचे होत, आणि त्यामुळें ते कांहीं अंशीं सहजात होत; सबब त्यांच्या कारणानें घडणाऱ्या बऱ्यावाईट कृत्यांचें कर्तृत्व स्वतःकडे घेणें हा अहंकाररूप वेडेपणा होय अशा अर्थाचें विवरण आहे; व पुढें तेहतिसाव्या श्लोकांत हे प्रकृतीचे गुणदोष सहजात असल्यामुळें शान्यांचें देखील त्याच्यापुढें कांहीं चालत नाहीं, हें सामान्यतः त्याच अनुषंगाचें विधान आलें असून मध्यंतरीं मात्र

'कर्में ईश्वरार्पणबुद्धीनें करण्याची जरूरी ' व 'भगवंताचें मत पालन करणारांची महति ' व 'न करणारांची अधोगति ' हे अप्रस्तुत विषयांचें वर्णन करणारे ३०, ३१ व ३२ हे श्लोक आले आहेत.

( ११ ) अध्याय चारमधील २५ ते ३० श्लोकांमध्यें नानाप्रकारच्या यज्ञांचें वर्णन आलें आहे व ३२ व्या श्लोकाचा आरंभ " एवं " या, त्या विषयाच्या उपसंहारात्मक पदानें होत आहे. असें असतां मध्येंच 'यज्ञशिष्टामृतभुजो ' हा फलश्रुत्यात्मक श्लोक ३१ व्या क्रमांकाच्या स्थानीं जो आला आहे तो तेथें अस्थानीं वाटतो.

( १२ ) नवव्या अध्यायांतील "प्रकृति स्वामवष्टभ्य" (९–८) व "मयाऽध्यक्षेण प्रकृतिः " ( ९–१० ) हे श्लोक एकाच विषयानुषंगाचे असूनहि त्यांच्या दरम्यान " न च मां तानि कर्माणि " हा विषयांतरमय श्लोक शिरला आहे.

( १३ ) तसेंच अध्याय अठरामध्यें चवथ्या श्लोकांतील दुसऱ्या चरणांत त्यागाची मीमांसा चालू असतां त्याग त्रिविधः वर्णिलेला आहे असें सांगून झाल्यानंतर त्या त्रिविध त्यागाच्या स्वरूपाविष्करणाचे श्लोक लगेच म्हणजे क्रमानें पांचवे, सहावे व सातवे न येतां पांचव्या व सहाव्या श्लोकांतील या विषयांची जागा विषयांतरानें भरलेली आहे.

पण हे तपशिलाचे मुद्दे बाजूस ठेवून असा एक मूलग्राही प्रश्न उपस्थित करणें शक्य आहे कीं, जर गीता ही अर्जुनाच्या व्यामोहनिरसनार्थ व त्याला युद्धोन्मुख व कर्मप्रचुर करण्याकरतां सांगितली गेली तर कर्मनिष्ठेच्या श्रेष्ठतेचें बहुंश विवरण सहाव्या अध्यायापर्यंत संपवून, व त्याचा फार तर थोडा अंश अठराव्या अध्यायाकरितां शिल्लक ठेवून बाकीच्या अकरा अध्यायांत नाना विषय कां घुसडले गेले व काव्यकला, तत्त्वबोधकला, उपदेशकला इत्यादि कलादृष्टींनीं पहातां सातव्या अध्यायापासून सतराव्या अध्यायाच्या अखेरपर्यंत जो विवरणांत नीरसपणा आला आहे तो कां ? कर्मोपदेशांत तेरा, चवदा, पंधरा, सोळा, सतरा या अध्यायांतील तात्त्विक विवरणाला व्यावहारिक महत्त्व काय आहे ? हे अध्याय वाचीत असतां पांचव्या, सहाव्या अध्यायापर्यंत जागृत झालेली कर्मोन्मुखता वाढते कीं विझते ?

"युद्धास तयार हो" "निर्भय चित्तानें लढ" वगैरे कर्मप्रेरक उपदेश गीतेंत सुमारें चाळीस ठिकाणीं आलेला आहे; पण त्या प्रकारचें एक अवाक्षरहि तेरा ते सतरा या अध्यायांत नाहीं व त्यामुळें अर्थात्च संन्यासमार्गी सांप्रदायिक टीकाकारांना गीतेंत ज्ञानमार्ग प्रतिपाद्य आहे, अशी टीका करण्यास जागा सांपडते. पण त्यांनाहि पुढें अठराव्या अध्यायांत अडचण आहे, ही गोष्ट वेगळी. सारांश, केवळ प्रतिपाद्यविषयपरिणति या दृष्टीनें पहातां तेरा ते सतरा या अध्यायांतील तात्त्विक वर्णन नीरस अगर शुष्करस वाटतें. श्रीकृष्णाला कसली तरी शब्दांची रणधुमाळी माजवून अर्जुनाला युद्धास प्रवृत्त करावयाचें नव्हतें. अर्जुनानें श्रीकृष्णाचा तो बेत पहिल्या अध्यायांतच ढासळून टाकल्याचें उघड आहे. परंतु जर ज्ञानपूर्वक भक्तियुक्त कर्मनिष्ठेचें प्रतिपादन करावयाचें होतें तर कर्मप्रशंसा ही शेवटीं ठेवणें हेंच कौशल्य होय, याबद्दल दुमत होईल असें वाटत नाहीं; आणि या दृष्टीनें पहातां गीतेची प्रस्तुत रचना अंशतः तरी सदोष होय असें म्हटल्याशिवाय गत्यंतर नाहीं.

प्रस्तुत गीतारचनेची सदोषता याप्रमाणें प्रस्थापित करूं पाहण्याबरोबरच अन्य जी एक गोष्ट करण्यासारखी आहे ती म्हणजे या दोषोद्भवाची मीमांसा होय. या दृष्टीनें पहातां सकृद्दर्शनींच असें नमूद करणें जरूर आहे कीं, ज्या अर्थी श्रीभगवंतांनीं गीता ही अत्यंत योगयुक्त अन्तःकरणानें प्रतिपादलेली आहे, त्या अर्थी प्रतिपाद्य विषयाची परिणति करण्याऐवजीं त्याची च्युति होऊं देण्याचा हा दोष श्रीकृष्णाचा नव्हे. श्रीकृष्णासारखा महायोगी पुरुष असली चुकी करणें शक्यच नाहीं. मग दोष कोणाचा ? या प्रश्नाचें नक्की उत्तर देण्यापूर्वी त्याची तयारी म्हणून जरा थोडें अपरिहार्य असें विषयान्तर करणें जरूर आहे.

प्रस्तुतची सातशें श्लोकांची भगवद्गीता ही फारच स्थूल अर्थानें भगवद्गीता म्हणजे भगवंतांनीं गायलेली उपनिषत् आहे. या सातशें श्लोकांपैकीं फार तर ५७४ श्लोकच श्रीभगवंतांनीं म्हटलेले अगर बदलेले आहेत. या ५७४ श्लोकांपैकींहि बाराव्या अध्यायांतील २० वा, पंधराव्या अध्यायांतील २० वा व अठराव्या अध्यायांतील फलश्रुतीचे ६७ ते ७१ हे पांच मिळून एकंदर सात श्लोक हे श्रीभगवंतांचे असतील कीं काय याबद्दल शंका घेण्यास जागा आहे. गीतेचें अध्ययन, व्याख्यान, पठण, श्रवण इत्यादि

क्रिया करणाऱ्या भविष्यकालांतील सर्व मानवांना मोक्षप्राप्तीचा परवाना देण्यांत मनाचा उदारपणा असला तरी हें गीता-प्रचारकार्य स्वत: भगवंतांनीं हातीं घेतलें असेल असें वाटत नाहीं. पण हा अल्प मुद्दा बाजूस ठेवला तरी श्रीमद् भगवद्गीतेची पद्यरचना अगर गीतरचना व त्यानंतरचें अध्यायीकरण, अध्यायाच्या योगांचें नामकरण व अध्यायसमाप्तीची योगनामनिर्देशयुक्त संकल्परचना हें कार्य श्रीभगवंतांचें असेल हें त्याहिपेक्षां कमी संभवतें. प्रतिभासंपन्न महापुरुषाचे प्रसंगविशेषीं भावनास्फूर्त उद्गार वाल्मीकि ऋषीच्या " मा निषाद प्रतिष्ठां त्वं " या श्लोकबद्ध वाक्याप्रमाणें स्वयंसिद्ध व सहज काव्यमयच असतात ही काव्योद्भवाची उपपत्ति मान्य करूनहि व अठरा अध्यायांची व सातशें श्लोकांची गीता सुमारें अर्ध्या तासांत सपाट्यानें म्हणूं जातां म्हणून होते, सबब कित्येक योजनें विस्तीर्ण अशा कुरुक्षेत्रस्थ रणभूमीवर अर्जुनाशीं गीतसंवाद करावयास जरूर तो अर्ध्या तासाचा वेळ मिळणें श्रीकृष्णास असंभाव्य न मानूनहि गीतेची गीतरचना श्रीकृष्णाची नव्हे, तर ती श्रीकृष्णोत्तर अन्य कोणा महापुरुषाची आहे हें उघड आहे. गीतासंवादांत भाग घेणाऱ्या श्रीकृष्णाव्यतिरिक्त अर्जुन, संजय व धृतराष्ट्र या व्यक्तीहि आपआपलीं भाषणें गीतेंत बहुप्रमाण अनुसरलेल्या अनुष्टुप छंदांत बसवून म्हणतात हा पुरावादेखील वरील मुद्दा सिद्ध करण्यास पुरेल.

पण कदाचित् श्रीमद् भगवद्गीतेची प्रस्तुत गीतरचना श्रीकृष्णाची नव्हे हा मुद्दा सिद्ध करण्यास इतके श्रम नकोत; कारण जयग्रंथ ज्यांनीं लिहिला त्या वेदव्यासांनींच, श्रीकृष्णांनीं अर्जुनाला रणभूमीवर केलेल्या उपदेशाचा आशय जाणून घेऊन त्यावर जयग्रंथान्तर्गत अन्य विषयांप्रमाणेंच गीतरचना केली हा मुद्दा सर्वमान्य झाल्यासारखा दिसतो.* पण वेदव्यासरचित जयग्रंथ म्हणजेच प्रस्तुत महाभारत ग्रंथ नव्हे, तर मूळ जयग्रंथांत प्रथम वैशंपायनानें भर घालून त्याचें भारत बनविल्यावर त्यानंतर पुन्हां त्यांत सौतीऋषीनें स्वकृत अनेक श्लोकांची भर

---

* म्हणून महाकाव्यात्मक मूळ भारतांतच कर्मयोगपर भागवतधर्माचें निरूपण करणें भाग होतें. हीच मूळ गीता होय. तथापि मूळ भारताचें जेव्हां महाभारत बनविलें तेव्हां मूळच्या गीतेंत बिलकूल फरक झाला नसेल असें आम्हीं म्हणत नाहीं. ( गी. र. पान ५५१. )

घालून मूळच्या दोन हजार चारशें श्लोकांचा भारतग्रंथ सांप्रतच्या एक लाख श्लोकांपर्यंत वाढवून त्याचें महाभारत बनविल्याचें आतां सिद्ध आहे.* सबब जयग्रंथांत वैशंपायनानें व सौतीनें घातलेल्या भरीप्रमाणेंच या उभय कविवर्यांनीं गीतेंत स्वरचित कांहीं श्लोकांची भर घातलीच नसेल असें म्हणण्याचें कारण नाहीं. कदाचित् घातली असेल व खरोखर तशी भर घातली गेली असें सिद्ध करणारा एक लहानसा पुराव्याचा मुद्दा म्हणजे ' मुनीनामप्यहं व्यासः ' हें दहाव्या विभूतियोगाच्या अध्यायांतील सदतीसाव्या श्लोकांतील वाक्य होय. अर्थातच श्रीभगवान् वेदव्यासांना स्वविभूति मानीत असले तरी, श्रीकृष्णोक्त विषयावर कां होईना पण स्वतः काव्यरचना करतांना स्वतःचें विभातिमत्व काव्यबद्ध करण्यास वेदव्यासांसारख्या महर्षींनीं कचरावयास किंवा भविष्यकालच्या संभाव्य टिकाकारांस लाजावें असें नसलें तरी व एकदां श्रीभगवानांनीं स्वतःच तशी घोषणा केल्यानंतर त्यांच्या उद्गारांना जागून त्याचेंच यथातथ्य कवन करणें वेदव्यासांना अपरिहार्य झालें असलें तरी, सर्व गीता श्रीवेदव्यासरचित नसावी व वैशंपायन ऋषीनें वा सौतीऋषीनें त्यांत स्वरचित श्लोकांची भर घालतांना ईश्वरी विभूतींत स्वगुरु श्रीवेदव्यासांचा गौरवपूर्वक समावेश केला असावा हेंच जास्त संभवतें.

अर्थातच यावरून मूल गीताग्रंथ कशा स्वरूपाचा, किती श्लोकांचा, कशा रचनेचा व कोणता इत्यादि कांहीं खोलांतले प्रश्न उत्पन्न होतात. त्या सर्वांचीं उत्तरें देणें कदाचित् शक्यहि नसेल, तथापि त्या दृष्टीनें कांहीं थोडा प्रयत्न करून पाहण्यासारखें आहे. सबब त्या मुद्यांकडे यानंतर वळूं.

याबाबत प्रथमदर्शनींच हें कबूल केलें पाहिजे कीं गीता ग्रंथाची स्थिति पाठांतराच्या अगर पाठभेदांच्या दृष्टीनें फार सुखाची आहे. गीतेचीं पाठांतरें फार थोडीं आहेत. मात्र गीतेंतील श्लोकसंख्या तितकी निश्चित नाहीं. गीतेचे अठरा अध्याय व सातशें श्लोक हे बहुतेक सार्वत्रिक आहेत हें खरें. पण ही श्लोकसंख्या कोठें थोडीबहुत जास्त अगर कमीहि आढळते. उदाहरणार्थ " सस्तु( स्वस्त ) साहित्यवर्धक कार्यालय, तरफथी (तर्फे) " प्रसिद्ध झालेल्या गुजराथी श्रीमद् भगवद्गीतेंत एकंदर श्लोक सातशें एक आहेत.

* महाभारत–मीमांसा, शेवटचें प्रकरण.—रा. ब. चिं. वि. वैद्य.

येथील वाढाव्याचा एक श्लोक हा तेराव्या अध्यायाच्या आरंभीं असून तो असा आहे:—

अर्जुन उवाच

प्रकृतिं पुरुषं चैव क्षेत्रं क्षेत्रज्ञमेव च ।
एतद्वेदितुमिच्छामि ज्ञानं ज्ञेयं च केशव ॥

मात्र या श्लोकास क्रमांक दिलेला नाहीं, व क्रमांक हा यापुढील "इदं शरीरं कौंतेय०" या श्लोकास दिला आहे. यावरून अर्थातच कोणीतरी हा श्लोक मागून रचून गीतेंत शोध म्हणून सामील केला असावा. तथापि हा श्लोक घालण्याचें धाडस एकाद्या लेखकानें करण्यास कारणें पाहूं लागलें असतां तीं आहेत असें म्हणावें लागतें, व तीं हीं: ( १ ) तेराव्या अध्यायांतील विषयोपक्रम हा पूर्वाध्यायांतील विवरणापासून अगदीं तुटक वाटतो, सबब ह्या अध्यायांतील विवरणास कारणीभूत असा श्लोक प्रथम अर्जुनाच्या तोंडीं घालून नंतर अर्जुनाच्या त्या प्रश्नास उत्तर म्हणून पुढील विवरण ठवून देण्याच्या मर्यादेपर्यंतच हें लहानसें रचनांतर कोणीं तरी केलें असावें. ( २ ) याच अध्यायांतील अठराव्या श्लोकांत 'इति' हें समाहारात्मक पद घालून ( इति क्षेत्रं तथा ज्ञानं ज्ञेयं चोक्तं समासत: ) तेथवर कोणकोणत्या मुद्यांचें विवरण केलें त्याची यादी दिली आहे; पण ही यादी खरोखर बारा ते सतरा या श्लोकांत विवरण केलेल्या मुद्यांचीच आहे. या रीतीनें पहिले एक ते अकरा श्लोक अगदींच निराधार, लोंबते, पूर्वापरसंबंधरहित पडतात. सबब त्यांना, विशेषत: तेराव्या अध्यायांत त्याच्या क्षेत्रक्षेत्रज्ञविभाग या नांवावरून उदिष्ट असलेल्या क्षेत्र आणि क्षेत्रज्ञ या विषयाच्या विवरणाला योग्य कारण मिळावें म्हणून ही प्रास्ताविक श्लोकरचना कोणीं तरी मागाहून करून मूळ ग्रंथांत घुसडली आहे; व कांहींच प्रतींत ती तशी दिसून येत आहे. मात्र गीतेंतील सातशें श्लोकांच्या संख्येंत ही एका श्लोकाची भर फारच थोडी व उपेक्षणीय मानली तरी चालेल.

पण यापेक्षां जास्त महत्त्वाची भर क्वचित् दिसून येते व ही भर लहान-सहान नसून ती एकूणपन्नास श्लोकांची आहे. असल्या एकंदर सातशेंएकूण-

पन्नास श्लोकांच्या गीतेचा निर्देश मद्रास इलाख्यांतील पाठाप्रमाणें कृष्णाचार्य यांनीं छापलेल्या महाभारताच्या ग्रंथांत सांपडतो.§

शिवाय ही वाढाव्याची संख्या पंचेचाळीस कीं एकेचाळीस याबद्दलहि मतभेदास जागा आहे. कारण,

षटशतानि सविंशानि श्लोकानां प्राह केशवः ।
अर्जुनः पंचपंचाशत् संजयः पंचषष्ठि च ॥
धृतराष्ट्रश्लोकमेकं ।

असा सातशें एकेचाळीस श्लोकांची बेरीज करणारा पाठभेदात्मक श्लोक कांहीं हस्तलिखित प्रतींतून सांपडतो. मात्र हा केवळ चुकीचा पाठभेद आहे कीं, यानें एकाद्या सातशें एकेचाळीस श्लोकांच्या प्रतीचा निर्देश होतो हें सांगणें कठीण आहे.

यानंतर गीतेच्या ज्या एकदोन महत्त्वाच्या प्रतिभेदांचा परामर्ष घ्यावयाचा त्यांपैकीं एक म्हणजे मद्रास येथील ' शुद्धधर्ममंडळा 'नें तेथें १९१७ सालीं " सुपरिष्कृतं " ( circulated ) अगर प्रसिद्ध केलेल्या श्रीमद् भगवद्गीतेची होय. ही गीतेची प्रत अनेक दृष्टींनीं कुतूहल उत्पन्न करणारी आहे. एक तर या प्रतींतील अध्यायांची संख्या सांख्य व वेदान्त या दोहोंच्या समन्वयानुसार विश्वांत असणाऱ्या एकंदर तत्त्वांइतकी अगर आद्यन्त प्रणवयुक्त गायत्रीमंत्राच्या अक्षरांइतकी म्हणजे ऐसपेस चांगली सव्वीस आहे.* पण या अध्यायवृद्धीच्या वज्याचें तेल प्रत्येक अध्यायांतील श्लोक-

---

§ १. गी. र., पान ५०८.

* अध्यायांचीं नांवेंहि इकडील लोकांना अपरिचित असलेल्या मद्रासी लोकांच्या नामाभिधानांप्रमाणें जरा विचित्रच आहेतः–१ गीतावतारनिरूपण, २ नरनारायणधर्म, ३ अवतार गीता, ४ अधिकार गीता, ५ शिक्षा०, ६ कारण०, ७ कैवल्य०, ८ स्वरूप०, ९ साधनत्रय०, १० माया०, ११ मोक्ष०, १२ ब्रह्मस्वरूप०, १३ ब्रह्मविभूति०, १४ प्राणायाम०, १५ परमात्मा०, १६ अक्षर०, १७ राजविद्या०, १८ परमहंस०, १९ संन्यास०, २० आत्मा०, २१ प्रकृति०, २२ कर्म०, २३ भक्ति०, २४ ज्ञान०, २५ योग०, २६ ब्रह्मगीता.

संख्येच्या वांग्यावर उघडच निघालें असून, त्यामुळें एकंदर श्लोकसंख्या फारशी बोकाळली नाहीं हें भाग्यच म्हणावयाचें. मौजेची गोष्ट ही कीं, प्रत्येक अध्यायांतील श्लोकांची संख्या कांहींशी गायत्री मंत्रांतील अक्षरानुसार अगर विश्वांतील मूलतत्त्वांच्या मतमतांतरानुसार २४, २५, अगर २६ असून एकंदर ११ अध्याय प्रत्येकीं २५ श्लोकांचे, ५ सव्वीस श्लोकांचे, ७ चोवीस श्लोकांचें, व एकएक ४०, ५४, व ७८ श्लोकांचा असे आहेत. अर्थातच ही एकूण श्लोकसंख्या सातशें पंचेचाळीस भरते. पण या एकूण बेरजेंत गीतेच्या बाहेरच्या चौऱ्यांशीं श्लोकांची भरती असून ती अनुक्रमें भीष्मपर्वांतील एकूणपन्नास, अनुशासनपर्वांतील तेवीस, उद्योगपर्वांतील दहा व शान्तिपर्वांतील दोन अशा उद्गमांची आहे. अर्थातच या इतक्या पाहुण्यांचा समावेश करतांना प्रस्तुत गीतेंतील घरच्या एकूणचाळीस श्लोकांची हकालपट्टी करणें भाग पडलें आहे. तपाशिलाकरितां परिशिष्ट (अ) पहा. शिवाय या भरतीच्या पाहुण्यांची सोय सव्वीस अध्यायांपैकीं सात अध्यायांतून केलेली असून, त्यांची बरीचशी दाटी पहिला, दुसरा व सव्विसावा या गीतेच्या दोन्ही टोकांच्या म्हणजे कांहींशा उघड्या भागामध्यें झालेली आहे. गीतासंवादांतील ज्या व्यक्तींच्या तोंडीं हे श्लोक घातले आहेत, त्यांपैकीं संजयाच्या वांट्यास बराच मोठा भाग आला असून, श्रीकृष्णाचा क्रम दुसरा व अर्जुनाचा तिसरा लागतो. विषयदृष्ट्या पहातां रणक्षेत्रावर जाण्यापूर्वीं श्रीकृष्णाच्या सांगण्यावरून अर्जुनानें केलेल्या दुर्गास्तवनानें १३ श्लोक घेतले असून श्रीकृष्णाच्या तोंडीं घातलेल्या श्लोकांचा मतलब कांहींसा प्रस्तुतच्या गीतेच्या नवव्या अध्यायांतील राजविद्याराजगुह्यवर्णनासारखा आहे. संजयाच्या वाट्याचे बरेचसे श्लोक नरनारायणाच्या स्तुतीनें भरलेले आहेत. पण या वरवरच्या मौजांपेक्षां आंतल्या मौजा जास्त—फार—बहारीच्या आहेत. सेनापत्य स्वीकारून रणांगणावर लढण्याकरितां आलेले भीष्म, युद्धाच्या सुरुवातीस दुर्योधन द्रोणाचार्यांजवळ आला असतांना त्यास " पाण्डवांशीं अद्याप संधि कर व पाण्डवांशीं लढशील तर नाश पावशील बरें," असा शेवटचा झणझणित सल्ला देऊन तो कदाचित् दुर्योधनास पटत नाहीं असें पहातांच जोरानें शंखनाद करून युद्धास तयार होतात. परंतु या मौजा उघड करून दाखवीत

बसण्यापेक्षां कांहीं थोड्या श्लोकांचें पौर्वापार्य येथें नमूद करूनच त्यांचा रसास्वाद वाचकांना परभारें घेऊं देणें ठीक होईल, सबब तो प्रयत्न करूं.

१ अधिकारगीतानाम चतुर्थोऽध्यायः

अर्जुन उवाचः—

एवं सतत युक्तायें° ...१

एतं मे संशयं कृष्ण° ...२

यावर

श्रीभगवानुवाच

अहं सर्वस्य प्रभवो मत्तः सर्वं° प्रवर्तते ॥ ३ ॥

*　　　　*　　　　*

२ शिक्षागीता नाम पंचमोऽध्यायः ।

अर्जुन उवाच

योयं योगस्त्वया प्रोक्तः....१

स्थितप्रज्ञस्य का भाषा°...२

श्रीभगवानुवाच

मय्यासक्तमना पार्थ°...३

*　　　　*　　　　*

३ कारणगीता नाम षष्ठोऽध्यायः।

अर्जुन उवाच

अथ केन प्रयुक्तोयं°...१

श्रीभगवानुवाच

पञ्चैतानि महाबाहो°—२

*　　　　*　　　　*

४ कैवल्यगीता नाम सप्तमोऽध्यायः।

अर्जुन उवाच

किं शीलः किं समाचारः किं विद्यः किं पराक्रमः

प्राप्नोति ब्रह्मणः स्थानं यत्परं प्रकृतेः परं १

श्रीभगवानुवाच

ज्ञेयं यत्त प्रवक्ष्यामि°...२

*                *                *

५ स्वरूपगीतानाम अष्टमोध्यायः ।

अर्जुन उवाच

कैर्लिंगैस्त्रीन गुणानेतान्°...१

श्रीभगवानुवाच

अभयं सत्त्वसंशुद्धि°...२

*                *                *

६ ब्रह्मस्वरूपगीता नाम द्वादशोऽध्यायः ।

अर्जुन उवाच

एवमेतद्यथाऽऽत्थत्वं°...१

मन्यसे यदि तच्छक्यं°...२

श्रीभगवानुवाच

ज्ञानं ते हंसविज्ञानं°...३

*                *                *

७ आत्मगीता नाम विंशोऽध्यायः ।

अर्जुन उवाच

विस्तरेणात्मनोयोगं°...१

श्रीभगवानुवाच

स्वे स्वे कर्मण्यभिरताः...२

*                *                *

८ योगगीता नाम पंचविंशोऽध्यायः ।

अर्जुन उवाच

संन्यासस्य महाबाहो°--१

श्रीभगवानुवाच

कालोस्मि लोकक्षयकृत्प्रवृद्धो°...२

मात्र या केवळ प्रश्नोत्तरांच्या मौजा झाल्या. विवरणांतील मौजा तर याहिपेक्षां फारच बहारीच्या आहेत, परंतु त्याचा विस्तार करण्याचें हें स्थल नव्हे. त्याकरितां वाचकांनीं हा मूळ ग्रंथ अवश्य पहावा अशी त्यांना विनंति आहे.

ज्याचा नमुना वर थोडक्यांत दाखविला अशा प्रकारच्या प्रस्तुत गीतेच्या पौर्वापार्यसंबंधांच्या त्रुटी या ग्रंथांत सहज मोजूं गेलें तरी २९० भरतात; व प्रस्तुत गीतेंतील अध्याय १६ व अध्याय १७ हेच मात्र काय ते अस्पृष्ट अगर अभ्रष्ट राहिलेले दिसतात. प्रत्यक्ष श्लोकांच्या पूर्वार्धापरार्धांची अदलाबदलहि नाहीं असें नाहीं. उदाहरणार्थ

प्रकृत्यैव च कर्माणि क्रियमाणानि सर्वशः ।
यः पश्यति तथात्मानं अकर्तारं स पश्यति ॥ २२–२

एवंच मद्रासच्या शुद्धधर्ममंडळानें प्रचलित केलेल्या या भगवद्गीतेंत प्रस्तुत गीतेच्या श्लोकांची गल्लत पिचलेल्या पत्याच्या पानांसारखीच कांहींशी झाली आहे. हें रचनांतर करतांना कर्त्यानें कांहीं धोरण वापरलेलें प्रस्तावनेंत दिलेलें आहे, पण त्याचा थोडाबहुत देखील सारांश देणें या प्रकरणाच्या मर्यादेबाहेरचें होईल, सबब तो मोह टाळणेंच इष्ट होईल.

थोडक्यांत, मद्रासच्या शुद्धधर्मण्डळानें प्रचलित केलेली ही गीता म्हणजे गीतेच्या रचनांतराचा पहिला व धाष्टर्याचा प्रयत्न होय. यांत श्लोक गाळणें, श्लोक वाढविणें, श्लोकांची व श्लोकार्धांचीहि बदलाबदल करणें, हे सर्व प्रकार झालेले आहेत. या प्रकारच्या अभिनवरचनेस तेथील सुप्रसिद्ध विद्वान् डॉ. सर सुब्रह्मण्य ऐय्यर, K.C.I.E., LL.D., यांनीं प्रसारपत्र ( Foreword ) जोडलें असून अन्य पदवीधरद्वयांनी एक इंग्रजी व एक संस्कृत अशा दोन प्रस्तावनाहि यास जोडलेल्या आहेत. हा ग्रंथ आज १५ वर्षे या रूपांत प्रचलित आहे. या प्रतीचें मुख्य महत्त्व एवढेंच कीं, त्या योगानें गीतेच्या रचनांतराच्या कल्पनेला पूर्वास्तित्वाचा आधार मिळतो. मद्राससारख्या पुराणमताभिमानी प्रदेशांत देखील तद्देशीय विद्वानांकडून त्या कल्पनेला पाठिंबा मिळालेला आहे; सबब त्याच दिशेनें अन्य प्रयत्न करणें अगदींच अस्थानीं होणार नाहीं ही गोष्ट या प्रतीच्या अस्तित्वानें सिद्ध होते.

यानंतरच्या गीतेच्या ज्या अन्य एका प्रतीचा निर्देश करावयाचा ती म्हणजे काश्मीरांत परिपाठांत असलेल्या गीतेची प्रत होय. ही प्रत सांप्रत श्री. श्री. ना. ताडपत्रीकर, एम्. ए., यांच्या संग्रहीं असून ती प्रसिद्ध करण्याच्या ते तयारींतच आहेत. अशा प्रकारें अद्याप अप्रसिद्ध असलेल्या स्वहस्तगत ग्रंथाबद्दल कांहीं लिहिण्यास प्रस्तुत लेखकास परवानगी दिल्या-बद्दल प्रस्तुत लेखक त्यांचा फार आभारी आहे. या गीतेच्या प्रतीचे कांहीं विशेष नमूद करण्यसारखे आहेत ते असेः—

(१) या गीतेचे अध्याय अठराच आहेत व श्लोकक्रम प्रस्तुत गीते-सारखाच आहे.

(२) श्लोकसंख्या ७१८ म्हणतां येईल.

(३) नवीन घातलेले कांहीं श्लोक सहा चरणांचे आहेत व कांहीं एक चरणाचे आहेत; म्हणजे मूळच्या एका श्लोकाच्या दरम्यान नवे दोन चरण घुसडून दिलेले आहेत.

(४) या नवीन घातलेल्या श्लोकांत नवें तत्त्व मात्र कांहीं दिसून येत नाहीं.

(५) या प्रतीचा सर्वांत मोठा विशेष म्हणजे हींत प्रस्तुत गीतेपेक्षां सुमारें पांचशें लहानमोठे पाठभेद आहेत.

(६) हे पाठभेद मूळ ग्रंथांतील व्याकरण, भाषा वगैरे सुधारून शुद्ध, उच्च व सुंदर करण्याच्या हेतूनें बनविलेले दिसतात. वाढाव्याच्या श्लोकांचा हेतूहि काव्यस्फूर्तीनें मूळ ग्रंथांतल्या सौंदर्यांत भर घालण्याचा दिसतो.

श्रीमद् भगवद्गीतेच्या नाना पाठभेदांचें हें निदर्शन करण्याचा मुख्य हेतु मात्र हा आहे कीं, गीतेचें सौष्ठव व पावित्र्य हीं तिच्या बाह्यांगांवर म्हणजे पाठपद्धति, श्लोकानुक्रम, अध्यायनामाभिधान वगैरेवर अवलंबून नसून तींतील उच्च, पवित्र व दिव्य तत्त्वज्ञानावर व तदनुसार केलेल्या अत्यंत स्फूर्तिदायक उपदेशावर अवलंबून आहेत. आणि हे उपदेशाचे व तत्त्व-ज्ञानाचे भाग अविकृत ठेवल्यानंतर, अगर ठेवण्यासाठीं गीतेच्या बाह्यांगांत केलेले व करावे लागणारे सर्व फरक हे केवळ क्षम्यच नव्हेत तर इष्टहि होत.

पण याहिपेक्षां ज्याला अतिरेकी विपर्यास म्हणतां येईल अशी फक्त सत्तर श्लोकांच्या गीतेची एक प्रत होय. ही प्रत प्रथम उत्तरहिंदुस्थानांतील 'पाटलिपुत्र' नामक साप्ताहिकाच्या २५ जुलै १९१४ च्या अंकांत प्रसिद्ध

झालेली आहे; व या प्रसिद्धीकरणाचा मथळा, 'बाली देशमें केवल सत्तर श्लोककी गीताकी एक प्रति' असा आहे.

पण याच अनुषंगानें नमूद करण्याचा दुसरा मुद्दा हा कीं, या बाली-देशांतील प्रतीचा या साप्ताहिकाचा अंक अशा एका गृहस्थांच्या हातीं पडला कीं ज्यांच्या स्वतःच्याच संग्रहींहि एक सत्तरश्लोकी गीतेची हस्त-लिखित प्रत होती. ही हस्तलिखित प्रत, शिवाय, 'फरुखाबादमें एक ब्राह्मणके यहांसे प्राप्त केवल सत्तर श्लोककी श्रीमद् भगवद्गीताकी मुख्य प्रति'ची प्रतिकृति होय आणि तेथेंच "मूलप्रति ताम्रपत्रोपर खुदी है" अशी माहिती दिलेली असून वरच्या मथळ्यावरील प्रति या शब्दावरच्या फुलीचा खुलासा तळाशीं केला आहे, व त्यांत पुढील स्वमत दिलेलें आहे.

"यह प्रति सर्व प्राचीन व असली मालूम होती है. प्रत्येक श्लोक आपने के पूर्व तथा अपर श्लोक के साथ विचित्र सामञ्जस्य को लिये हुवे सहेतुक संबंधित है. ज्ञ का ज्ञ और क्ष का क्ष ( जो वस्तुत: शुद्ध व अधिकतर स्पष्ट है ) आपनी प्राचीनता को लिये हुवे इसि प्रतिमे देखनेको मिला॥ ह० सीताराम."

या हस्तलिखित प्रतीचा विशेष हा कीं ही ताम्रपटावर लिहिलेल्या प्रतीची प्रतिकृति होय. ही सत्तरश्लोकी गीता येथें श्लोकमय न देतां त्याऐवजीं प्रस्तुतच्या सातशें श्लोकी गीतेंतील अध्यायांक, श्लोकांक व श्लोकपादांक मूळ गीतेच्या क्रमानें परिशिष्ट (आ) मध्यें देऊनच भागविलें आहे.

ही ताम्रपटावर खोदून ठेवलेली गीता म्हणजे एकाद्या विसरभोळ्या भाविकानें निदान आपल्या स्मृतींत जी कांहीं त्रुटित गीता शिल्लक उरली आहे ती तरी पुढें जास्त जास्त विसरत जाऊं नये व शून्यावर येऊं नये एवढ्याकरतां केलेला प्रयत्न नव्हे हें नमूद केलें पाहिजे. या बाबत गीता-रहस्यांतील पुढील उतारा महत्त्वाचा आहे.

"हा अठरा पर्वांचा ग्रंथ आणि हरिवंश हीं जावा व बाली बेटांत शके चारपांचशेंच्या पूर्वीं गेलेलीं असून..." इ० इ० ( गी. र., पान ५५४. )

(१) या सत्तर श्लोकी गीतेच्या परीक्षणावरून असें दिसून येईल कीं, ही सत्तर श्लोकी मूळ गीता फक्त एकाध्यायीच आहे.

(२) या ७० श्लोकी गीतेंत प्रस्तुत ७०० श्लोकी गीतेपैकीं १२, १४, १५, १६ व १७ या अध्यायांपैकीं एकहि श्लोक आढळत नाहीं.

(३) या ७० श्लोकी गीतेंत प्रस्तुतच्या अष्टादशाध्यायी गीतेपैकीं वर दिलेल्या पांच अध्यायांव्यतिरिक्त राहिलेल्या अध्यायांचा अंकानुक्रमहि बदलला आहे.

(४) या ७० श्लोकी लहानशा गीतेंत प्रस्तुत गीतेंतील पाठांपेक्षां निराळे असे पुष्कळ पाठभेदहि आहेत व त्यांपैकीं बरेचसे व्याकरणदृष्ट्या व वृत्तदृष्ट्या सदोष वाटतात.

(५) या ७० श्लोकी गीतेची श्लोकरचना सर्वत्र परिपूर्ण देखील नाहीं. कोठें एकाद्या श्लोकाचे तीन चरण, तर कोठें दोन चरण, तर कोठें श्लोक-रचनेविरहित कांहीं त्रुटित विधानेंहि या गीतेंत आहेत.

(६) या ७० श्लोकी गीतेंत प्रस्तुतच्या ७०० श्लोकी गीतेंत नसलेल्या कांही विभूती दिलेल्या आहेत, त्या म्हणजे 'स्फुरणानामहं ब्रह्मा', 'वानराणां च मारुतिः' व 'ओषधीनाम—"( ? ) या होत. अर्थात् या दोनअडीच विभूति या सातशें श्लोकी गीतेंतील अन्य विभूतिश्रेणींत बसण्यासारख्या आहेत हें उघड आहे.

( ७ ) या गीतेंत अनुष्टुभ, इंद्रवज्रा व उपेंद्रवज्रा या तीन वृत्तांचा उपयोग केलेला आहे. बहुतेक श्लोक अनुष्टभ वृत्तांत आहेत. दोन उपेंद्रवज्रा वृत्तांत व एक इंद्रवज्रावृत्तांत आहे व हे तिन्ही श्लोक ११ व्या अध्यायांतील आहेत.

( ८ ) अध्यायाच्या शेवटच्या सुमारास अध्यायाच्या काव्याचें बाह्यांग खुलविण्याकरतां वृत्तांतर करण्याचा जो कवींचा प्रघात असतो व जो प्रचलित गीतेच्या २, ८ व ११ या अध्यायांत अनुसरला आहे तो या ७० श्लोकी गीतेंत दिसत नाहीं. उपजाति वृत्तांतील ३७ श्लोकांपैकी, यांत एकहि नाहीं. किंवा विपरीतपूर्वांपैकींहि नाहीं.

पण 'पाटलिपुत्र' साप्ताहिकांत प्रसिद्ध झालेल्या गीतेंत व तो अंक ज्यांनीं संग्रहीं ठेवला त्यांच्या संग्रहीं असलेल्या जवळजवळ त्याच शिरोनामाच्या हस्तलिखित प्रतींत कांहीं साम्य व कांहीं विरोधहि आहे असें या दोन्ही प्रतींचा संग्रह करणारानें करून ठेवलेल्या व 'कल्याण' मासिकांत त्यांच्या

चिरंजीवांनीं प्रसिद्ध केलेल्या टीपांवरून दिसून येतें. साम्य एवढेंच कीं, दोन्ही प्रतींचे श्लोक सत्तरच आहेत. मात्र हस्तलिखित प्रतींत श्लोक सत्तर आहेत असें म्हणण्याऐवजीं एकंदर चरण २८० आहेत असें म्हणणें शोभेल. कारण चारचरणी श्लोकांचे साचे ७६॥ आहेत, व मधल्या आधल्या अनेक श्लोकांचे सव्वासव्वीस चरण अपूर्त असल्यामुळें त्यांचे साडेसहा श्लोक वजा जातां बाकी सत्तर श्लोक खालीं उरतात एवढेंच. शिवाय प्रचलित सातशें श्लोकांच्या दृष्टीनें पाहूं जातां या सत्तर श्लोकांत प्रस्तुत गीतेच्या सत्त्याण्णव श्लोकांपैकीं कांहींचे पूर्णांश, अर्धांश, व पादांशहि गोंवले आहेत.

ही हस्तलिखित गीता व मुद्रित गीता यांच्यामध्यें कांहीं भेद असल्याच आगाऊ नमूद केलेंच आहे. या भेदांचा केवळ संख्यादृष्ट्या विचार करूं जातां असें दिसून येतें कीं, हस्तलिखित प्रतीत असलेले एकंदर सव्वीस श्लोकपाद छापील प्रतींत आढळत नाहींत. (परिशिष्ट इ पहा.) पण उलट हस्तलिखित प्रतींत नसलेले असे एकंदर अडतीस श्लोकपाद छापील प्रतींत जास्त आहेत आणि अडतीस श्लोकपादांपैकीं अठरा श्लोकपाद फक्त एकट्या दहाव्या विभूति-योगाच्या अध्यायांतीलच आहेत. शिवाय तिसरी गोष्ट म्हणजे या दोन्ही प्रतींतील[1] विभूति मिळून फारतर एकंदर विभूतींची संख्या छत्तीस भरते, व प्रचलित सातशें श्लोकी गीतेंत दिलेल्या एकंदर सुमारें[2] ६३ विभूति पुऱ्या होण्याकरतां या दोन्ही प्रतींतील एकत्रित केलेल्या विभूतिसंख्येंत आणखी नवीन २७ विभूतींची आणि अन्य कांहीं ईश्वरोद्भव भावांची भर घालावी लागते. ईश्वरी विभूतींच्या संख्येंत कालाबरोबर भर पडत जाणें हा ईश्वरी नियमच आहे व या दृष्टीनें ही वर दर्शविलेली भर अस्थानीं नव्हे. परंतु 'स्फुरणानामहं ब्रह्मा वानराणां च मारुतिः' या ७०श्लोकी प्रतींत निर्दिष्ट

---

१. हस्तलिखित प्रतींत १७ विभूति दिलेल्या आहेत व त्या १७ पैकीं तीन प्रचलित ७०० श्लोकी प्रतींत नसलेल्या आहेत.

२. ही संख्या निश्चितपणें गणणें शक्यच आहे असें नाहीं. तेथें मतभेदाला वाव आहे. उदा. प्रचलित प्रतींतील श्लोक १०-२०, १०-३२-१, १०-३३-२, १०-३४ व १०-३५-३.

असलेल्या दोन व 'ओषधीनाम्[1]' ही अनिर्दिष्ट असलेली एक या तीन्ही विभूतींच्या जोडीस प्रस्तुत कालसिद्ध अशी आणखी एकाद्या क्षेत्रांतील एक विभूति निवडून काढून ही समस्या पुरी करण्याचें कार्य कोणीं करावयास हरकत नाहीं.

या दोन ७० श्लोकी प्रतींच्या महत्त्वाच्या दृष्टीनें एवढेंच म्हणावयाचें कीं त्यांपैकीं एक ताम्रपटावर खोदलेली असणें व दुसरी किंचित् पाठभेदानें पण जवळजवळ तितक्याच श्लोकांची असून एक उत्तरहिंदुस्थानांत व दुसरी बाली बेटांत उपलब्ध होणें या योगानें त्यांचें स्वयंभूत्व सिद्ध होतें.

येथवरच्या विवेचनानंतर गीतेच्या निरनिराळ्या अध्यायांना जीं योगांचीं निरनिराळीं नावें दिलीं आहेत त्यांच्यांतील पाठभेदांचा निर्देश करणें अस्थानीं होणार नाहीं. हे पाठभेद पुढील ४ अध्यायांच्या नांवाबाबत दिसून येतात.

| अध्याय | गीतारहस्य लो. बा. गं. टिळक | भगवद्गीता अथवा अनासक्तियोग वि. प्र. लिमये | श्रीमद्भगवद्गीता गुजराथी सरलार्थसहित सस्तु साहित्यवर्धक कार्यालय तरफथी. |
|---|---|---|---|
| ४ | ज्ञानकर्मसंन्यासयोग | ज्ञानकर्मसंन्यासयोग | कर्मब्रह्मार्पणयोग |
| ५ | संन्यासयोग | कर्मसंन्यासयोग | कर्मसंन्यासयोग |
| ६ | ध्यानयोग | ध्यानयोग | आत्मसंयमयोग |
| १८ | मोक्षसंन्यासयोग | संन्यासयोग | मोक्षसंन्यासयोग |

तात्पर्य, वर दिलेल्या नाना पुराव्यांवरून जी एक गोष्ट निर्विवादपणें सिद्ध होते ती ही कीं, प्रस्तुतची अठरा अध्यायांची व ७०० श्लोकांची गीता ही श्रीभगवन्तांनीं अर्जुनास सांगितलेल्या, संजयानें धृतराष्ट्रास निवेदन केलेल्या व श्रीवेदव्यासांनीं कवन केलेल्या मूळ गीतेशीं अर्थदृष्ट्या कितीहि समरस असली तरी शब्ददृष्ट्या व प्रमाणप्रणालिकारचनादृष्ट्या

१. शारदीय भाषेंतील काश्मीरी गीतेंत 'ओषधीनामहं दर्भः' असा एका विभूतीचा निर्देश केला आहे. या विभूतीचा विचार करण्यासारखा आहे.

म्हणजे श्लोकानुक्रमदृष्ट्या व अध्यायानुक्रमदृष्ट्या ती मूळ गीतेची विरचित, विस्मृत, विवर्धित व अंशतः तरी अस्ताव्यस्त, विपर्यस्त अशी कांहींशी–थोडक्यांत, विकृत प्रतिकृति होय. श्रीमद् भगवद्गीतेचें विकृत रचनांतर याप्रमाणें होऊन गेलेंच आहे. शिवाय श्रीमद् भगवद्गीतेच्या कथना-कवनानंतर आज जो सुमारें ३००० वर्षांवर काल होऊन गेला तेवढ्या अवधींत मुद्रणाच्या आधुनिक साधनांच्या अभावीं व केवळ मुखपाठप्रक्रियेच्या द्वारां गीतेसारख्या गहन विषयाची अशी कांहीं थोडीबहुत स्थिति होणें यांत असंभाव्य असें कांहीं नाहीं. उलट आश्चर्य मात्र हें कीं, ज्या कोणच्या स्वरूपांत श्रीमद् भगवद्गीता सांप्रत उपलब्ध आहे त्या स्वरूपांत ती हस्तगत झालेली आहे. स्वपूर्वजांनीं रचिलेला अमूल्य काव्यसंग्रह मुखोद्गत करून ठेवून तो शिष्यपरंपरेला पढवून कायम ठेवण्याच्या आर्यांच्या कलेची कमाल असली तरी तीवर सर्वस्वीं भर देऊन आज बसणें तितकें इष्ट होणार नाही. तर जरूर त्या प्रकारचें रचनांतर किंवा पुनर्रचनांतर आणि यथाशक्य पूर्वहेतुरूपरचना करण्याचा प्रयत्न करणें हेंच सांप्रतच्या पिढीचें प्राप्तकालकर्तव्य होय.

या प्रस्तुत प्रयत्नाचा हेतु गीतेचें मूळ रूप यथाशक्य पुनः स्थापित करणें हा होय असें स्पष्ट केल्यानंतर येथील 'मूळ रूप' या शब्दाच्या अर्थाची थोडी फोड करणें जरूर आहे. पूर्वीच स्पष्ट केल्याप्रमाणें श्रीमद् भगवद्गीता म्हणजे श्रीभगवन्तानीं अर्जुनास जी कांहीं कथन केली तेवढीच, त्यांच्याच शब्दांत दिलेली विद्या असा इतका संकुचित अर्थ करून भागणार नाहीं. गीताकथनाच्या प्रसंगाला म्हणजे प्रस्तुत गीतेच्या पहिल्या अध्यायालाहि महत्त्व आहे. शिवाय गीतोपनिषत् या संज्ञेचें सार्थत्व राखण्याकरतां ती श्लोकबद्ध असणें हेंहि अपरिहार्य आहे. या दोन गोष्टी मान्य केल्यानंतर जी अगदीं मूळ गीता नजरेपुढें उभा राहते ती म्हणजे श्रीवेदव्यासरचित गीता होय. ही वेदव्यास-विरचित गीता म्हणजेच वर निर्देशिलेली ७० श्लोकी गीता कीं काय या मुद्याचा निर्णय करीत बसण्याचें हें स्थळ नव्हे. सबब तो मुद्दा बाजूस सारून वैशंपायनाच्या २४००० श्लोकी भारतग्रंथाचें वर्धन करून ज्याप्रमाणें सौतीनें त्याचा एकलक्षश्लोकी ग्रंथ केला त्याप्रमाणें मूळच्या गीतेचें वर्धन करून त्याची प्रस्तुत ७०० श्लोकांची मूळ गीता सौतिरूपीनीं अखेर तयार केली असें मानावयास फारशी हरकत दिसत नाहीं.

शिवाय श्रीभगवन्तानीं अर्जुनास केलेला उपदेश व त्याचें श्रीवेदव्यासानीं केलेलें कवन व सौतीऋषीनीं केलेलें वर्धन हें धोरणाच्या व अर्थाच्या दृष्टीनें एकरूप असणें शक्य आहे. कारण गीतेचा आधार उपनिषदें होत आणि श्रीकृष्ण, व्यास, वैशंपायन व सौति हे सर्व उपनिषत्पारंगत होते यांत तर शंका नाहीं. सारांश, वैशंपायन व सौती या ऋषिद्वयाकडून वर्धित होऊन सांप्रतच्या ७०० श्लोकांपर्यंत आलेली गीता ही श्रीकृष्णानें कथन केलेल्या व व्यासानें प्रथम कवन केलेल्या मूळ गीतेशीं अर्थदृष्ट्या, तत्त्वदृष्ट्या व रहस्यदृष्ट्या पूर्णपणें समरस आहे असें मानावयास हरकत नाहीं.[1]

याच अनुषंगानें ध्यावयाचा दुसरा मुद्दा म्हणजे कांहींहि झालें तरी प्रस्तुत उपलब्ध असलेली ७०० श्लोकांची गीता अगदी पुरातन म्हणण्याइतक्या दीर्घकालपर्यंत, श्रीमदाद्य शंकराचार्यानीं संशोधित केल्यापासून म्हणजे आज निदान १५०० वर्षें प्रचारांत आहे व भौगोलिक प्रसारदृष्ट्या ती निदान सर्व आर्यावर्तभर पसरली आहे. सबब प्रस्तुत प्रचलित ७०० श्लोकांची गीता हीच आतां मूळ गीता धरून चालावयास हरकत नाहीं.

श्रीमद् भगवद्गीतेच्या मूळ रूपाच्या विस्ताराची मर्यादा याप्रमाणें निश्चित केल्यानंतर या मर्यादेंत रचनांतर ज्या उद्देशानें करणें योग्य होईल, त्या उद्देशाचा विचार करणें इष्ट होय. या दृष्टीनें पाहतां आगाऊच ध्वनित केल्याप्रमाणें सौती ऋषीनें वाढवून पूर्ण केलेली गीता ७०० श्लोकात्मक असूनहि तेव्हांपासून तो गीताग्रंथ प्रचलित व मुद्रित स्थिररूपाच्या स्थितीस येईपर्यंत तो परंपराद्वारें मुखोद्गत करून ठेवण्याच्या पद्धतीनेंच संभाळला गेला व या अस्थिरतेच्या काळांत त्याच्यांत श्लोकांचीं पाठान्तरें, श्लोकक्रमविपर्यास, अध्यायक्रमविपर्यास वगैरे प्रकार घडून आले असें म्हणावयास जागा आहे. वस्तुस्थिति खरोखरच अशी असल्यास सांप्रत गीतेचें जें रचनांतर करावयाचें तें विष्कळीत झालेली पूर्वोद्दिष्टरचना यथाशक्य प्रस्थापित करण्याच्या उद्देशाचें

---

१. भारताचें महाभारत बनतांना या मूळ गीतेंत तदर्थपरिपोषक अशा जरी कांहीं किरकोळ सुधारणा झाल्या असल्या तरी गीतेचें एकंदर स्वरूप तेव्हांहि बदललें गेलें नाहीं. आणि हल्लींच्या महाभारतांत गीता गोवली गेल्यानंतर तींत पुन्हा दुसरा कांहीं फेरफार झालेला नाहीं.—गी. र., पान ५५३.

असणें हेंच इष्ट होईल.[1] थोडक्यांत विष्कळीत झालेली पूर्वरचना पुनश्च प्रस्थापित करणें हें या रचनांतराचें निश्चित उद्दिष्ट होय.

याच अनुषंगानें आणखी ज्या एका कृतीचा विचार करावयाचा ती म्हणजे जर्मन पंडित गार्बे यानें गीतेच्या निरनिराळ्या अध्यायांतील ठिकठिकाणचे सुमारें एकशेंसत्तर श्लोक ( परिशिष्ट ई पहा ) प्रक्षिप्त ठरवून त्यांच्याशिवाय त्याच्या मतानुसार मूळच्या आणि सुसंबद्ध स्वरूपाच्या गीतेची उभारणी करण्याची कृति होय. भगवद्गीतेचा अभ्यास अनेक पाश्चात्य पंडितांनीं, विशेषतः जर्मन पंडितांनीं,[2] फारच सूक्ष्मपणें केला आहे, आणि त्यांच्या सूक्ष्म, तीक्ष्ण व विश्लेषपरायण दृष्टीला श्रीमद् भगवद्गीतेचें दृश्य आम्हां भावनाप्रधान स्वाभिमानी हिंदू लोकांना ज्या प्रकारचें दिसतें त्यापेक्षां बऱ्याच वेगळ्या प्रकारचें दिसतें हें तज्ज्ञांना ठाऊक असेलच. हें पाश्चात्यांच्या अनुभवास येणारें गीतेचें दृश्य कशा प्रकारचें आहे हें तपशीलवार सांगत बसण्याचें हें स्थळ नव्हे. शिवाय गार्बेनें प्रक्षिप्त ठरवून गीताग्रंथांत अविचारणीय ठरविलेल्या श्लोकांच्या मुद्याचा श्री. डॉ. बेलवलकर यांनीं आपल्या 'Vedant Philosophy' या पुस्तकांत परिपूर्ण विचार केला असल्यामुळें त्याबद्दलहि येथें कांहीं लिहिलें पाहिजे असें नाहीं. गार्बेसारख्या पंडिताच्या ज्या वृत्तीबद्दल मतभेद दर्शवावासा वाटतो ती वृत्ति म्हणजे विश्लेषणद्वारां मूळाकडे जाण्याची व मूळाचेंच मूल्य ठरविण्याची पद्धति होय. या मूलशोधक दृष्टीचें प्राबल्य १९व्या शतकाच्या उत्तरार्धांत पाश्चात्य देशांत नाना शास्त्रीय शोधांची जी लाट आली त्या लाटेच्या अनुषंगानें फारच माजलें होतें व तें अद्याप फारसें कमी झालेलें नाहीं. पण ही मूलशोधक दृष्टि एक प्रकारची दोषदृष्टि अगर निदान अपूर्ण दृष्टि होय हें विसरून चालावयाचें नाहीं. उदाहरणार्थ, मनुष्यप्राणी हा शरीररचनादृष्ट्या पशूंमध्येंच मोडतो, त्याची पिंडघटना हाडामांसाची, सत्त्व, मेद, इत्यादि रासा-

---

१. पण श्रीमद्भगवद्गीतेंतील विवरणाचें मुख्य धोरण कायम ठेवून जरूर तर गीतेच्या ७०० श्लोकांपैकीं सर्व श्लोकांचेंहि रचनांतर करण्यास तात्त्विक अडचण असूं नये.

२. Holtzmann, Hopkins, Böhtlingk, Von Humbolt and others.

यनिक संयुक्तांची अगर कार्बन, नैट्रोजन, हायड्रोजन, ऑक्सिजन इत्यादि रासायनिक मौलांची आहे हें जाणल्यानें मानवी घटनेचें यथार्थ ज्ञान होतें असें म्हणतां येईल काय? विशेषतः एकाद्या सभेंत, समोर एकादा उत्तम नट, गवयी, वक्ता, राजकारणी, तत्त्वज्ञ असा विख्यात मनुष्य बसला असून तो आपल्या आंगच्या कौशल्यानें भोंवतालच्या मानवसमाजाला, त्यांच्या नाना भावना उद्दीपित करून, कधीं भयचकित तर कधीं आश्चर्यचकित करीत असतां, कधीं खळखळां रडवीत तर कधीं खदखदां हसवीत असतां, त्याच्या त्या परमोन्नत आविर्भावांकडे लक्ष न देतां त्याची शरीररचना, त्याचें शारीरव्यापारकार्य, त्याच्या हालचालींना साधनीभूत अशी त्याच्या स्नायवास्थींची यांत्ररचना अगर त्याची रासायनिक मौलघटना यांचा विचार अगदीं पांडित्यपूर्णरीत्या करतां आला तरी त्याची महति काय आहे? सुंदर सतारीचें मूल्य तींतील सर्पणावर करण्यांतलाच हा प्रकार नव्हे काय? त्याचप्रमाणें भगवद्गीतेचा विश्लेषणपर विचार पूर्णपणें केल्यानंतर महा-पांडित्य करून "मूल भगवद्गीतेंत फारतर द्वैती सांख्य मताशिवाय अगर ईश्वरवादाशिवाय अन्य कांहीं नाहीं, बाकीचा सर्व भाग प्रक्षिप्त होय"[1] असें निश्चितपणें ठरविण्याकरितां श्रीमद् भगवद्गीतेचें कितीहि विच्छेदन केलें तरी त्यायोगें 'शस्त्रक्रियेचा विजय व रोग्याचें स्वर्गमन' असल्या आधुनिक प्रवादापेक्षां जास्त कांहीं पदरांत पडेल असें नाहीं. मुळाकडे पाहण्यापेक्षां फळा-कडे कां न पहावें? आणि पायांत कोणकोणत्या पुराणमताचे दगड आहेत हें पाहण्याची मूषकवृत्ति सोडून देऊन गीतामंदिर किती सुंदर आहे, किती समृद्ध आहे, त्याचें शिखर किती उच्च, भव्य व आनंददायक आहे हें पाहण्याचें कार्य कां न करावें? फारतर कदाचित् श्रीभगवंताच्या 'स कालेनेह महता योगो नष्टः परंतप ॥' या उक्तीप्रमाणें हें मंदिर रचणाऱ्या कलावंताचा पूर्वीचा योग अगर योजना मध्यंतरींच्या डागडुजींतील अकुशलतेमुळें बिघडणें असंभाव्य नाहीं. परंतु तेवढी ती दुरुस्त करून घेतली म्हणजे झालें.

---

1. "...a Geeta the religious character of which is purely theistic and the philosophical character of which closely corresponds to the doctrine of Sankhya Yoga."—Garbe's *Introduction to B. G.*, translated by Utgikar.

श्रीमद् भगवद्गीता हें उपनिषदांचें सार होय, तें उपनिषद्रूपी गायीचें श्रीकृष्णानें काढलेलें दुग्धामृत होय ही गीतेच्या हिंदी वाचकांची दृष्टि व उपनिषदांतर्गत वेदान्तमताचा भाग केवळ प्रक्षिप्त होय व मूलगीता म्हणजे केवळ सांख्यमत व त्याच्या जोडीस कांहीं थोडें वैष्णवमत होय ही गार्बेची दृष्टि या दोन दृष्टींत दक्षिणोत्तर ध्रुवांइतकें अन्तर आहे हें उघड आहे. कदाचित् आइन्स्टाइनच्या सापेक्ष सिद्धान्ता( Theory of Relativity )ची भाषा स्वीकारून जरूर तर असेंहि म्हणावयास हरकत नाहीं कीं या दोन्हीहि दृष्टि खऱ्या आहेत. पण प्रत्येकाचा दृष्टिकोण अगर संदर्भव्यूह ( Reference System ) वेगळा आहे. हिंदी वाचकांची दृष्टि गीता आहे या स्वरूपांत किती उच्च, उदात्त, व्यापक व इहपर कल्याणोपदेश देण्यास योग्य आहे ही होय. पण गार्बेची दृष्टि फक्त चिकित्सक, ऐतिहासिक व अर्थात्च पुष्कळशी कोती होय. त्या मानानें हिंदी वाचकांची दृष्टि पुष्कळ आदरणीय होय यांत कांहींच शंका नाहीं. या दृष्टीनें पाहतां गीतेंत अद्वैतवेदान्तवाद, वैष्णवी ईश्वरवाद व सांख्य द्वैतवाद, यांचें अतिकुशल, मनोहर व परिणामकारक मिश्रण आहे आणि तें विश्वघटनेशीं यथाशक्य जुळतें येत असल्यामुळें परिपूर्ण असून त्यामुळेंच गीता ही उपनिषदांपेक्षां जास्त आदरणीय झालेली आहे. श्रीमद् भगवद्गीतेंतील वेदान्तमताचा भाग प्रक्षिप्त असलाच तरी पण तो प्रक्षेप घडवून आणणारानें हा केवळ तींत जावईशोध भरलेला नाहीं, तर जरूर असलेला एक अत्यंत महत्त्वाचा भाग मूळ गीतेंत भरून त्या गीतेला पूर्णता आणलेली आहे आणि अशा रीतीनें ती गीता ग्रंथाची अत्यंत महत्त्वाची सेवा होय यांत शंका नाहीं.

केवळ ऐतिहासिक चिकित्साप्रवण बुद्धि कांहींहि म्हणो, परंतु गीता हें अठरा धान्यांचें कडबोळें तर नव्हेच तशी ती पंचमेळ खिचडीहि नव्हे. तर विश्वघटनेचीं आध्यात्मिक, आधिदैविक व आधिभौतिक हीं तीन अंगें लक्षांत घेऊन त्या त्रिसांमिश्र विश्वघटनेनुरूप व्यक्ति तंतोतंत बनविण्यास ज्या संमिश्र स्वरूपाची मांडणी व उपदेश गीतेंत अवश्य हवा त्याच तऱ्हेचा तो केलेला आहे. या प्रकाराची संमिश्रता हा विश्वाचा गुण अगर लक्षण होय व तदनुरूप संमिश्र गीतारचना हा गीतेचा दोष नव्हे तर तो गीतेचा महत्त्वपूर्ण विशेष होय. सापेक्षतेचा विशेष व सामान्य अशा दुहेरी प्रकारचा

सिद्धान्त रचण्याचा दोष जसा आइन्स्टाइनच्या माथीं येत नाहीं, अगर वास्तवद्रव्यसमूहापासून दूर अन्तरावर सापेक्षतेचा विशिष्ट सिद्धान्त लागू होण्याची व त्यापासून जवळ अंतरावर सापेक्षतेचा व्यापक अगर सामान्य सिद्धांत लागू होण्याची जबाबदारी जशी त्याच्या माथीं येत नाहीं, तर उलटपक्षीं वस्तुस्थितीची योग्य पारख करून तदनुरूप जरूर ती दुहेरी सिद्धान्तरचना करण्यास जरूर त्या अगाध बुद्धिमत्तेचें श्रेयच त्याच्या पदरीं पडतें, त्याचप्रमाणें गीता ही त्रिसंमिश्र बनविण्यांतच बनविणाऱ्याच्या अक्कलेची व तत्त्वदर्शी सूक्ष्म बुद्धीचीच भरपूर साक्ष आहे असें अगदीं प्रांजलपणें कबूल करण्यावांचून गत्यंतर नाहीं.

शिवाय असेंहि म्हणतां येईल कीं, गीता हें केवळ उपनिषद्रूप गाईचें धारोष्ण दूध नव्हे व श्रीकृष्णानें हें दूध काढून लोकांस पाजण्याचा आपल्या लहानपणाच्या मानीव बापाचा गौळ्याचा धंदा कोणत्याहि अर्थानें प्रौढ वयांतहि चालू ठेवलेला नाहीं. असेंच जर असतें तर श्रीकृष्णाला महापुरुष अगर अवतार म्हणण्याची जरूरी नव्हती. परंतु श्रीकृष्णचरित्र हें विस्तारदृष्ट्या त्रिकोणाप्रमाणें केवळ पायाच्या प्रमाणांत वाढणारें नसून परवलया( Parabola )प्रमाणें अनन्तांत मिळून जाणारें आहे. शिवाय गीतेशीं श्रीकृष्णाचें जितकें साहचर्य आहे तितकेंच श्रीकृष्णानंतर ज्या पुराणऋषिमहर्षींचे हात गीतेस लागले त्यांचेंहि आहे. निर्देशाच्या वेळेस ते प्रमुख पुरुष श्रीकृष्णांत समाविष्ट आहेत आणि सर्वांचीच ज्ञानभूमिका इतकी उच्च आहे कीं, गवयाचें मूल रडलें तरी सुरांत रडतें असें म्हणतात त्याप्रमाणें, अगर उत्तम रंगाऱ्यानें रंगानें भरलेला कुंचला साफ करण्यासाठीं कागदावर सहज लोळविला तरी त्यांतून चित्रच उमटतें असें म्हणतात त्याप्रमाणें त्यांच्या हातून झालेली गीतारचना ही यथाशक्य सर्वोत्कृष्टच आहे. भगवद्गीता हें उपनिषद्रूप गाईचें केवळ दूध नव्हे तर संमोहानें खालावलेल्या शारीर व मनोवस्थेंत आत्मवत्ता, ईश्वरादर, कार्यक्षमता वगैरे इष्ट लक्षणें प्रगट करण्याची शक्ति असलेलीं दीर्घानुभवयुक्त स्वमताचीं नाना रसायनें श्रीकृष्णप्रमुख ऋषिमहर्षींनीं त्यांत घालून तयार केलेलें तें एक पौष्टिक, मधुर, दिव्य अमृत आहे. फक्त तें प्राशन करतांना आहे त्या, कालान्तरदोषामुळें साकाळलेल्या स्थितींतच प्राशन करण्यापेक्षां किंचित् हलवून त्याचे घटक परस्परांशीं नीट मीलन

पावतील असे करून घ्यावयाचें आहे.[१] लोकमान्यानींहि भगवद्गीतेस दिलेली महावस्त्राची उपमा थोडीशी सुधारावयाचें धाडस करावयाचें तर असें म्हणतां येईल कीं, श्रीमद्भगवद्गीता ही अद्वैतवेदान्ताच्या शुभ्र रेशमी कापडावर भगव्या भक्तीच्या उबदार लोकरीचा उठाव भरून ह्या उठावावर निष्कामकर्मोपदेश जरतारी धाग्यांनीं सुवर्णाक्षरांत भरलेली विश्वधर्माची विजयी पताका होय.

सबब, सांप्रतकाळीं आहे या गीतासाहित्याचा योग्य उपयोग करून त्यापासून जनमनांच्या नीतीला, धर्माला व तत्त्वज्ञानाला परिपोषक व प्रस्थापक अशा प्रकारचें संघटित ( Synthetic ) रचनांतर जर शक्य असेल तर तें प्रकृष्टपणें करणें हेंच युक्त दिसतें; शिवाय याबाबत असेंहि म्हणतां येईल कीं, हीच जिवंत साहित्याची मुख्य खूण होय; एरवीं सर्व शिळें खाणें होय.[२] हिंदूंच्या धार्मिक व तात्त्विक वाङ्मयाचा इतिहास गतकालाकडे दृष्टि देऊन पाठीकडे चालणारा नाहीं तर आक्रमण करावयाच्या मार्गाकडे दृष्टि देऊन तिकडे चालणारा आहे. म्हणूनच उपनिषदांमध्यें व त्याचप्रमाणें श्रीमद् भगवद्गीतोपनिषदामध्येंहि मतमतांतरें आहेत. हिंदुधर्माचा प्रणेता ऋषिहि एक नाहीं तर तेथेंहि अनेक महात्म्यांच्या कारागिरीची भर पडली आहे व एकसारखी पडत आहे. जीर्ण व कालबाह्य झालेलीं मतें त्यांतून गळून पडत आहेत व पडणार आहेत. तीं फार एकांगी दृष्टीच्या पुराणसंशोधकालाच अत्यंत महत्त्वाचीं वाटोत! विशिष्ट काळीं मुख्य प्रश्न म्हणजे जें काय हातीं आहे त्याच्या यथाशक्य सर्वोत्तम उपयोगाचा असतो. आणि या दृष्टीनें पाहतां सांप्रत जें गीतसाहित्य हाताशीं आहे त्याचें योग्य पृथक्करण करून त्यांत सर्वोत्तम भाग कोणता आहे तें ठरवून इतर भागांना त्या मुख्य भागाच्या प्रभावळींत यथायोग्य स्थान देणें व सर्वांचा मिळून एक यथाशक्य सर्वोत्तम संच तयार करणें हेंच प्राप्तकालकार्य दिसतें.

यानंतरचा दुसरा मुद्दा, ज्या धोरणाच्या मदतीनें हें रचनांतराचें कार्य अंगीकृत करावयाचें त्या धोरणाचा होय. हा मुद्दा मात्र बराच बिकट आहे व त्याचें स्वरूप निश्चित करण्याकरतां थोडेसे प्रयास करावे लागतील. ते पुढील प्रकरणांत केले आहेत.

---

१. ‘ Shake the bottle before use. ’

२. तुल्यः—‘ पुराणमित्येव न साधु सर्वं न चापि काव्यं नवमित्यवद्यम् । ’

## प्रकरण २ रें

# रचनांतराचें धोरण

प्रस्तुतच्या सप्तशतश्लोकी व अष्टादशाध्यायी गीतेंत ब्रह्म, ईश्वर व विश्व या तीन घटना व ज्ञान, भक्ति व कर्म या तीन निष्ठा यांचें विवरण प्रामुख्यानें आलेलें असून शिवाय पातंजलयोग, विश्वरूपदर्शनयोग, विभूतियोग, यज्ञमीमांसा, वर्णाश्रमधर्म वगैरे इतके कांहीं भिन्नभिन्न विषय आलेले आहेत कीं गीता म्हणजे निष्ठांची खिचडी किंवा गोधडी असा जो भ्रम कांहीं वाचकांना वाटत असल्याचा उल्लेख गीतारहस्याच्या ४६२ व्या पाना-वरील दुसऱ्या परिच्छेदांत लोकमान्यांनीं केला आहे, त्या भ्रमाला खरोखरच गीतेंत कारण आहे कीं काय असा संशय आलाच तर तो अगदीं चुकीचा नव्हे. किंबहुना कांहीं विचारकांची मजल भारतीययुद्ध-प्रोत्साहनाकरतां गीता कीं गीतेकरतां भारतीययुद्धकल्पना असल्या संशयांत पडण्यापर्यंत गेली आहे. भाविक गीतानिष्ठांना भारतीय युद्ध हें गीतेच्या कथनाकरतां कल्पिलेला प्रसंग वाटतो तर ऐतिहासिक दृष्टीच्या विचारकांना भारतीय युद्ध सत्य वाटून तदनुषंगिक गीतरचनेची कल्पना केवळ कपोलकल्पित वाटते. अर्थात् अन्य कांहीं विशिष्ट वृत्तीचे विचारक भगवद्गीतेला फक्त युद्धगीत किंवा रणगीत किंवा रणगर्जनाच मानतात. पण हा भाग बाजूस ठेवला तरी भगवद्गीतेंतील प्रतिपाद्य विषय इतके अनेक व प्रत्येकीं इतके गंभीर आहेत कीं एवढा मोठा ग्रंथ युद्धाच्या ऐन सुरवातीस रचीत बसण्यांत कांहीं तरी असंभाव्यता, मग ती युद्धाची असो अगर गीतेच्या प्रस्तुत स्वरूपाची असो–पण आहे, असें कोणी हट्टानें म्हणूं लागल्यास त्याला युक्तिवादानें गप्प बसविणें फारसें सोपें नाहीं. पण ही गीतरचना इतक्या घाईनें केली असेल असें वाटत नाहीं. कारण प्रस्तुत गीता ही संजय धृतराष्ट्रास भीष्माचार्य रण-भूमीवर पडल्याची वार्ता सांगावयास गेल्यानंतर धृतराष्ट्रानें "रणभूमीवर काय काय घडलें (किमकुर्वत-भूतकाल) तें मला सांगा" असें त्यास विचारल्यानंतर त्यानें सावकाशपणें सांगितलेली आहे. ती विशिष्टपूर्ववृत्तांची तदनंतरची कथा आहे. तें रणभूमीवरील श्रीकृष्णार्जुनांच्या संवादाचें धृतराष्ट्रानें घरबसल्या

ऐकिलेलें रेडिओब्रॉडकास्टिंग नव्हे. कदाचित् संजयाच्या बाबतींत तो ब्रॉडकास्टिंगचा एक प्रकार किंवा दूरश्रवणशक्ती( Clairaudience )चा एक प्रकार संभवेल. पण धृतराष्ट्रसंजयप्रश्नोत्तरांतर्गत वेदव्यास-वैशंपायन-सौतींनीं रचलेली गीता ही सावकाशीची आहे. तो अंशतः स्मृत्यंतर्गत टिपणां-वरून लिहिलेला सविस्तर, सुसंगत आणि सुवर्धित रिपोर्ट होय. आणि येथें या सुवर्धित रिपोर्टाची सुसंगति पुनःस्थापित करावयाची आहे. सबब या पुनःस्थापनेचें धोरण निश्चित करतांना श्रीकृष्णानें आणि श्रीकृष्णाला अवगत असलेलें उपनिषदांतर्गत तत्त्वज्ञान ज्यांना पूर्ण अवगत होतें त्या वेद-व्यासांनीं, वैशंपायनांनीं व सौतिमुनींनीं ज्या उपनिषन्निष्ठ युक्तिवादाचा आश्रय केला तोच युक्तिवाद पुन्हां आधारास घेणें इष्ट होय.[1]

पण यावरहि येथें असा एक प्रश्न उद्भवतो कीं, अर्जुनाला युद्धाला पुन्हा सज्ज करण्याकरितां श्रीकृष्णास औपनिषदिक तत्त्वज्ञानासारख्या गूढ विद्येचा अवलंब कां करावा लागावा? या प्रश्नाचें उत्तर एवढेंच कीं, रणभूमीवर अर्जुनानें युद्धकर्माविरुद्ध घेतलेले आक्षेपच कांहीं असामान्य स्वरूपाचे होते.

अर्जुनाच्या मनांत कुरुक्षेत्राच्या रणभूमीवर उत्पन्न झालेला विषाद हा कांहीं असामान्य व फार उच्च प्रतीचा होता. अर्जुन हा वीर होता, तो रणशूर होता व तो रणभीरु नव्हता. 'आपण युद्धांत मारले गेलों तर तूर्त कसें तरी करून जगत आहोंत त्यालाहि मुकूं' ही भीति त्याला शिवलेली नव्हती. तर तो मित्रद्रोह, गुरुद्रोह, आप्तनाश, स्वकुलनाश, स्वकुलधर्मनाश इत्यादि

---

१. श्रीमद्भगवद्गीता ही केवळ सर्वोपनिषद्रूपी गाईंचें दूधच नव्हे, तर त्या दुधांत श्रीकृष्णादि तत्त्ववेत्त्यांनीं अनेक महत्त्वाच्या स्वमतांची मात्रा उगाळून त्याला परमश्रेयस्कर अशा दिव्य रसायनाचें स्वरूप आणलेलें आहे ही गोष्ट पुनरुक्ति-दोष स्वीकारून पुनःपुनः विधित करावयास हरकत नाहीं. श्रीमद्भगवद्गीतेंत उप-निषदांत नसलेल्या पुष्कळ गोष्टी नवीन आहेत व त्या महापुरुष श्रीकृष्णाच्या स्वतःच्या आहेत. आणि म्हणूनच भगवद्गीता ही एक नवीन उपनिषद् होय. पूर्वोप-निषद्मतांत श्रीकृष्णानें कोणत्या महत्त्वाच्या स्वरूपाची भर घालून गीतोपनिषत् बनविलें आहे, याचा निर्देश पुढें परिशिष्ट (उ) मध्यें केलेला आहे व तो पाहण्यास वाचकांना विनंति आहे.

एकापेक्षां एक उच्च अशा नाशश्रेणीला भ्याला होता. शिवाय या सर्वनाशाला आपण कारणीभूत होत आहोंत असें त्याच्या मनानें घेतलें होतें; व या सर्व पापाचे धनी बनण्यास तो भीत होता. अर्जुन स्वतःच्या समजुतीप्रमाणें नीतिच्युत नव्हे पण नीतिनिष्ठ बनूं पाहात होता. उदात्त व शुद्ध नीतीचें पालन करण्यांत तो एकाद्या भीरुप्रमाणें कौरवांकडून मारला जाण्यासदेखील तयार झाला होता, पण स्वसंरक्षणार्थसुद्धां लढूं इच्छीत नव्हता. हा त्याचा मोह नष्ट करण्याकरतां श्रीकृष्णांनीं त्याला क्लीब म्हणून खिजविलें; स्वजनकृत संभाव्य उपहासाची भीति घालून भिवविलें; त्याला पृथ्वीवरील राज्याची किंवा अलभ्य स्वर्गसुखाचीहि लालूच दाखवून पाहिलें. परंतु अर्जुनानें एकदां आश्रय केलेल्या शुद्ध व उच्च नीतितत्त्वाच्या भूमिकेवरून जेव्हां तो ढळत नाहीं आणि शिष्य होऊन व शरण येऊन परमश्रेयाचा मार्ग विचारीत आहे असें जेव्हां श्रीभगवंतानीं पाहिलें तेव्हां त्याच्या त्या भूमिकेवर व त्याहिपेक्षां उच्च भूमिकेवर स्वतः उभे राहून, बोधद्वारां अर्जुनासहि तेथें नेऊन, तेथून पाहतां अर्जुन विषादयुक्त, व्यामोहित, कश्मलित अन्तःकरणानें स्वीकारूं पहात असलेला मार्ग कसा चुकीचा आहे हें श्रीकृष्णानें त्यास दाखवून दिलें आहे. श्रीकृष्णानें युद्धाची हुल्लड करून अर्जुनास युद्धोन्मुख केलेलें नाहीं. आप्तवाक्य अगर श्रेष्ठवाक्याचा आधार दाखवून अगर केवळ स्वतःच्या वैयक्तिक अधिकाराचा दुरुपयोग करून त्यास युद्धास सज्ज केलेलें नाहीं. अशा येनकेनप्रकारेण उभा केलेला रडतराऊत भारतीय युद्धांत टिकणार नाहीं हें श्रीकृष्णाला पक्कें ठाऊक होतें. सबब योग्य विचारसरणीनें अर्जुनाचा दृष्टिकोणच आमूलाग्र बदलून टाकणें श्रीकृष्णास भाग पडलें. त्यांतही अर्जुन कांहीं कच्च्या गुरूचा चेला नव्हता; तो बुद्धिवादाचा ( प्रज्ञावादांश्च भाषसे ) अवलंब करीत होता. सबब श्रीकृष्णानें त्याला केलेला गीतोपदेश हा सुभाषितांच्या तांड्याप्रमाणें विष्कळित रचनेचा असणें संभवत नाहीं. किंबहुना या ठिकाणीं विवादरचना-चातुर्य ( Marshalling of Arguments ) हाच महत्त्वाचा भाग होय व याबाबत श्रीभगवान् अनिष्णात असतील असें संभवत नाहीं. 'सर्वांभूतीं आत्मा एकच आहे व तो तर अविनाशी आहे. सबब युद्धांत समोर येईल त्याला तो गुरु आहे कीं आप्त आहे हें न पाहतां बेशक ठार मार,' या द्वितीयाध्यायांतील सारभूत शिकवणीस अर्जुनानें दाद दिली नाहीं. तर

‘ आत्मा एक आहे तर मार कां ? स्वस्थ कां न बैस ? ’ या प्रश्नाचें पूर्ण उत्तर श्रीकृष्णास नाना प्रश्न विचारून त्यानें त्याजकडून स्वतःचें समाधान होईपर्यंत काढून घेतलें. यामुळेंच अर्थात् जो गीतविस्तार झाला त्याचें श्रेय अर्जुनाच्या चिकित्सक बुद्धीस, श्रीकृष्णाच्या अगाध व अमूल्य तत्त्वज्ञान-पारंगततेस व श्रीवेदव्यासादि गीताग्रंथकारांच्या व्यापक व दिव्य प्रतिभा-शक्तीस देणें जरूर आहे. या इतक्या मूलग्राही व व्यापक संवादामुळेंच श्रीमद् भगवद्गीतेस अत्युत्तम महाग्रंथाचें स्वरूप आलेलें आहे, आणि त्यामुळेंच तो ग्रंथ इतका विचारणीय झालेला आहे.

या एवढ्या विवरणावरून फार तर गीतेच्या ग्रंथविस्ताराचें समर्थन होईल. पण संभाव्य पूर्वरचना प्रस्थापित करण्याकरितां सांप्रत जें रचनांतर करावयाचें त्याचें स्वरूप निश्चित करतांना श्रीकृष्णानें ज्या मुद्द्याच्या आधारें अर्जुनाचें समाधान केलें त्या मुद्द्यांचा कांहीं थोडासा तपशीलवार निर्देश येथें करणें जरूर आहे. हा निर्देश म्हणजे अर्थात् श्रीकृष्णाच्या तत्त्वज्ञानाचा निर्देश होय व तो शक्य तितका थोडक्यांत येथें करावयाचा आहे.

याबाबत सकृद्दर्शनींच एक मुद्दा असा कीं, या विश्वाची विराट अगर दृश्य घटनाच केवळ लक्षांत घेऊन अर्जुनाच्या व्यामोहाचें व त्यानें उपस्थित केलेल्या शंकांचें समाधान श्रीकृष्ण करीत नाहीं—तसें करणेंच शक्य नाहीं. तर, दृश्य जगाच्या बरोबरच अदृश्य जग असें कांहीं आहे, तें दृश्य जगापेक्षां जास्त महत्त्वाचें व जास्त विचारार्ह आहे, सबब त्या दृश्यातीत जगाचा विचार प्रथम व या दृश्य जगाचा विचार नंतर घेऊन—किंवा थोडक्यांत उच्चनीच किंवा तात्त्विक व व्यावहारिक अशा संमिश्र घटनेच्या जगाचा विचार अर्जुनापुढें मांडून श्रीकृष्णानें त्याचें समाधान केलेलें आहे.

## प्राकृत जगाची त्रिसंमिश्र घटना

श्रीकृष्णाच्या मांडणीप्रमाणें ही संमिश्र घटना आध्यात्मिक, आधिदैविक व आधिभौतिक अशी त्रिसंमिश्र आहे. या तीन घटना अनुक्रमें उतरत्या क्रमानें सूक्ष्म असून चढत्या क्रमानें जड आहेत. आध्यात्मिक घटना ही या तिहींपैकीं अत्यंत सूक्ष्म असून आधिभौतिक घटना ही यांपैकीं अत्यंत जड आहे. जन्यजनकसंबंधदृष्ट्या पाहतां प्रत्येक जड घटनेचें जनकत्व तदितर सूक्ष्म

घटनेकडे आहे, तसेंच जड घटना ही तदितर सर्व सूक्ष्म घटनांतील आविर्भाव (Projection) होय. जन्यजनक संबंधाप्रमाणेंच या तिन्ही घटनांचे उपशम-संबंध असून जड घटना ही सूक्ष्म घटनेंत अन्तर्धान (Introjection) पावणारी आहे. या दृष्टीनें पाहतां विराट विश्व हें ब्रह्मशक्तीचा आविर्भाव होय व यांतच त्याचें वास्तव्य असून त्याचा लयहि त्या ब्रह्मशक्तीतच होणार आहे. शिवाय या तीन घटनांचे प्रस्तुतचे परस्पर व्याप्यव्यापक संबंध तैत्तिरीयोपनिषदां-( २–५ )मध्यें वर्णिलेल्या पुरुषघटनेप्रमाणेंच आहेत. म्हणजे प्रत्येक सूक्ष्म घटना ही तदितर जड घटनेला अन्तर्बाह्य व्यापूनहि शिवाय शिल्लक उरणारी अशी आहे. समष्टींतील या तीन घटनांचीं नावें ब्रह्म, ईश्वर व विराट हीं होत. या समष्टि-घटनेला अनुरूप अशीच व्यक्तिघटनाहि त्रिसंमिश्र असून आत्मा, जीव व देह ही त्रयी ब्रह्म, ईश्वर व विराट अगर प्रकृति यांशीं समरूप आहे. या दृष्टीनें पाहतां आत्म्याचा आविर्भाव जीव होय व जीवाचा आविर्भाव देह होय. आत्मा हा जीवरूपी अपराप्रकृतीला अन्तर्बाह्य व्यापणारा आहे व जीव हा देहरूपी पराप्रकृतीला अन्तर्बाह्य व्यापणारा आहे. उलट व्यक्तीच्या मृत्यूनंतर देहाचें पर्यवसान त्याला व्यापक असणाऱ्या जीवरूपी अपराप्रकृतींत होणें संभवतें व प्रलयकालीं जीवरूपी अपराप्रकृति ही ब्रम्हशक्तीशीं एकरूप होते. ( कल्पक्षये पुनस्तानि कल्पादौ विसृजाम्यहं । भ. गी. ९–७ )[1]

या दृश्यातीत जगाच्या घटनेचा निर्देश गीतेंत वारंवार आढळतो. व्यक्तीच्या शरीरांत इंद्रियें, मन, बुद्धि व आत्मा यांची उच्चोच्चश्रेणी गीतेंत ( इंद्रियाणि पराण्याहुः। भ. गी. ३-४२ ) दर्शविली आहे. तसेंच समष्टीच्या अगर विराटाच्या घटनेंतहि अतींद्रिय अशा ईश्वराचें व त्याहिपेक्षां व्यापक अशा ब्रह्मशक्तीचें अस्तित्व ध्वनित आहे ( ईश्वरः सर्व भूतानां०–भ. गी. १८-६१, सर्वतः पाणिपादं० भ. गी. १३-१३ ते १७ ).

---

१. गीतेच्या सहाव्या, पंधराव्या वगैरे अध्यायांत जीवशक्तीचें स्थलांतर ( गृहीत्वैतानि संयाति–भ. गी. १५–१० ) सांगितलें आहे. पण तो केवळ एक गौणमतपर्यायाचा निर्देश होय. एरव्हीं ' जीवो ब्रह्मैव नापरः ' हेंच श्रुतिमत उच्च व संग्राह्य होय.

ही संमिश्र घटना एकाद्या दृष्टान्तानें व्यक्त करावयाची झाल्यास थिजूं अगर वितळूं लागलेलें पातळ तूप व त्यांतच त्या तुपाचा बनूं लागलेला अगर शिल्लक उरलेला घट्टसर असा गोळा जो दिसतो त्याची अगर त्याहिपेक्षां जास्त श्रेष्ठ म्हणजे गर्भिणी व तिचा गर्भ यांची देतां येईल. ब्रह्मशक्तीच्या आद्य आविर्भावाला हिरण्यगर्भ ही संज्ञा याच धोरणानें लावलेली आहे. गर्भिणींत गर्भाचा समावेश होतो व गर्भिणी ही गर्भाला अन्तर्बाह्य व्यापक असते. गर्भ हा गर्भिणीचा आविर्भाव होय आणि शिवाय गर्भिणीमध्येंच गर्भाचा अन्तर्भाव होतो. याचप्रमाणें विश्व हें ब्रह्मशक्तीचा व ब्रह्मशक्तीमध्येंच आविर्भाव व अन्तर्भावहि होय. अर्थात् ही घटना अगदीं असामान्य रूपाची आहे व या असामान्यत्वामुळेंच ती कांहींशी तर्कातीत असून तीपासून तर्कद्वारां न उमगणारीं अनेक विरोधात्मक व अनेक तात्त्विक कूटें निर्माण होतात.

अशा प्रकारचें उच्चोच्च श्रेणीच्या संमिश्र घटनेचें जगाचें स्वरूप असल्याचें मत ( Reality of the Unseen )[1] आतां पाश्चात्य तत्त्वज्ञांनाहि पटलेलें आहे. ज्याप्रमाणें केवळ दृश्य जगावरच भर देणाऱ्यांचा आधिक्षेपपूर्वक उल्लेख गीतेंत व अन्य उपनिषदांत 'नान्यदस्तीति वादिनः' ( भ. गी. २-४२),' 'अयं लोको नास्ति परः।' (कठ २-६) असा केला आहे त्याचप्रमाणें पाश्चात्य मानसशास्त्रज्ञ William James हा केवळ दृश्य घटनेपलीकडे ज्यांची दृष्टि गेली नाहीं त्यांना सकृज्ज ( Once born ) म्हणतो व ज्यांची दृष्टि यापेक्षां खोलांत शिरली आहे त्यांना द्विज (Twice born) म्हणतो. ही केवळ ' ब्रह्म जानाति ब्राह्मणः ' याचीच प्रत्युक्ति होय हें उघड आहे. गीतेंत निर्देशिलेली ही संमिश्र घटना आधुनिक शास्त्रविरोधी नाहीं तर ती आधुनिक शास्त्रमान्य आहे ही गोष्ट येथें नमूद करणें जरूर आहे. आधुनिक वास्तवशास्त्राची वस्तु ( Matter ) ही सच्छिद्र Porous आहे आणि या सच्छिद्रताधर्माची व्याप्ति अणुघटनेपर्यंत पसरली असून अणुघटना प्रोताणुबीजाणुसमुदायमय असून, ( १) या प्रोताणुबीजाणूंच्या दरम्यानच्या अवकाशांत

---

1. Reality of the Unseen, Lecture III. ( Varieties of Religious Experience, William James. Gifford Lectures ).

ईथररूपी घटना आहे; ( २ ) ती मानल्यानें Electro-Static Phenomena ची उपपत्ति नीटपणें लागते; ( ३ ) ती नसलीच पाहिजे असा भौतिक शास्त्रांना इष्ट धरण्याचें कारण नाहीं; फार तर ( ४ ) त्या शक्तीचें वास्तवशास्त्रांत कांहीं निश्चित कार्य नसेल, इत्यादि मतपर्याय वास्तवशास्त्रज्ञांत दिसून येतात. परंतु या विषयाचा सूक्ष्म अभ्यासक Sir Oliver Lodge हा ईथरला नुसती मूक मान्यताच देऊन थांबत नाहीं. तो त्याचे एक उच्च, अचर पण नियामक आणि दुसरा नीच, चर व नियमित असे सांख्याच्या पुरुष-प्रकृति-द्वैताच्या रूपाचे दोन भाग (Constitutional waves and Material waves) मानणारा असून जीवसंबद्ध नाना भावांचा संबंध या उच्चरूप ईथरशीं लागण्यासारखें त्याचें स्वरूप आहे असें मानतो.[1] राहतां राहिला एक प्रश्न व तो म्हणजे या दोन प्रकारच्या ईथरांच्या परस्पर संबधाचा होय. वेदांताच्या मतें जड घटना ही सूक्ष्म घटनेपासून उत्पन्न झालेली, तीमध्यें राहणारी व तीतच पुन्हा लय पावणारी ( तज्जलान्=तत्-ज-ल-अन ) अशी आहे; परंतु आधुनिक शास्त्रज्ञांना ती कल्पना मान्य असल्याचें सर्वत्र दिसून येत नाहीं. Bertrand Russelसारखे कांहीं शास्त्रज्ञ या उपपत्तीवर विश्वास न ठेवणारे आहेत, तर लॉर्ड केल्व्हिन्सारखे, अन्य कांही सूक्ष्म ईथरमध्यें गत्याधान झाल्यास त्यास प्रोताणुवीजाणूंचें स्वरूप येऊन त्यांच्या आकर्षणोत्सारणक्रियेनें जड घटना प्रत्ययास येणें शक्य आहे, असें प्रतिपादन करणारेहि आहेत. शिवाय विश्वांत वास्तवद्रव्य अगर प्रकृतिद्रव्य असें कांही नसून तो सर्व मायिक देखावा आहे, आणि प्राकृतिकद्रव्याचे अन्तिम घटक जे वीजाणू तेहि केवळ विद्युच्छक्तीचींच विशिष्ट रूपें होत ( All the mass of an electron is electromagnetic ) असेंहि अलीकडच्या वास्तवशास्त्रज्ञांचें मत होत चाललें आहे. पण हे वाद श्रीकृष्णाच्या कालांत नव्हते; व मध्यंतरींच्या जडवादी वास्तवज्ञांनीं नाकारिलेली सर्वव्यापी ब्रह्मशक्ति सांप्रत Electromagnetism या नव्या रूपानें पुन्हा प्रत्ययास येऊन श्रीकृष्णाच्या वेदान्तमताचेंच समर्थन करीत आहे. सबब आत्मा हा व्यक्तिरूप व वस्तुरूप

---

१. जास्त तपशिलाकरतां सर ऑलिव्हर लॉज याचें या विषयावर नुकतेंच प्रसिद्ध झालेलें Ether and Reality हें पुस्तक पहा.

असाहि द्विसंभाव्य आहे असें कँटच्या मताप्रमाणेंच म्हणून पुढें चालावयास हरकत नाहीं.

यानंतरचा दुसरा मुद्दा म्हणजे जड जगावर त्याला अन्तर्बाह्य व्यापून टाकणाऱ्या सूक्ष्म जगाचें नियमन असल्याचा होय. भगवद्गीतेच्या मांडणीप्रमाणें ईश्वर हा सर्व विश्वाचा चालक होय ( भ्रामयन् सर्व भूतानि यंत्रारूढानि मायया । भ. गी. १८-६३ ). आधुनिक वास्तव्यशास्त्रदृष्ट्या विद्युच्छक्तीनें जड जग किती व्याप्त व नियमित आहे, हें सामान्य वाचकांनादेखील ठाऊक असेल. व्यक्तिघटनेंतहि याच्च समष्टिघटनेचें प्रत्यंतर भरपूर सांपडतें. इंद्रियांचें नियमन मन करतें, व मनाचें नियमन बुद्धि करते हें तर उघड आहे. शिवाय वेदान्तशास्त्रांत या सर्वांचा नियामक आत्मा ( गतिभर्ता प्रभुः साक्षी निवासः शरणं सुहृत् । भ. गी. ९-१८ ) मानलेला आहे. कोणतेंहि कार्य घडून येण्यास ज्या पांच गोष्टींची जरूरी असते यांपैकीं दैव ही एक गोष्ट भगवद्गीतेमध्यें ( शरीरवाङ्मनो० । भ. गी. १८०-१४, १५ ) सांगितलेली आहे. हें दैव म्हणजे व्यक्तीचें प्राक्तन कर्म नव्हे तर व्यक्त्यतिगामी शक्तीच्या धोरणाशीं जुळतेपणा हा होय. या विवरणांतहि व्यक्तीवर इश्वरी नियमन असल्याची कल्पना स्पष्टपणें प्रत्ययास येते.

याहिशिवाय एक मुद्दा म्हणजे या वरिष्ठ नियंत्रणाच्या जोडीसच अन्य एक प्रकारचें कनिष्ठ नियंत्रण व्यक्तीवर असल्याचा होय. हें कनिष्ठ नियंत्रण जडप्रकृतीचें होय. वैश्वजीवितांत याला सृष्टिनियम ही संज्ञा आहे; व वैयक्तिक जीवितांत याला स्वाभाविक मर्यादा ( Constitutional Limitations ) म्हणतां येईल. निसर्गनियमांचें उल्लंघन ईश्वरालाहि करणें कठीण पडतें व त्यांचें पालन करण्याची जरूरी ईश्वरालाहि भासते (The Doctrine of necessity of the Western Philosophy). शिवाय या अडचणींचा अनुभव वैयक्तिक जीवितांत तर प्रत्येकाला येतो. अनेक बऱ्यावाईट गोष्टी कराव्याशा वाटतात; पण प्रकृति त्या करूं देत नाहीं. त्या प्रकृतीला मानवत नाहींत, म्हणून सोडून द्याव्या लागतात. अमर्याद ओढाताण करावी तर अनवस्था प्रसंग ओढवतो. हीच गोष्ट श्रीभगवान् ( सदृशं चेष्टते स्वस्याः इ०. भ. गी. ३-३३ ) या शब्दांत सांगतात. सबब "प्रकृतीवर भलतेंच नियंत्रण घालण्याच्या भरीस पडूं नकोस; त्या प्रयत्नांत यश येणार नाहीं, तूं ' स्वभावजेन कौन्तेय निबद्धः '

(भ.गी.१८–६०) आहेस; सबब सहजकर्मा ( Inherited Tendencies )चा त्याग करण्यास पात्र नाहींस, व स्वभावप्रभव कर्माच्या आधारावर उभारलेल्या वर्णाश्रमविहित कर्मापासून च्युत होऊं पाहशील तर मरणापेक्षांहि जास्त आपत्ती सोसाव्या लागतील, नुसतें कौरवांकडून मारलें जाण्यास तयार होण्यासच तुझें धैर्य कदाचित् तुला पुरेल, परंतु आजन्म एकसारखा स्वभावविरोध करणें तुझ्याच्यानें होणारच नाहीं," असें श्रीभगवान् अर्जुनाला व त्याच्या निमित्तानें सर्वांना सांगत आहेत.

या ठिकाणीं कदाचित् अशी एक आशंका निघणें शक्य आहे कीं, व्यक्ति ही याप्रमाणें वरून ईश्वरी नियंत्रण व खालून प्रकृतिनियंत्रण या जात्याच्या दोन तळ्यांच्यामध्यें भरडून काढली जाते आहे कीं काय, व असें असेल तर मग आत्मस्वातंत्र्य तें कोठलें? या प्रश्नाचें उत्तर एवढेंच कीं, व्यक्ति हा केवळ ईश्वरी नियंत्रण व प्राकृतिक नियंत्रण (Projection and Introjection or Centripetal movement and Centrifugal movement ) या दोन नियंत्रणांचा फक्त समवाय होय. व्यक्ति म्हणजे त्याच्या दरम्यान सांपडलेली तिसरी वस्तु नव्हे. आधुनिक सापेक्षतेच्या सिद्धान्ताप्रमाणें व्यक्ति ही ब्रह्मशक्तीमधील केवळ एक संघातपरंपरा (Series of Events) होय. जैवशास्त्रानुरूप व्यक्ति म्हणजे जाति-जीविताचा एक व्यापार (Function of the Species) होय व मानसशास्त्रानुसार व्यक्ति म्हणजे संवेदनांची ( Chain of States of Consciousness) मालिका होय. व्यक्तीचें स्वतंत्र अस्तित्व ही एक केवळ व्यावहारिक बाब होय. त्या कल्पनेचा सत्यपणा फक्त खानेसुमारीपुरताच. आद्यंतावस्थेंत व्यक्तीला कांहींच महत्त्व नाहीं. ( अव्यक्तादीनि भूतानि व्यक्तमध्यानि भारत। अव्यक्तनिधनान्येव तत्र का परिदेवना ॥ भ.गी.२-२८) याप्रमाणें व्यक्तीचें व्यक्तित्वच भ्रामक ठरल्यानंतर व्यक्तिस्वातंत्र्यहि अर्थात् केवळ नीतिशास्त्रानें स्वतःच्या सोयीकरितां व समाधानाकरितां उभें केलेलें बाहुलें होय. नाहीं म्हणावयाला, ज्या अर्थीं, प्रकृतिनियंत्रणांत उद्दिष्ट असलेली प्रकृति ही एक महत्ब्रह्मरूपी ब्रह्मघटनाच आहे पण ती परब्रह्मघटनेनें अन्तर्बाह्य व्यापतहि आहे, त्या अर्थीं ब्रह्मघटनेला तिचा कांहीं काळ विरोध होतोसा भासत असला तरी तो विरोध हाहि परब्रह्मशक्तीच्या आविर्भावाचाच एक प्रकार होय. अशा दृष्टीनें उच्च, व्यापक व अन्तिम सत्ता ही ब्रह्मसत्ताच ठरल्यानंतर

त्या उच्च शक्तीच्या अल्पकालीन व्यक्तिमय आविर्भावांत प्रत्ययास येणाऱ्या आत्मभावाला जेवढ्यापुरता वैयक्तिक व्यवहार खरा आहे तेवढ्यापुरतें स्वातंत्र्य आहे असें म्हणतां येईल.

याच अनुषंगानें आणखी ज्या एका मुद्याचा निर्देश करावयाचा तो मुद्दा म्हणजे या ब्रह्मशक्तीचें आविर्भाव व अन्तर्भाव या अवस्थांतून बावरण्याचें स्वेच्छाचारित्व हा होय. ब्रह्मशक्ति स्वतःमध्यें स्वतःपासूनच जगाचा आविर्भाव करूं शकते व प्रसंगविशेषीं या स्वतःच्या आविर्भावाशीं उत्कटतेनें ऐक्य पावूं शकते. समष्टिदृष्ट्या जग, ह्याप्रमाणें, ब्रह्मवस्तूचा पूर्ण आविर्भाव ( Full Projection ) होय. व्यष्टिदृष्ट्या व्यक्तिहि याचप्रमाणें ब्रह्मरूपी आत्मभावाचा पूर्ण आविर्भाव (Full Projection) होय. परंतु याप्रमाणें स्वतःच्या आविर्भावांत उत्कटपणें प्रत्ययास येणें न येणें, ही ब्रह्मशक्तीच्या अन्तिम स्वातंत्र्याच्या मर्यादेंतील बाब आहे. रागावलेला, अहंमन्य* प्राणी हा आत्म्याचा पूर्ण आविर्भाव होय. या वेळीं त्याला आपल्या ठिकाणीं व्यक्तित्व पूर्णपणें आविर्भूत झालेलें (Projected Individuality) प्रत्ययास येतें. याच्या उलट दिशेची म्हणजे कल्पान्ताची ब्रह्मशक्तीची एकरूप, समष्टिरूप अवस्था म्हणजे (Introjected Individuality) होय. या दोन टोकांच्या दरम्यान् ब्रह्मशक्ति ही उत्क्रान्ति व संस्कृति या दोन फळ्यांच्या झोंपाळ्यावर बसून आंदोलनलीलासुख अनुभवीत असते. व्यक्ति ही ज्याप्रमाणें गाढ झोंपेंत, अर्धवट जागी, सामान्य मनोवस्थेंत, किंवा परमावधीच्या अहंकारानें युक्त, अशी निरनिराळ्या अवस्थांत असूं शकते त्याचप्रमाणें ब्रह्मशक्तिहि अद्वैत, विशिष्टाद्वैत, द्वैत इत्यादि अगर ब्रह्म, ईश्वर, प्रकृति इ. संज्ञांनीं वर्णिलेल्या भावांत वास्तव्य करूं शकते. एकाद्या भरड व सव्यंग उपमेनें ही स्थिति वर्णन करावयाची असल्यास शरीराला व्यापून असणाऱ्या मज्जाशक्तीचा किंवा त्याच्याच अनुषंगानें वावरणाऱ्या रक्ताचा शरीराच्या कधीं एका अवयवांत तर कधी दुसऱ्या अवयवांत उत्कटपणें आविर्भाव झालेला प्रत्ययास येतो.

---

* सोऽयमात्माचतुष्पात् जागरित स्थानो बहिप्रज्ञः इ. इ. । माण्डुक्योपनिषत् । प्रस्तुत गीतेच्या १६ व्या अध्यायांत वर्णिलेल्या आसुरी संपत्तीनें युक्त असलेल्या व्यक्ती या प्रकारच्या पूर्ण आविर्भावाचें उत्तम उदाहरण होत.

रागानें चेहरा लाल होतो, अगर हस्तपादादि कार्यकारी अवयवाचें स्फुरण होऊं लागतें. लज्जे( Bashfulness )नें गालावरच फक्त गुलाबी छटा येते, भीतीनें चेहरा फिक्का पडतो, शरमेनें तो काळवंडतो, निराशेनें अवयव लुले पडतात, व परमावधीच्या मानसिक आघातानें सर्व शरीरहि निश्चेष्ट पडेल. या नाना अवस्थांतून व्यक्तिगत आत्मशक्तीचा आविर्भावअंतर्भाव ज्याप्रमाणें वारंवार प्रत्ययास येतो त्याचप्रमाणें विश्वांतहि या ब्रह्मशक्तीच्या अन्तर्भावआविर्भावाचे अनेक प्रकार प्रत्ययास येतात. वास्तवशास्त्राच्या भाषेंत हें एक प्रकारचें आधींच विद्युच्छक्तिमय असलेल्या बीजाणूंचें किंवा त्यांच्या मिळून बनलेल्या वस्तूंचें ( उदाहरणार्थ पोलादाचें ) विद्युद्धारण ( Electrification ) म्हणतां येईल. ब्रह्मशक्तीच्या अंगीं याप्रमाणें स्वतःच्या विशिष्ट अवस्थेशीं उत्कटपणें तादात्म्य पावण्याचा अगर तेथून परावृत्त होण्याचा जो धर्म आहे त्याचें वर्णन " निर्गुणं गुणभोक्तृत्व"च ( भ. गी. १३-१४ ) इत्यादि वाक्यांनीं गीतेंत केलेलें आहे. संगाचें आधान अगर त्याग या क्रिया व्यक्तिगत आत्मतत्त्वाला स्वेच्छेनें करतां येतात. कधीं जडप्रवण बनून देहावरच आत्मभाव आरोपित-आरोहित करतां येतो व जरूर तर तो तेथून काढून त्याचा समष्टिरूपांतहि लय करतां येतो.[1] अर्थात्च हें स्वभावाचें स्थलांतर ज्या अवस्थेंत करावें त्या अवस्थेला अनुरूप असा जगाचा बरावाईट अनुभव येतो. वैश्वशक्तीच्या या प्रकारच्या आविर्भावाला अवतार ही संज्ञा आहे व व्यक्तिगत शक्तीच्या आविर्भावालाहि " अवतार " हेंच नांव लाक्षणिक अर्थानें दिलें जातें.

येथवर सामान्यतः श्रीकृष्णानें अर्जुनास प्रतिपादिलेल्या उपनिषत्तत्त्वज्ञानाचा थोडासा विचार झाला.

## प्राकृत जगाशीं वागण्याचें शास्त्र अथवा कर्मयोगशास्त्र

याप्रमाणें विश्वघटना व व्यक्तिघटना ही प्रत्येकीं समरूप व त्रिसंमिश्र ठरल्या-नंतर व व्यवहारापुरत्या खऱ्या असलेल्या व्यक्तीला जगाशीं वागण्याबाबत व्यक्तिगत आत्म्याचें मर्यादित स्वातंत्र्य आहे असें ठरल्यानंतर व्यक्तीनें जगाशीं वागतांना कोणत्या धोरणानें वागावयाचें हा प्रश्न ओघानेंच येतो. भगवद्गीतेचें

---

१. या प्रकारें व्यक्तिगत आत्म्याचें अवस्थांतर करणाऱ्या मानसक्रियेला पातंजलयोग ही संज्ञा आहे.

या प्रश्नाचें उत्तर असें आहे कीं, ज्या अर्थी व्यक्तिघटना ही समष्टिघटनेप्रमाणेंच आध्यात्मिक, आधिदैविक व आधिभौतिक अशा तिहेरी संमिश्र नमुन्याची आहे त्या अर्थी व्यक्तीच्या आचरणाचेहि या तीन प्रकारांना अनुसरून तीन भाग पडून व या तिन्ही भागांचें मिळून जें संमिश्र वर्तन, तेंच वर्तन म्हणजे व्यक्तीचें समष्टीच्या स्वभावाला अनुसरून असणारें, स्वाभाविक वर्तन होय. हें, अर्थात्, या विषयाचें सामान्य प्रतिपादन होय. तपशिलांत शिरून पाहतां, अध्यात्म-सृष्टि ही ज्ञेय, ज्ञानगम्य व ज्ञानरूपच आहे ( 'ज्ञानं ज्ञेयं ज्ञानगम्यं'। भ. गी. १३–१७ ). सबब व्यक्तीचें या आध्यात्मिक क्षेत्रांतील कार्य म्हणजे ज्ञानसंपन्न होणें हें होय. गीतेंत या ज्ञानसंपन्नतेची महती भरपूर गायिलेली आहे व त्याकरितां प्रयत्न करण्याची जरूरीहि सर्वत्र प्रतिपादिलेली आहे. गीतेंतील पातंजल योगाचें विवरण हें या ज्ञानप्राप्तीच्या एका साधनपर्यायाचें विवरण होय, हें उघड आहे. हा एकंदर विभाग ज्ञाननिष्ठेचा होय असें फारच थोड-क्यांत म्हणतां येईल. शुद्ध ज्ञाननिष्ठा ही मात्र अगदीं एकेरी निष्ठा होय.

आध्यात्मिक सृष्टीनंतर आधिदैविक सृष्टीचा क्रम लागतो व आधिदैविक सृष्टींत विराट, विश्वव्यापी ईश्वर व त्याचा वैयक्तिक देहव्यापी अखंडांश जीव यांच्या परस्पर संबंधाचा प्रश्न येतो. अर्थात्‌च विश्वगत ईश्वर हा त्याच्या व्यक्तिगत अंशापेक्षां अत्यंत विशाल व अत्यंत शक्तिमान् असल्यामुळें व व्यक्तिगत ईश्वराला मर्यादांचें बंधन अधिक असल्यामुळें व्यक्तिगत ईश्वरांशानें समष्टिगत ईश्वराशी नमून, त्याचा आश्रय, प्रेम व यथाशक्य ऐक्य संपादन करण्याच्या पद्धतीनें, म्हणजे थोडक्यांत, भक्तिनिष्ठ अन्तःकरणानें वागावें हें उचित ठरतें. या विशाल विश्वाच्या विलक्षण व्यवहारांत अनेक आधिव्याधींनीं व्यापलेली व महद्दुःखदायक मृत्यूच्या दाढेंत दडलेली एकाकी मानवव्यक्ति ही वाळवंटावरील वाळूच्या कणाप्रमाणें कःपदार्थ आहे; आणि अशा असहाय अवस्थेंत दीनदयाघन अशा मूर्त ईश्वराचा जर त्याला आपलेपणाचा आश्रय नसेल तर नीतिनियमित निष्कामकर्माच्या कोरड्या किर-किरीला कोण कवटाळील? पण, उलटपक्षीं, ईश्वरासारखा दिव्य मार्गदर्शक आश्रयदाता भेटल्यास व्यक्ति कोणतें दिव्य करण्यास धजणार नाहीं? अशी वस्तुस्थिति असल्यामुळें भक्तियुक्त अन्तःकरणानें ईश्वराचें साहाय्य संपादन करणें हें जीविताच्या पूर्णतेस अगदीं जरूर आहे हें जाणून श्रीकृष्णानें

भगवद्गीतारूपी कर्मयोगशास्त्रांत भक्तिनिष्ठेला जें योग्य स्थान दिलेलें आहे तें अत्यंत विचारार्ह आहे यांत शंका नाहीं. मात्र ही भक्तिनिष्ठा भक्तिमर्यादेंतच थांबेल तर ती अपूर्ण राहील. भक्तिनिष्ठेच्या जोडीस ज्ञाननिष्ठाहि असली पाहिजे.

यानंतरचा क्रम जड प्राकृतिक जगाचा येतो. या जगांतील व्यक्तीचा प्रतिनिधी म्हणजे त्याचा जड प्राकृतिक देह होय. या जगांत आध्यात्मिक सृष्टींतील ऐक्य नाहीं, की आधिदैविक सृष्टींतील प्रेमहि नाहीं, येथें सर्व खेळ द्वैताचा आहे. येथें एक वस्तु दुसऱ्या वस्तूला चिकटतदेखील नाहीं, तर त्यांच्या मध्यें आकर्षणोत्सारणाची एकसारखी दंगल, खेंचाखेंच, धक्काधक्की, अगदीं लढाई चालू आहे. युद्धादि कर्म ह्या जड सृष्टीतच होत असतें आणि त्याचीं बरींवाईट फळें या जड सृष्टींत रोकड मिळतात. कदाचित् कालावधि लागेल व फलभोग स्वतःच्या प्राकृतिक घटनेच्या संततीलाहि प्राप्त होईल. पण तो प्राप्त झाल्यावांचून राहणार नाहीं. अशी जेथें खरोखर सार्वत्रिक स्थिति प्रचलित आहे तेथें व्यक्तीलाहि त्याचप्रमाणें इतरांशीं न वागून कसें चालणार? कर्मे केल्यावांचून भागत नाहीं व कर्मे सोडल्यानें सुटत नाहींत. व्यक्तीच्या जड देहालाहि इतरांच्या जडदेहाशीं आकर्षणोत्सारणाच्या पद्धतीनेंच वागलें पाहिजे. शिवाय कर्माचें बंधकत्व कर्मफलाविषयीं आशा व ममत्वबुद्धि ठेवल्यानें, कर्माचें फल स्वतःस मिळावें या भावनेनें कर्मे केल्यानें, उत्पन्न होतें; एरवीं नाहीं. केवळ प्रवाहपतितरीत्या, निर्ममनिःस्वार्थबुद्धीनें, परार्थबुद्धीनें, फक्त लोकसंग्रहार्थ, कर्म करीत राहिल्यास कर्माबद्दलचें पापपुण्य, त्याचा जीवितोत्तर फलभोग, त्याकरितां पुन्हां जन्म, इत्यादि संसृतिचक्रांत गोते खाणें उरत नाहीं. ही कर्मनिष्ठा होय व हाच श्रीकृष्णानें अर्जुनास रणभमीवर दिलेला युद्धोपदेश होय. मात्र असें करीत असतांच आपलें आत्मत्व केवळ जडबद्ध करून तेथेंच थांबवितां उपयोगी नाहीं, तर आपलें व जगाचेंहि उच्च स्वरूप केवळ जड व प्राकृत नसून तें दिव्य व सच्चिदानंदब्रह्ममय आहे हें ओळखून, त्याच उच्च भावाबाबत जागृत राहून, व्यक्तिगत आत्म्याचा कल तिकडे झुकता ठेवून, आत्मद्वारां अध्यात्मसृष्टींत तल्लीन असतांना, जीवद्वारां ईश्वर चरणारविंदीं मिलिंदायमान होत असतांनाच, जडजगांत मात्र "ये यथा मां प्रपद्यन्ते तांस्तथैव

भजाम्यहं " या नमुन्याचा, आकर्षणोत्सारणाचा, धक्काधक्कीचा, जशास तशाचा, ठोक्यास ठोक्याचा न्याय पाळण्यानेंच वैयक्तिक जीवित सामष्टिक जीविताशीं समरूप होतें, अशी श्रीभगवंताची गीतेंतील शिकवण आहे. शिवाय जें काय करावयाचें नसतें ते म्हणजे या त्रिसंमिश्र जगाशीं त्रि-संमिश्र निष्ठेनें न वागतां एका जगांत व्यवहार करतांना, भलत्याच जगांत योग्य अशा निष्ठेचा अवलंब त्या जगांत करणें हें होय. नाहीं तर धक्काधक्कीच्या कर्मनिष्ठेचा उपयोग ईश्वराशीं, भक्तिनिष्ठेचा उपयोग ब्रह्मशक्तीशीं व ज्ञाननिष्ठेचा उपयोग व्यावहारिक जगांत होऊन सगळा घोंटाळा उडावयाचा. अर्जुनाच्या व्यामोहाचें खरें कारण हेंच होतें. तो जड जागतिक व्यवहारांत आध्यात्मिक सृष्टीतील शुद्ध नीतितत्त्वें वापरूं पहात होता. जगाचें ईश्वराकडे असलेलें नियंतृत्व तो स्वतःकडे घेऊ पाहून मी मारणारा व अन्य मरणारे असें मानीत होता. शत्रूंच्या सदोष प्राकृतिक घटना याच त्यांचा आध्यात्मिक भाव मानून तो भाव नाशवंत व स्वतःच्या हातून नाश पावण्यास पात्र असें तो समजत होता. हें त्याचें तत्त्वज्ञान व त्यावर उभारि-लेल्या पापपुण्यांच्या त्याच्या नैतिक भावना चुकीच्या होत्या. श्रीकृष्णानें हें सर्व लक्ष्यांत घेऊन त्याला जगाचें वास्तविक स्वरूप दाखवून दिलें व त्याला ज्ञानपूर्वक भक्तियुक्त कर्माचरण युद्धभूमीवर करण्याचा सल्ला दिला. शिवाय दुसरी गोष्ट अशी कीं, प्राकृतिक विश्वघटना हीहि एक ब्रह्मघटनाच आहे. ती ब्रह्मरहित नाहीं. जगांत अब्रह्ममय असें कांहीं नाहींच. सबब त्या प्राकृत सृष्टीच्या नियमांचें किंवा, अन्य शब्दांत, श्रीकृष्णासारख्या महापुरुषांनीं घालून दिलेल्या वर्णाश्रमधर्माचें पालन हें एक प्रकारचें आत्मसाधनच होय, हें विसरून भागावयाचें नाहीं. तें विसरल्यानें व्यक्तित्वास अपूर्णत्व येतें. सबब या त्रिसंमिश्र विश्वघटनेशीं त्रिसंमिश्र आचरण हेंच जें स्वाभाविक आचरण तें ठेवा; आणि प्राकृतिक सृष्टीत प्राप्तकालकृति, ईशसृष्टींत ईश्वरशरणागति व ब्रह्मसृष्टींत अविचल आनंदमय स्थिति यांचा अखंड अनुभव घेत रहा, यामुळेंच जीवित समृद्ध व संपूर्ण होईल, असा गीतेचा दिव्य उपदेश आहे. या त्रिसंमिश्र आचरणास ज्ञानपूर्वक भक्तियुक्त कर्मनिष्ठा असें नांव भगवद्गीतेंत दिलेलें आहे आणि ह्या संमिश्र घटनेच्या व तदनुरूप योग्य अशा संमिश्र आचरणाच्या विवरणालाच गीतेचा अध्यायविस्तार वाहिलेला आहे.


अध्यात्मचेतसा
मयि सर्वाणि कर्माणि संन्यस्य
निराशीर्निर्ममो भूत्वा
युध्यस्व विगतज्वरः
प्राकृतिक जडसृष्टि
आविर्भाव
आविर्भाव
श्री
कृष्ण
भीष्म
अर्जुन
ईश-सृष्टि
ज्ञानपूर्वक भक्तिनिष्ठा
ज्ञान-निष्ठा
ॐ
सर्वं खल्विदं ब्रह्म

---

वालोयान प्रेस, पुणें.

गीतेंत उद्दिष्ट असलेल्या विश्वघटनेचें व तदनुरूप व्यक्तीच्या स्वाभाविक आचरणाचें चित्र काढणें हें सोपें नाहीं. तथापि केवळ प्रयत्न म्हणून तें समोर दिल्याप्रमाणें काढतां येईल.

---

**चित्राचें स्पष्टीकरण**—श्रीभगवद्गीतेच्या मांडणीप्रमाणें विश्व हें आंत-आंतल्या घटनांस अन्तर्बाह्य व्यापून असलेल्या आध्यात्मिक, आधिदैविक व आधिभौतिक अशा त्रिसंमिश्र स्वरूपाचें आहे. या तीन घटनांना अनुक्रमें ब्रह्मसृष्टि, ईशसृष्टि व प्राकृतिकसृष्टि असेंहि म्हणतात. चित्रांत भोंवतीं अन्तर्बाह्य व्यापून असणारें अनिर्देश्य अनंतब्रह्म अगर ब्रह्मसृष्टि आहे. त्या सृष्टीचा प्रथम अविर्भाव म्हणजे ईशसृष्टि व त्याच सृष्टीचा त्याहि पुढचा आविर्भाव म्हणजे प्राकृतिक जडसृष्टि. कुरुक्षेत्र ही प्राकृतिकसृष्टि प्रथम ईशसृष्टीनें व नंतर ब्रह्मसृष्टीनें अन्तर्बाह्य व्याप्त आहे. या कुरुक्षेत्रावरील सर्व वस्तु, सर्व व्यक्ती, या ब्रह्मसृष्टीचा आविर्भावच होत. त्यांपैकीं भगवान् कृष्ण हा महान् आविर्भाव अगर अवतार होय व त्याच्या सभोंवारचे अर्जुनभीष्मादि लहान आविर्भाव होत. ते फक्त जडसृष्टींनच पृथक् आहेत. ईश्वरसृष्टींत ते थोडेफार संमिश्र आहेत व ब्रह्मसृष्टींत ते एकच आहेत. त्यांची प्रत्येकाची घटना प्राकृतिक, ईशरूप व ब्रह्मरूप अशी त्रिसंमिश्र आहे. प्रत्येकाचें ब्रह्म सृष्टींतील कार्य म्हणजे ज्ञानप्राप्ति करून घेणें हें होय. हीच ज्ञाननिष्ठा. प्रत्येकाचें ईशसृष्टींतील कार्य ईशसृष्टीच्या ब्राह्म व ऐश अशा द्विसंयुक्त घटनेनुसार ज्ञान व भक्ति या दुहेरी प्रकारचें होय. हीच भक्तियुक्त ज्ञाननिष्ठा. अखेरच्या, सर्वांतील अन्तस्थ प्राकृतिक सृष्टीच्या ब्राह्म, ऐश व जड घटनेनुसार या सृष्टींतील व्यक्तीचें कार्य म्हणजे, थोडक्यांत, ज्ञानपूर्वक भक्तियुक्त कर्मनिष्ठा हें होय. याच त्रिसंयुक्त जडजगाच्या तिन्ही अंगांना उद्देशून त्या त्या क्षेत्रानुसार तें तें कार्य होण्याचें चुकून राहूं नये म्हणून केलेल्या गीतोपदेशाचा जो एक श्लोक येथें देतां येईल तो श्लोक चित्रांत यथाशक्य विभागून दाखविल्याप्रमाणें

मयि सर्वाणि कर्माणि संन्यस्याध्यात्मचेतसा ।
निराशीर्निर्ममो भूत्वा युद्ध्यस्व विगतज्वरः ॥ १३-३० ॥ ६८७

हा होय.

या चित्रित विश्वघटनेस व तत्पूर्वविवेचनपद्धतीस अनुसरून प्रथम केलेली गीतरचना कशा तात्त्विक स्वरूपाची असेल याची आतां कल्पना करणें सुलभ होय असें मानून त्या कल्पनेच्या सिद्ध्यर्थ प्रयत्न आतां करणें इष्ट होईल. या दृष्टीनें पाहूं जातां ही आद्यरचना स्थूलमानानें पुढें दिलेल्या स्वरूपाची असेल असें म्हणावयास फारशी हरकत वाटत नाहीं.

प्रथमाध्याय हा अध्याय केवळ प्रास्ताविक मानावयास हरकत नाही. कुरुक्षेत्राच्या रणभूमीवर कौरवपांडवांचीं सैन्यें उभीं आहेत, श्रीकृष्णार्जुन तेथें रथांत बसून येतात, अर्जुन उभय सैन्यांत स्वतःचे गुरुजन, आप्त, मित्र वगैरे पाहतो व आपण ज्या युद्धाला आतां सुरुवात करणार त्या युद्धांत हे सर्व बहुधा मरणार, हें पाहून त्याच्या अन्तःकरणांत दयेची मृदु भावना प्रवेश करते, त्याचा क्षात्रनिश्चय डळमळून कोसळतो, तो लढण्याचें नाकारतो, व धनुष्यबाण खालीं ठेवून श्रीकृष्णास शरण जाऊन, स्वतःस योग्य मार्ग दाखविण्याबद्दल विनंति करतो.

द्वितीयाध्यायांत श्रीकृष्ण प्रथम सामान्य प्रोत्साहनाचा अवलंब करतात, व तो अपुरा पडतो असें त्यांना दिसून येतांच ते उपनिषदांतर्गत अध्यात्मतत्त्वज्ञान अर्जुनास सांगून युध्यमान वीरांच्या प्राकृतघटना याच काय त्या जन्ममरणचक्रपरंपराहै आहेत, त्यांचा व आपला सर्वांचा आत्मा एकच व तो अमर व अविनाशी आहे, सबब क्षात्रधर्म पालन करतांना शत्रुहत्या करावी लागली तर त्यांत पाप वगैरे कांहीं नाहीं, मात्र या सर्व क्रिया निर्ममत्वबुद्धीनें व समबुद्धीनें केल्या पाहिजेत असें सांगतात.

श्रीकृष्णाच्या या विवरणानें अर्जुनाचें समाधान न होतां उलट तें विवरण त्यास बरेंच दुर्बोध वाटून तो तें समजावून घेण्याकरतां 'किं तत् ब्रह्म किमध्यात्मं' इत्यादि सात प्रश्न विचारतो. श्रीभगवान् या प्रश्नांचीं उत्तरें प्रथम सूत्रात्मक रूपांत देतात व नंतर पुढें प्रत्येक प्रश्नोपप्रश्न सूक्ष्म विवरणाकरितां हातीं घेऊन त्याचा एकेका पृथक अध्यायांत विचार करतात.

तृतीयाध्यायांतील अक्षरब्रह्मयोगांत ब्रह्मशक्तीचें विवरण आलें असून, ज्या अर्थीं ही ब्रह्मशक्ति ज्ञानाचा विषय आहे, त्या अर्थीं त्या शक्तीशीं व्यक्तीचें आचरण म्हणजे ज्ञानद्वारां तिची प्राप्ति करून घेणें हें होय. आणि म्हणून त्या पुढील ज्ञानयोगाच्या अध्यायांत ज्ञाननिष्ठेवर श्रीभगवंतानीं भर दिलेला आहे.

यानंतरच्या विवरणाचा क्रम ब्रह्मशक्तीपासून प्रस्तुत प्राकृतिक जग ज्या क्रमानें आविर्भूत झालें त्या क्रमानें त्याचें वर्णन करण्याच्या व त्या क्रमांतील निरनिराळ्या अवस्थांशीं व्यक्तींचें आचरण कसें असावें हें प्रतिपादण्याच्या दुहेरी क्रमाचा आहे हें स्पष्ट करणें जरूर आहे. एकीकडे ब्रह्मशक्तीपासून जग कसें आविर्भूत (Projected) झालें याचें विवरण, व त्याच्याच जोडीस प्रत्येक विशिष्ट आविर्भावाशीं आपल्या कोणत्या समान आविर्भावानें व्यक्तीनें कशा प्रकारें वागावयाचें याचेंहि विवरण आहे; व ही तात्त्विक आणि व्यावहारिक अशा दुहेरी प्रकारची दृष्टि गीतेंत अथपासून इतिपर्यंत वापरलेली आहे. या ब्रह्मशक्तीचा वैयक्तिक अनुभवसिद्ध असा जो आत्मभाव त्याचें विवरण पांचव्या पुराणपुरुषोत्तमयोगांत असून ज्या मानसप्रक्रियेनें हा पुराणपुरुष आराधनीय आहे त्या पातंजलयोगाचें वर्णन सहाव्या आत्मसंयमयोगांत केलेलें आहे. ७, ८, ९ व १० या अध्यायांतील विवरण प्रामुख्यानें अधिदैवक्षेत्रांतील आहे. वेदान्ताच्या विश्वोद्भवशास्त्रानुसार ब्रह्मशक्तीपासून उद्भवलेला पहिला आविर्भाव हा जो हिरण्यगर्भ अगर ईश्वर त्या भावाचें यांत विवरण आहे. सप्तमाध्यायांतील राजविद्याराजगुह्ययोगांत या ईश्वरी भावाचें वर्णन असून तदनंतरच्या विभूतियोगाच्या अध्यायांत ब्रह्मशक्तीचा आविर्भाव याहिपेक्षां पुढील एका पायरीवर नेला आहे. ही पायरी म्हणजे चर्मचक्षूंनीं दिसणाऱ्या साध्या जगांतहि ईश्वराचा आविर्भाव अगर विभूतिमत्व ठिकठिकाणीं प्रत्ययास येत असल्याची होय. त्यांतहि शेवटीशेवटीं तर हा आविर्भाव श्रीकृष्ण व अर्जुन ( वृष्णीनां वासुदेवोऽहं पाण्डवानां धनंजयः। भ. गी. १०-३७ ) यांच्यापर्यंत, अगदीं थेट अर्जुनापर्यंत आणून पोहोंचविला आहे. यांतील कलेचा भाग हा दिसतो कीं, द्वितीयाध्यायांत अर्जुनाचें व्यक्तित्व पूर्णपणें लयास जाऊन तो पूर्ण अन्तर्मुख, ( Introvert )[1] अगदीं मुमूर्षु (माम्...धार्तराष्ट्रा रणे हन्युस्तन्मे क्षेमतरं भवेत्। भ. गी. १-४६)

---

१. Introvert, Extrovert, Projection, Introjection ह्या मानसपृथक्करणशास्त्रीय संज्ञा येथें वापरण्याची युक्तता पूर्णपणें पटवून घेण्यास मानसपृथक्करणशास्त्रा( Psycho-analysis )वरील ग्रंथ जिज्ञासूंनीं अवश्य वाचावेत.

बनला होता. ही अवस्था कार्यप्रेरक नव्हे हें उघड आहे. कारण कार्य काय तें जडसृष्टींतच होत असतें. सबब अर्जुनाच्या आत्मतत्त्वास श्रीकृष्णांनीं हळू हळू क्रमाक्रमानें युक्तीयुक्तीनें खेचून त्यास अर्जुनाच्या देहावर आणून स्थापिलेलें आहे. अर्जुनाच्या ठिकाणीं श्रीकृष्णांनीं आविर्भूत ( Projected Individuality ) व्यक्तित्व पूर्णपणें प्रकट करण्यांतच त्याजकडून जड-सृष्टींत कार्य करून घेणें शक्य होतें. सबब त्या मार्गाचा अवलंब श्रीकृष्णांनीं केलेला आहे, ही गोष्ट लक्ष्यांत ठेवण्यासारखी आहे. गीतेंतील विश्वरूप-दर्शनयोगाचा अध्याय गीतेचा अत्यंत महत्त्वाचा अध्याय मानण्याचा प्रघात आहे. पण कार्यदृष्ट्या पाहतां हें महत्त्व खरोखर बिभूतियोगाचें आहे. या योगांत ब्रह्मशक्तीच्या आविर्भावाचा कळस महापुरुष श्रीकृष्ण व महावीर अर्जुन या कुरुक्षेत्रावर उभे असलेल्या नरनारायणाच्या जोडींत करून दाख-विलेला आहे. खरोखर, गीतामंदिरांतील सर्वांच्या वरचा मजला हा होय.

तदनंतर नवव्या विश्वरूपदर्शनाध्यायांत त्या ईश्वरी भावानें सर्व विश्व कसें व्यापलें आहे तें स्पष्ट केलेलें आहे. या अध्यायाचा विशेष हा की, यांत श्रीकृष्णानें अर्जुनास प्रथम पूर्णपणें वश ( Hypnotised ) करून नंतर ईश्वर ज्या प्रकारें रणक्षेत्रावरील व्यवहाराचें नियमन करीत असल्याची श्रीकृष्णाची स्वतःची कल्पना आहे, त्या कल्पनेचें चित्र उठावदार रीतीनें व प्रतिभासंपन्न काव्यद्वारां अर्जुनाच्या मनावर ठसून राहील असें पाडलेलें आहे. वशीकरण-विद्या ही अत्यंत प्रभावशाली विद्या किंवा कला असल्याचें आतां सर्वमान्य होत चाललें आहे, आणि महापुरुष श्रीकृष्ण या कलेंतहि पूर्ण पारंगत असल्यामुळें त्याला हें महद्दृश्य अर्जुनास दाखवितां आलें यांत शंका नाहीं.

दहाव्या अध्यायांत पूर्वनिर्दिष्ट ईश्वरभावाशीं व्यक्तीनें भक्तियुक्त अंतः-करणानें वागण्यानेंच वैयक्तिक जीविताला पूर्णता येते असें सांगितलें आहे. भक्तीची किमान मर्यादा येथें उपदेशिलेली असून भक्तांचीं लक्षणें यांत सांगितलीं आहेत.

यानंतरचें कार्य याच्यावरील शिखराचें म्हणजे आधिभौतिक सृष्टीच्या स्वरूपाविष्करणाचें होय व तें, विज्ञानयोग, अधिभूतयोग, गुणत्रयविभाग-योग व देवासुरसपद्विभागयोग या नांवांच्या अध्यायांतून क्रमाक्रमानें केलें आहे. प्रथम प्रकृतीची दैवी उत्पत्ति सांगून नंतर नाना प्राकृतिक मानवी

देहांच्या द्वारें एकच आत्मतत्त्व अनेक प्रकारें कसें प्रत्ययास येतें तें सांगितलें आहे. नंतर गुणत्रयविभागयोगांत नाना प्राकृतिक घटनांचे प्रकार कसे उद्भवतात तें सांगितलें आहे. व अखेरीस जगांत आसुरी संपत्तीच्या लोकांनीं कसा थैमान, कसा धुमाकूळ माजविलेला आहे याचें उत्तम वर्णन केलें आहे. देवासुरसंपाद्विभागांत दैवी संपत्तीचें वर्णन सुरुवातीस केवळ पार्श्वभूमिकेपुरतें त्रोटक असून मुख्य चित्र आसुरी संपत्तीच्या खळभळाटानें रंगविलेलें आहे. याचा हेतु अर्थात् प्रकृतीच्या सत्त्व, रज व तम या तीन गुणांच्या न्यूनाधिक संयोगामुळें या जड जगांत आसुरी संपत्तीनें युक्त अशा अत्यंत तापदायक व्यक्ती उत्पन्न होतात व त्यांचें उच्चाटन करणेंच रास्त असतें, एरवीं त्या बलिष्ठ होऊन दैवी संपत्तीच्या व्यक्तींना ग्रासून टाकतील, ही गोष्ट अर्जुनाच्या नजरेस स्पष्टपणें आणणें हा होय. विभूतियोगांत अर्जुनाच्या ठिकाणीं व्यक्तित्व पूर्णपणें जागृत केल्यानंतर त्याला जगांतील या कठोर घटना ( Hard Realities ) दाखविण्यानेंच त्यांच्याशीं दोन हात करण्याची स्फूर्ति त्याला होणार होती ही गोष्ट मानसशास्त्रज्ञ श्रीकृष्णानें नीट जाणली होती. निजलेल्या शिकाऱ्यास हळूहळू जागें करून, त्याच्या हातांत भरलेली बंदुक देऊन, त्याच्या पाठीशीं उभें राहून, त्यास क्रूर वाघ दाखवून देऊन मग गोळी झाडण्यास सांगण्याचा हा अत्यंत कुशल प्रकार होय हें उघड आहे. यापैकीं क्रूर वाघ दाखवून देण्याचें कार्य दैवासुरसंपद्विभागांत श्रीकृष्णानें केलेलें आहे.

राहतां राहिलेला प्रश्न या दुष्ट प्राकृतिक जगाशीं याथातथ्य न्यायानें वागण्याच्या निष्ठेचा अगर कर्मनिष्ठेचा प्रश्न, व तो पुढील कर्मयोग, कर्मब्रह्मार्पणयोग व कर्मफलसंन्यासयोग या तीन अध्यायांतून व शेवटच्या विषादनिरसनयोग नामक उपसंहारात्मक अध्यायांतून सोडविलेला आहे. कर्म हा जडसृष्टीचा नियम आहे; त्या नियमाचें उल्लंघन जडदेहधारी जीवांना करणें शक्य नाहीं; कर्में सोडूं म्हटल्यास सुटत नाहींत; तसा हट्ट करूं जावा तर उलट विपरीत कर्म मात्र घडतें; कर्माचें फल जड जगांतील जडदेहास येथल्या येथेंच मिळाल्यावांचून रहात नाहीं; कर्माचें बंधकत्व व त्याकरितां पुनर्जन्ममरणपरंपरारूपी संसृतिचक्र हे सर्व कर्त्याच्या मनाचे खेळ, कर्त्याच्या ठिकाणीं कर्माबद्दल असलेल्या ममत्वबुद्धीचे परिणाम होत, सबब तेवढी ममत्वबुद्धि टाकून व फलाचें बंधन नको असल्यास फलाशा टाकून,

जडसृष्टींत जडदेहानें कर्म करण्यानें पाप लागत नाहीं; कर्में ईश्वरार्पण बुद्धीनें, व व्यावहारिक जगांत निःस्वार्थ बुद्धीनें, परोपकाराकरितां, लोककल्याणाकरतां व लोकसंग्रहाकरितां करावींत व जीं करावींत तीं स्वभावजन्य, सहजात, स्वतःच्या वर्णाश्रमधर्माला विहित असलेलीं, व स्वतःपेक्षांहि उच्च असलेल्या समाजघटनेस पोषक असतील अशींच असावींत, म्हणजे अनायासेंच त्यांना अतिवैयक्तिक स्वरूप येऊन त्यांचें वैयक्तिकबंधकत्व नाहीसें होतें असा हा अखेरचा युक्तिवाद होय.

अखेरच्या मोक्षसंन्यासयोगनामक अध्यायांतहि कर्में न सोडण्याचाच निश्चितरूप उपदेश असून उपसंहारद्वारां ब्रह्मीभूतवृत्तीनें आणि ईश्वरनिष्ठ मनानें, जडजगांत जडदेहानें, वर्णाश्रमविहित कर्में करण्यानेंच वैयक्तिक जीवितास पूर्णता येण्याचा पुनरुपदेश केला आहे.

अर्थात्‌च या प्रकारच्या उपदेशाचा योग्य परिणाम होऊन अर्जुन आपला व्यामोहनिरास होऊन आपण युद्धास पुन्हा तयार झाल्याचें जाहीर करतो हें यथोद्दिष्ट असून तो गीतोपदेशाचा उघड परिणाम होय.

या प्रकारच्या श्रीमद्‌भगवद्गीतोपनिषज्ज्ञानविद्युद्दीपिकेचें चित्रण करूं गेल्यास तें कांहींसें सोबतच्या चित्रांत दिल्याप्रमाणें करतां येईल.

येथवर निर्दिष्ट केलेल्या धोरणानुसार व सोबत दिलेल्या चित्रणानुसार श्रीमद्भगवद्गीतेचें रचनांतर यथामति करून तें, अल्प प्राक्कथन व अर्थनिर्देशात्मक टिप्पणिका यांसह यापुढच्या अष्टादशाध्यायी तृतीय प्रकरणांत दिलें आहे.

# प्रकरण ३ रें

# गीतरचनांतर

## प्रथमाध्याय

## अर्जुनविषादयोग

### प्राक्कथन

हा अध्याय प्रसंगवर्णनात्मक आहे. रणांगणावर स्वपरपक्षीय गुरुजनांना व आप्तेष्टांना युद्धाकरितां उभे असलेले पाहून, त्यांच्या संभाव्य नाशाची कल्पना मनांत येऊन व या क्षात्रकुलाच्या विनाशाचें महत्पाप आपल्या माथीं बसणार ही पापाची भीति वाटून अर्जुन विषण्ण होतो व युद्ध करण्याचें नाकारतो.

---

॥ धृतराष्ट्र उवाच ॥

धर्मक्षेत्रे कुरुक्षेत्रे समवेता युयुत्सवः ।
मामकाः पांडवाश्चैव किमकुर्वत संजय ॥ १-१ । १

### अर्थनिर्देश

धृतराष्ट्र विचारता झाला:—संजया! रणांगणावर कौरवपांडव काय करते झाले?

॥ संजय उवाच ॥

दृष्ट्वा तु पांडवानीकं व्यूढं दुर्योधनस्तदा ।
आचार्यमुपसंगम्य राजा वचनमब्रवीत् ॥ १-२ । २
पश्यैतां पांडुपुत्राणामाचार्य महतीं चमूम् ।
व्यूढां द्रुपदपुत्रेण तव शिष्येण धीमता ॥ १-३ । ३
अत्र शूरा महेष्वासा भीमार्जुनसमा युधि ।
युयुधानो विराटश्च द्रुपदश्च महारथः ॥ १-४ । ४

धृष्टकेतुश्चेकितानः काशिराजश्च वीर्यवान् ।
पुरुजित्कुंतिभोजश्च शैब्यश्च नरपुंगवः ॥ १-५ । ५

युधामन्युश्च विक्रांत उत्तमौजाश्च वीर्यवान् ।
सौभद्रो द्रौपदेयाश्च सर्व एव महारथाः ॥ १-६ । ६

अस्माकं तु विशिष्टा ये तान्निबोध द्विजोत्तम ।
नायका मम सैन्यस्य संज्ञार्थं तान्ब्रवीमि ते ॥ १-७ । ७

भवान्भीष्मश्च कर्णश्च कृपश्च समितिंजयः ।
अश्वत्थामा विकर्णश्च सौमदत्तिस्तथैव च ॥ १-८ । ८

अन्ये च बहवः शूरा मदर्थे त्यक्तजीविताः ।
नानाशस्त्रप्रहरणाः सर्वे युद्धविशारदाः ॥ १-९ । ९

अपर्याप्तं तदस्माकं बलं भीष्माभिरक्षितम् ।
पर्याप्तं त्विदमेतेषां बलं भीमाभिरक्षितम् ॥ १-१० १०

अयनेषु च सर्वेषु यथाभागमवस्थिताः ।
भीष्ममेवाभिरक्षंतु भवंतः सर्व एव हि ॥ १-११ । ११

संजय सांगता झालाः—राजा धृतराष्ट्रा! युद्धारंभीं दुर्योधन द्रोणाचार्यांजवळ जाऊन स्वपरपक्षीय सैन्यबल निवेदन करता झाला. २—११

तस्य संजनयन्हर्षं कुरुवृद्धः पितामहः ।
सिंहनादं विनद्योच्चैः शंखं दध्मौ प्रतापवान् ॥ १-१२ । १२

ततः शंखाश्च भेर्यश्च पणवानकगोमुखाः ।
सहसैवाभ्यहन्यंत स शब्दस्तुमुलोऽभवत् ॥ १-१३ । १३

नंतर कौरवसेनापति भीष्माचार्य युद्धारंभींचा शंखनाद करते झाले व कौरवपक्षीय रणवाद्यांची गर्जना झाली. १२—१३

ततः श्वेतैर्हयैर्युक्ते महति स्यंदने स्थितौ ।
माधवः पांडवश्चैव दिव्यौ शंखौ प्रदध्मतुः ॥ १-१४ । १४

पांचजन्यं हृषीकेशो देवदत्तं धनंजयः ।
पौण्ड्रं दध्मौ महाशंखं भीमकर्मा वृकोदरः ॥ १-१५ । १५
अनंतविजयं राजा कुंतिपुत्रो युधिष्ठिरः ।
नकुलः सहदेवश्च सुघोषमणिपुष्पकौ ॥ १-१६ । १६
काश्यश्च परमेष्वासः शिखंडी च महारथः ।
धृष्टद्युम्नो विराटश्च सात्यकिश्चापराजितः ॥ १-१७ । १७
द्रुपदो द्रौपदेयाश्च सर्वशः पृथिवीपते ।
सौभद्रश्च महाबाहुः शंखान्दध्मुः पृथक् पृथक् ॥ १-१८ । १८
स घोषो धार्तराष्ट्राणां हृदयानि व्यदारयत् ।
नभश्च पृथिवीं चैव तुमुलो व्यनुनादयन् ॥ १-१९ । १९

रणभूमीवर श्रीकृष्णार्जुनांचें आगमन होऊन त्यांचा शंखनाद व पाण्डवपक्षीय रणवाद्यांचा कोलाहल झाला. १४–१९

अथ व्यवस्थितान्दृष्ट्वा धार्तराष्ट्रान्कपिध्वजः ।
प्रवृत्ते शस्त्रसंपाते धनुरुद्यम्य पांडवः ॥ १-२० । २०
हृषीकेशं तदा वाक्यमिदमाह महीपते ॥

॥ अर्जुन उवाच ॥

सेनयोरुभयोर्मध्ये रथं स्थापय मेऽच्युत ॥ १-२१ । २१
यावदेतान्निरीक्ष्येऽहं योद्धुकामानवस्थितान् ।
कैर्मया सह योद्धव्यमस्मिन्रणसमुद्यमे ॥ १-२२ । २२
योत्स्यमानानवेक्षेऽहं य एतेऽत्र समागताः ।
धार्तराष्ट्रस्य दुर्बुद्धेर्युद्धे प्रियचिकीर्षवः ॥ १-२३ २३

पुढें अर्जुन श्रीकृष्णास म्हणाला, श्रीकृष्णा! रथ दोन्ही सैन्यांमध्यें नेऊन उभा कर; म्हणजे ज्यांच्या मध्यें युद्ध होणार आहे ते कोण कोण आहेत तें मी बघूं शकेन. २०–२३

॥ संजय उवाच ॥

एवमुक्तो हृषीकेशो गुडाकेशेन भारत ।
सेनयोरुभयोर्मध्ये स्थापयित्वा रथोत्तमम् ॥ १-२४ । २४
भीष्मद्रोणप्रमुखतः सर्वेषां च महीक्षिताम् ।
उवाच पार्थ पश्यैतान्समवेतान्कुरूनिति ॥ १-२५ । २५
तत्रापश्यत्स्थितान्पार्थः पितॄनथ पितामहान् ।
आचार्यान्मातुलान्भ्रातॄन्पुत्रान्पौत्रान्सखींस्तथा ॥ १-२६ । २६
श्वशुरान्सुहृदश्चैव सेनयोरुभयोरपि ।
तान्समीक्ष्य स कौन्तेयः सर्वान्बंधूनवस्थितान् ॥ १-२७ । २७
कृपया परयाविष्टो विषीदन्निदमब्रवीत् ।

पाहतो तों अर्जुनास स्वपरपक्षांत आप्तेष्टमित्र व भीष्मद्रोणादि गुरुजन दिसले व त्यामुळें तो उद्विग्न झाला. २४–२७

॥ अर्जुन उवाच ॥

दृष्ट्वेमं स्वजनं कृष्ण युयुत्सं समुपस्थितम् ॥ १-२८ । २८
सीदंति मम गात्राणि मुखं च परिशुष्यति ।
वेपथुश्च शरीरे मे रोमहर्षश्च जायते ॥ १-२९ । २९
गाण्डीवं स्रंसते हस्तात्त्वक्चैव परिदह्यते ।
न च शक्नोम्यवस्थातुं भ्रमतीव च मे मनः ॥ १-३० । ३०
निमित्तानि च पश्यामि विपरीतानि केशव ।
न च श्रेयोनुपश्यामि हत्वा स्वजनमाहवे ॥ १-३१ । ३१

अर्जुन म्हणतो, श्रीकृष्णा, येथें स्वजनांना पाहून मी तर अगदी घाबरून गेलों आहें. सर्वत्र दुःश्चिन्हें दिसत आहेत आणि यांत कल्याणकारक कांहींच दिसत नाहीं. २८-३१

न चैतद्विद्मः कतरन्नो गरीयो यद्वा जयेम यदि वा नो जयेयुः ।
यानेव हत्वा न जिजीविषामस्तेऽवस्थिताः प्रमुखे धार्तराष्ट्राः ॥ २-६ । ३२

प्रथम जय मिळणार कीं नाहीं हेंच कोण जाणे ! ३२

येषामर्थे काङ्क्षितं नो राज्यं भोगाः सुखानि च ।
त इमेऽवस्थिता युद्धे प्राणांस्त्यक्त्वा धनानि च ॥ १-३३ । ३३
आचार्याः पितरः पुत्रास्तथैव च पितामहाः ।
मातुलाः श्वशुराः पौत्राः शालाः संबंधिनस्तथा ॥ १-३४ । ३४

शिवाय, जय मिळाला तरी ज्यांच्या सुखासाठीं युद्ध करावयाचें तेच तर मरावयास पुढें उभे राहिले आहेत. ३३-३४

न हि प्रपश्यामि ममापनुद्याद्यच्छोकमुच्छोषणमिंद्रियाणाम् ।
अवाप्य भूमावसपत्नमृद्धं राज्यं सुराणामपि चाधिपत्यम् ॥ २-८ । ३५

यांच्या मृत्यूमुळें मला अपार शोक होईल. ३५

निहत्य धार्तराष्ट्रान्नः का प्रीतिः स्याज्जनार्दन । १-३६-१ ।
स्वजनं हि कथं हत्वा सुखिनः स्याम माधव ॥ १-३७-२ । ३६

यांना मारून राज्य मिळालें तरी त्यांत काय मौज ? ३६

यद्यप्येते न पश्यंति लोभोपहतचेतसः ।
कुलक्षयकृतं दोषं मित्रद्रोहे च पातकम् ॥ १-३८ । ३७
कथं न ज्ञेयमस्माभिः पापादस्मान्निवर्तितुम् ।
कुलक्षयकृतं दोषं प्रपश्यद्भिर्जनार्दन ॥ १-३९ । ३८

युद्धामुळें होणारा मित्रद्रोह व कुलक्षय कौरवांना दिसत नसला तरी मला दिसत असतां मी युद्ध कसें होऊं द्यावें ? ३७-३८

कुलक्षये प्रणश्यंति कुलधर्माः सनातनाः ।
धर्मे नष्टे कुलं कृत्स्नमधर्मोऽभिभवत्युत ॥ १-४० । ३९
अधर्माभिभवात्कृष्ण प्रदुष्यंति कुलस्त्रियः ।
स्त्रीषु दुष्टासु वार्ष्णेय जायते वर्णसंकरः ॥ १-४१ । ४०
संकरो नरकायैव कुलघ्नानां कुलस्य च ।
पतंति पितरो ह्येषां लुप्तपिंडोदकक्रियाः ॥ १-४२ । ४१

दोषैरेतैः कुलघ्नानां वर्णसंकरकारकैः ।
उत्साद्यंते जातिधर्माः कुलधर्माश्च शाश्वताः ॥ १-४३ । ४२
उत्सन्नकुलधर्माणां मनुष्याणां जनार्दन ।
नरके नियतं वासो भवतीत्यनुशुश्रुम ॥ १-४४ । ४३

कुलक्षयामुळें कुलधर्मनाश, जातिधर्मनाश, अधर्मप्रवृत्ति, स्त्रियाची **अनीति**, **वर्णसंकर**, पिंडोदकक्रियालोप व व्यक्तीला त्याच्या पूर्वजांसह **नरकवास** घडतो असें ऐकतों. ३९-४३

न कांक्षे विजयं कृष्ण न च राज्यं सुखानि च ।
किं नो राज्येन गोविंद किं भोगैर्जीवितेन वा ॥ १-३२ । ४४
एतान्न हंतुमिच्छामि घ्नतोऽपि मधुसूदन ।
अपि त्रैलोक्यराज्यस्य हेतोः किं नु महीकृते ॥ १-३५ । ४५
यदि मामप्रतीकारमशस्त्रं शस्त्रपाणयः ।
धार्तराष्ट्रा रणे हन्युस्तन्मे क्षेमतरं भवेत् ॥ १-४६ । ४६

॥ संजय उवाच ॥

एवमुक्त्वाऽर्जुनः संख्ये रथोपस्थ उपाविशत् ।
विसृज्य सशरं चापं शोकसंविग्नमानसः ॥ १-४७ । ४७

सबब मला या युद्धांत जय देखील नको. काय करावयाचा आहे ? त्रैलोक्याच्या राज्याकरितां देखील मी त्यांना मारूं इच्छीत नाहीं. उलट यांनींच मला मारलें तरी पुरवलें. असें म्हणून अर्जुन धनुर्बाणाचा व रथांतील स्वस्थानाचा त्याग करता झाला. ४४-४७

हरिः ॐ तत्सत्

इति रचनांतरितश्रीमद्भगवद्गीतासूपनिषत्सु ब्रह्मविद्यायां योगशास्त्रे श्रीकृष्णार्जुनसंवादे अर्जुनविषादयोगो नाम प्रथमोऽध्यायः ॥ १ ॥

---

# द्वितीयाध्याय
# सांख्ययोग

## प्राक्कथन

श्रीकृष्ण प्रथम उत्तेजनार्थ अर्जुनाचा कांहीं अधिक्षेप करून नंतर त्याला लोकापवादाची भीति दाखवितात व नंतर क्षत्रियाला धर्मयुद्धाच्या संधीची महती किती असते हें सांगून तें युद्ध न केल्यास कीर्तिनाश व क्षात्रधर्मनाश होईल असें समजावून व जयापजयपक्षीं पृथ्वीच्या अगर स्वर्गाच्या सुखाचें आमिष वगैरे दाखवून युद्धास उठवूं पाहतात. परंतु अर्जुन युद्धांतर्गत पाप-पुण्यांचे व धर्माधर्मांचे, उच्च वातावरणांतील आक्षेप घेऊन आपला हेका सोडीत नाहीं हें पाहून श्रीभगवान् तत्त्वज्ञानाचा अवलंब करून, आत्मा हा नाशरहित व देह हाच काय तो जन्ममरणांच्या चक्रांत सांपडलेला आहे, सबब युद्धान्तर्गत हिंसेंत तत्त्वत: पाप, दोष वगैरे कांहीं नाहीं आणि कर्त्यानें स्थितप्रज्ञ अगर ब्रह्मनिष्ठ बनून, ममत्वहीन, सम-बुद्धीनें कर्म केल्यास व्यक्तिदृष्ट्याहि पाप घडत नाहीं, अशी अर्जुनाची समजूत करतात व अर्जुनाच्या माहितीकरितां स्थितप्रज्ञाच्या लक्षणांचें विस्तृत वर्णन करून हा अध्याय पुरा करतात.

॥ संजय उवाच ॥

**तं तथा कृपयाविष्टमश्रुपूर्णाकुलेक्षणम् ।**
**विषीदंतमिदं वाक्यमुवाच मधुसूदनः ॥** २-१ । ४८

अशा प्रकारें स्वजनप्रेमानें कर्तव्यमूढ झालेल्या अर्जुनाला श्रीभगवान् म्हणतात—४८

॥ श्रीभगवानुवाच ॥

**कुतस्त्वा कश्मलमिदं विषमे समुपस्थितम् ।**
**अनार्यजुष्टमस्वर्ग्यमकीर्तिकरमर्जुन ॥** २-२ । ४९

अरे अर्जुना, कोठची ही तुझी अनार्यांत दिसून येणारी युद्धाविन्मुखता ! ४९

क्लैब्यं मा स्म गमः पार्थ नैतत्त्वय्युपपद्यते ।
क्षुद्रं हृदयदौर्बल्यं त्यक्त्वोत्तिष्ठ परंतप ॥ २-३ । ५०

अरे, असला दुबळेपणा करूं नको. ऊठ. ५०

भयाद्रणादुपरतं मंस्यंते त्वां महारथाः ।
येषां च त्वं बहुमतो भूत्वा यास्यसि लाघवम् ॥ २-३५ । ५१
अवाच्यवादांश्च बहुन्वदिष्यंति तवाहिताः ।
निंदंतस्तव सामर्थ्यं ततो दुःखतरं नु किम् ॥ २-३६ । ५२
अकीर्तिं चापि भूतानि कथयिष्यंति तेऽव्ययाम् ।
संभावितस्य चाकीर्तिर्मरणादतिरिच्यते ॥ २-३४ । ५३

नाहींतर तुला भ्याड म्हणतील, तुला वाटेल तें बोलतील, आणि मग तुला त्यामुळें मरणापेक्षांहि जास्त दुःख होईल. ५१-५३

यदृच्छया चोपपन्नं स्वर्गद्वारमपावृतम् ।
सुखिनः क्षत्रियाः पार्थ लभंते युद्धमीदृशम् ॥ २-३२ । ५४
स्वधर्ममपि चावेक्ष्य न विकंपितुमर्हसि ।
धर्म्याद्धि युद्धाच्छ्रेयोऽन्यत्क्षत्रियस्य न विद्यते ॥ २-३१ । ५५

अरे, असलें महायुद्ध नशिबीं हवें. शिवाय धर्मयुद्ध करणें यापेक्षां तुला जास्त श्रेयस्कर काय आहे ? ५४-५५

अथ चेत्त्वमिमं धर्म्यं संग्रामं न करिष्यसि ।
ततः स्वधर्मं कीर्तिं च हित्वा पापमवाप्स्यसि ॥ २-३३ । ५६

हें धर्मयुद्ध न करशील तरच स्वकीर्ति व स्वधर्म यांचा नाश करून घेऊन पाप मात्र पदरीं बांधून घेशील. ५६

हतो वा प्राप्स्यसि स्वर्गं जित्वा वा भोक्ष्यसे महीम्
तस्मादुत्तिष्ठ कौन्तेय युद्धाय कृतनिश्चयः ॥ २-३७ । ५७

अरे, जिंकलेंस तर पृथ्वीचें राज्य करशील व मेलास तर स्वर्गसुख भोगशील. सबब युद्धाला ऊठ. ५७

॥ अर्जुन उवाच ।

कथं भीष्ममहं संख्ये द्रोणं च मधुसूदन।
इषुभिः प्रतियोत्स्यामि पूजार्हावरिसूदन ॥ २-४ । ५८

गुरूनहत्वा हि महानुभावान् श्रेयो भोक्तुं भैक्ष्यमपीह लोके ।
हत्वार्थकामास्तु गुरूनिहैव भुंजीय भोगान् रुधिरप्रदिग्धान् ॥
२-५ । ५९

अर्जुन म्हणतो, हे भगवन्, पूजार्ह भीष्मद्रोणादि गुरुजनांवर मी हत्यार कसें उपसूं? त्यांच्या रक्तानें दूषित झालेले सुखोपभोग भोगण्यापेक्षां भीक मागून खाणें काय वाईट? ५८-५९

अहो बत महत्पापं कर्तुं व्यवसिता वयम् ।
यद्राज्यसुखलोभेन हंतुं स्वजनमुद्यताः ॥ १-४५ । ६०
तस्मान्नार्हा वयं हन्तुं धार्तराष्ट्रान्स्वबांधवान् । १-३७-१ ।
पापमेवाश्रयेदस्मान् हत्वैतानाततायिनः ॥ १-३६-२ । ६१

छे ! छे ! मला तर हें फार भयंकर पाप वाटतें ! सबब यांना मारणें व त्या पापाचें धनी होणें हें आम्हांला उचित नव्हे. ६०-६१

कार्पण्यदोषोपहतस्वभावः पृच्छामि त्वां धर्मसंमूढचेताः।
यच्छ्रेयः स्यान्निश्चितं ब्रूहि तन्मे शिष्यस्तेऽहं शाधि मां
त्वां प्रपन्नम् ॥ २-७ । ६२

हे भगवन्, मी अगदीं गोंधळून गेलों आहें व तुला शरण आलों आहें. मला या वेळीं अगदीं निश्चितपणें जो सन्मार्ग असेल तोच दाखीव. ६२

॥ संजय उवाच ॥

एवमुक्त्वा हृषीकेशं गुडाकेशः परंतप ।
न योत्स्य इति गोविंदमुक्त्वा तूष्णीं बभूव ह ॥ २-९ । ६३
तमुवाच हृषीकेशः प्रहसन्निव भारत ।
सेनयोरुभयोर्मध्ये विषीदंतमिदं वचः ॥ २-१० । ६४

असें म्हणून स्वस्थ बसलेल्या अर्जुनाला श्रीभगवान् म्हणतात—६३-६४

॥ श्रीभगवानुवाच ॥

अशोच्यानन्वशोचस्त्वं प्रज्ञावादांश्च भाषसे ।
गतासूनगतासूंश्च नानुशोचंति पंडिताः ॥ २-११ । ६५

वाः अर्जुना! तूं एकीकडे तर मोठ्या पाण्डित्याच्या गोष्टी सांगत आहेस व दुसरीकडे मात्र ज्या जन्ममरणबद्ध जड देहाबद्दल शोक करणें जरूर नाहीं त्याबद्दल शोक करीत आहेस, हें पंडिताला शोभण्यासारखें नव्हे! ६५

न जायते म्रियते वा कदाचिन्नायं भूत्वा भविता वा न भूयः ।
अजो नित्यः शाश्वतोऽयं पुराणो न हन्यते हन्यमाने शरीरे ॥
२-२० । ६६

तूं युद्धांत मरणाऱ्यांच्या आत्म्याबद्दल शोक करीत असशील तर तो शोक करणें जरूर नाहीं. कारण आत्मा हा सर्वांचा एकच असून तो नित्य, शाश्वत, कालातीत, अजन्मा, अमर, शारीर मृत्यूनें न मरणारा, स्वतः-पासून विश्वाचा उत्पन्नकर्ता आणि तथापिहि त्यामुळें क्षय, व्यय न पावणारा, शस्त्र, अग्नि, जल, वायु यांनीं अविकार्य, सर्वव्यापि, अचल, आश्चर्यपूर्ण, अव्यक्त व अचिंत्य असा आहे. आत्म्याचें हें स्वरूप तूं ओळखलें असशील तर आत्म्याबद्दल शोक करणें हें तुला उचित नव्हे. ६६

अविनाशि तु तद्विद्धि येन सर्वमिदं ततम् ।
विनाशमव्ययस्यास्य न कश्चित्कर्तुमर्हति ॥ २-१७ । ६७

नैनं छिंदंति शस्त्राणि नैनं दहति पावकः ।
न चैनं क्लेदयंत्यापो न शोषयति मारुतः ॥ २-२३ । ६८

अच्छेद्योऽयमदाह्योऽयमक्लेद्योऽशोष्य एव च ।
नित्यः सर्वगतः स्थाणुरचलोऽयं सनातनः ॥ २-२४ । ६९

आश्चर्यवत्पश्यति कश्चिदेनमाश्चर्यवद्वदति तथैव चान्यः ।
आश्चर्यवच्चैनमन्यः शृणोति श्रुत्वाप्येनं वेद न चैव कश्चित् ॥
२-२९ । ७०

अव्यक्तोऽयमचिंत्योऽयमविकार्योऽयमुच्यते ।
तस्मादेवं विदित्वैनं नानुशोचितुमर्हसि ॥ २-२५ । ७१
य एनं वेत्ति हंतारं यश्चैनं मन्यते हतम् ।
उभौ तौ न विजानीतो नायं हंति न हन्यते ॥ २-१९ । ७२

आत्मा अविनाशी आहे. याला मारणारा अगर मरणारा मानणारे केवळ अज्ञानी होत. ६७-७२

वेदाविनाशिनं नित्यं य एनमजमव्ययम् ।
कथं स पुरुषः पार्थ कं घातयति हंतिकम् ॥ २-२१ । ७३

हें कळल्यावर मारण्यामारविण्याची भाषाच कोठली? ७३

नासतो विद्यते भावो नाभावो विद्यते सतः ।
उभयोरपि दृष्टोंतस्त्वनयोस्तत्त्वदार्शिभिः ॥ २-१६ । ७४

जें मुळांतच नाहीं त्याचें अस्तित्व कधींच प्रत्ययास येत नाहीं व जें आहे तें कधीं नाश पावत नाहीं. ७४

नत्वेवाहं जातु नासं न त्वं नेमे जनाधिपाः ।
न चैव न भविष्यामः सर्वे वयमतःपरम् ॥ २-१२ । ७५

आपणा सर्वांच्या आत्म्याला यापूर्वी जसें अस्तित्व होतें तसें तें पुढेंहि असणारच. सबब आत्म्याच्या दृष्टीनें युद्धांत शोक करण्याचें कारणच नाहीं. ७५

अथ चैनं नित्यजातं नित्यं वा मन्यसे मृतम् ।
तथापि त्वं महाबाहो नैनं शोचितुमर्हसि ॥ २-२६ । ७६

शिवाय, अन्य पक्षीं, तूं केवळ जड देहालाच आत्मसर्वस्व मानीत असलास तरीहि शोकाचें कारण नाहीं. ७६

जातस्य हि ध्रुवो मृत्युर्ध्रुवं जन्म मृतस्य च ।
तस्मादपरिहार्येऽर्थे न त्वं शोचितुमर्हसि ॥ २-२७ । ७७

कारण जन्मलेला देह जसा मरणार आहे, तसा मेलेला देह पुनश्च जन्मासहि येणार आहेच. ७७

अव्यक्तादीनि भूतानि व्यक्तमध्यानि भारत ।
अव्यक्तनिधनान्येव तत्र का परिदेवना ॥ २-२८ । ७८

एवढेंच काय पण देह हा मध्यावस्थेंतच काय तो व्यक्त रूपांत प्रत्ययास येतो; पण आद्यन्तावस्थेंत तो अव्यक्त रूपांतच मिळालेला असतो. ७८

देहिनोऽस्मिन् यथा देहे कौमारं यौवनं जरा ।
तथा देहांतरप्राप्तिर्धीरस्तत्र न मुह्यति ॥ २-१३ । ७९

शिवाय, जन्मलेल्या देहाचीं जशीं बाल्य, तारुण्य व वार्धक्य इत्यादि अवस्थान्तरें होतात, तसलेंच एक अवस्थांतर म्हणजेच देहान्तरप्राप्ति अगर देहाचा पुनर्जन्म हें होय. ७९

वासांसि जीर्णानि यथा विहाय नवानि गृह्णाति नरोऽपराणि ।
तथा शरीराणि विहाय जीर्णान्यन्यानि संयाति नवानि देही ॥
२-२२ । ८०

आत्म्याच्या दृष्टीनें या प्रकारच्या एकाद्या देहाचा पुनर्जन्म म्हणजे अनेक वस्त्रांपैकीं जुनें निरुपयोगी झालेलें एकादें वस्त्र फेंकून देणें व त्याऐवजीं तसलेंच चांगलें नवें घेणें एवढेंच. ८०

देही नित्यमवध्योऽयं देहे सर्वस्य भारत ।
तस्मात्सर्वाणि भूतानि न त्वं शोचितुमर्हसि २-३० । ८१
अंतवंत इमे देहा नित्यस्योक्ताः शरीरिणः ।
अनाशिनोऽप्रमेयस्य तस्माद्युद्ध्यस्व भारत ॥ २-१८ । ८२

एवंच, ज्यावर देहाचे भाव उत्पन्न होतात तो आत्मा अविनाशी आहे व हे देह मात्र नाशवंत आहेत. सबब देहरूपानें दिसणाऱ्या स्वजनांच्या देहांकरितां शोक न करितां फार तर त्या नाशवंत देहांच्या नाशासाठीं तूं खुशाल लढ. ८१–८२

एषा तेऽभिहिता सांख्ये बुद्धिर्योगे त्विमा शृणु ।
बुद्ध्या युक्तो यया पार्थ कर्मबंधं प्रहास्यसि । २-३९ । ८३

हें सांख्यतत्त्वज्ञानानुरूप युद्धसमर्थन झालें. आतां ज्याअर्थी तूं युद्धकर्मांतर्गत **पापपुण्याचा प्रश्न** उपस्थित करीत आहेस, त्याअर्थी कर्मे करूनहि कर्मफलभोगाच्या कचाट्यांतून सुटण्याचा तुला एक मार्ग सांगतों. ८३

**व्यवसायात्मिका बुद्धिरेकेह कुरुनंदन।**
**बहुशाखा ह्यनंताश्च बुद्धयोऽव्यवसायिनाम्॥** २-४१। ८४

कार्याकार्यांचा युक्त निर्णय व्यापक व पूर्ण ज्ञानानेंच होऊं शकतो. या ज्ञानाचे निरनिराळ्या क्षेत्रांतील निरनिराळे असे अनेक शाखाभेद असूं शकतात. पण ते प्रत्येकीं सदोष असतात. ८४

**यामिमां पुष्पितां वाचं प्रवदंत्यविपश्चितः।**
**वेदवादरताः पार्थ नान्यदस्तीति वादिनः॥** २-४२। ८५
**कामात्मानः स्वर्गपरा जन्मकर्मफलप्रदाम्।**
**क्रियाविशेषबहुलां भोगैश्वर्यगतिं प्रति॥** २-४३। ८६

उदाहरणार्थ, कर्मकांडात्मक वेदांतील फलश्रुतीच्या वाक्यांना भुललेले व कर्मफलभोगाचा सिद्धान्त निरपवादपणें खरा आहे असें मानणारे लोक ऐश्वर्यभोगाच्या मार्गे लागून आपल्या ज्ञानाप्रमाणें ते भोग अनेक प्रकारांच्या यज्ञयागादि कर्मांनीं प्राप्त करून घेण्यांतच गढून गेलेले असतात. ८५–८६

**भोगैश्वर्यप्रसक्तानां तयापहृतचेतसाम्।**
**व्यवसायात्मिका बुद्धिः समाधौ न विधीयते॥** २-४४। ८७

अशा लोकांचें ज्ञान केवळ एकांगी म्हणजे वैषयिक सुखेच्छेनें झुकलेलें असून तें समाधीसारख्या उच्चतम सुखाच्या प्राप्तीच्या कामीं निरुपयोगी असतें. ८७

**त्रैगुण्यविषया वेदा निस्त्रैगुण्यो भवार्जुन।**
**निर्द्वंद्वो नित्यसत्त्वस्थो निर्योगक्षेम आत्मवान्॥** २-४५। ८८

परंतु कर्मकांडात्मक वेदोक्तकर्म हें फारतर त्रिगुणात्मक जडप्रकृतीच्या क्षेत्रांतलें कर्म होय व प्राकृतिक जडविश्व म्हणजेच संपूर्ण विश्व नव्हे. सबब तूं या त्रिगुणात्मक प्रकृतीपेक्षांहि खोल पहावयास शीक. केवळ सुखदुःखादि

द्वंद्वांतच गढून जाण्यापेक्षां तुझें ध्येय जास्त विस्तृत असूं दे. केवळ योग-क्षेमादि ऐहिक बाबतींतच तूं गुंतून राहूं नकोस. तूं स्वतःचें नित्य असें जें आध्यात्मिक स्वरूप तें ओळखणारा हो. ८८

यावानर्थ उदपाने सर्वतः संप्लुतोदके ।
तावान्सर्वेषु वेदेषु ब्राह्मणस्य विजानतः ॥ २-४६ । ८९

याप्रमाणें आत्मस्वरूपाचें ज्ञान झाल्यानंतर कर्मकांडात्मक वेदाचें ज्ञान हें केवळ वर्षाकाळांतील जलक्रीडेच्या अपेक्षेप्रमाणें स्वारस्यहीन आहे. ८९

यदा ते मोहकलिलं बुद्धिर्व्यतितरिष्यति ।
तदा गंतासि निर्वेदं श्रोतव्यस्य श्रुतस्य च ॥ २-५२ । ९०

पण याकरितां तुझ्या ज्ञानावर आलेलें मोहाचें पटल दूर झालें पाहिजे; म्हणजे तुझ्या पुढच्यामागच्या सर्व गैरसमजुती दूर होतील. ९०

दूरेण ह्यवरं कर्म बुद्धियोगाद्धनंजय ।
बुद्धौ शरणमन्विच्छ कृपणाः फलहेतवः ॥ २-४९ । ९१

ज्ञानसंपन्न होऊन युक्तीनें कर्म न करितां केवळ कर्मकाण्डांतील प्रतिपाद्य कर्म उपरिनिर्दिष्ट फलभोगहेतूनें करणें हा फारच गौण मार्ग होय. पार-लौकिक सुखाच्या आशेनें कर्मकाण्डांत उपदेशिलेलें कर्म करणारे लोक बिचारे केवळ काबाडकष्ट करणारे व सबब—दयार्ह—कींव करण्यास योग्य होत. म्हणून तो मार्ग सोडून तूं ज्ञानसंपन्न होऊन युक्तीनें कर्मे करण्यास शीक. ९१

बुद्धियुक्तो जहातीह उभे सुकृतदुष्कृते ।
तस्माद्योगाय युज्यस्व योगः कर्मसु कौशलम् ॥ २-५० । ९२

याप्रमाणें ज्याला एकदां समग्र ज्ञान झालें, तो पापपुण्यांच्या लौकिक कल्पनांना भीक घालीत नाहीं, हें लक्षांत ठेवून तूं ज्ञानपूर्वक कर्म कर. हें एकप्रकारें योगाचरणच होय. ९२

कर्मजं बुद्धियुक्ता हि फलं त्यक्त्वा मनीषिणः ।
जन्मबंधविनिर्मुक्ताः पदं गच्छंत्यनामयम् ॥ २-५१ । ९३

अशा प्रकारें कर्में करणारे ज्ञानी कर्मफलभोगाला व त्याला साधनीभूत मानलेल्या पुनर्जन्माच्या कल्पनेला गुंडाळून ठेवून सहज मुक्त होऊं शकतात. ९३

योगस्थः कुरु कर्माणि संगं त्यक्त्वा धनंजय ।
सिद्ध्यऽसिद्ध्योः समो भूत्वा समत्वं योग उच्यते ॥ २--४८। ९४

याप्रकारें कर्मफलभोगाच्या तावडींत न सांपडण्याची युक्ति म्हणजे कर्मफलाबद्दल आसक्ति न बाळगणें अगर कर्माच्या यशापयशांची पर्वा न करणें ही होय. ९४

कर्मण्येवाधिकारस्ते मा फलेषु कदाचन ।
मा कर्मफलहेतुर्भूर्मा ते संगोऽस्त्वकर्मणि ॥ २-४७ । ९५

अशा रीतीनें कर्में करीत राहणें हेंच तुझें कर्तव्य होय. कर्मफलप्राप्तीकडे तूं लक्षच देऊं नकोस. एवढेंच नव्हे तर कर्में करतांना तीं फलद्रूप व्हावींत अशी आकांक्षाहि तूं ठेवूं नकोस व कर्म फलदायी होईल कीं नाहीं, असा संशय आला असतांहि कर्म न करण्याबद्दल हट्ट धरूं नकोस. ९५

नेहाभिक्रमनाशोऽस्ति प्रत्यवायो न विद्यते ।
स्वल्पमप्यस्य धर्मस्य त्रायते महतो भयात् ॥ २-४० । ९६

शिवाय याप्रकारें कर्मफलापेक्षां कर्मालाच प्राधान्य देण्यांत गौणप्राधान्यसंबंधाचा विपर्यास झालासें कदाचित् तुला वाटण्याचा संभव आहे. पण तो खरा नव्हे. प्राधान्य कर्मालाच आहे व तें कर्माला देण्यास कांहीं हरकत नाहीं. कर्में करीत राहणें हाच धर्म होय व या धर्माचें अल्पस्वल्प आचरण हेंहि मोठमोठ्या अडचणींतून सोडवूं शकतें. ९६

श्रुतिविप्रतिपन्ना ते यदा स्थास्यति निश्चला ।
समाधावचला बुद्धिस्तदा योगमवाप्स्यसि ॥ २-५३ । ९७

मात्र याकरितां कर्मकाण्डात्मक श्रुतिवचनांनी फसून कर्मफलभोगाविषयीं चंचल अगर आतुर झालेली तुझी वृत्ति पालटली पाहिजे आणि ती उच्चतम सुखाकडे झुकून तेथें स्थिरावली पाहिजे; म्हणजे तुला हीं उपरिनिर्दिष्ट कर्में करण्याची युक्ति साध्य होईल व तुझें वर्तन ज्ञानी पुरुषाप्रमाणें घडत जाईल.

॥ अर्जुन उवाच ॥

स्थितप्रज्ञस्य का भाषा समाधिस्थस्य केशव
स्थितधीः किं प्रभाषेत किमासीत व्रजेत किम् ॥ २-५४ । ९८

अर्जुन विचारतोः—ज्या नमुन्याचा ज्ञानी बनण्याबद्दल आपण मला उपदेश करीत आहां, त्या ज्ञानी पुरुषाचें आचरण कसें असतें हें मला सांगाल काय ? ९८

॥ श्रीभगवानुवाच ॥

या निशा सर्वभूतानां तस्यां जागर्ति संयमी ।
यस्यां जाग्रति भूतानि सा निशा पश्यतो मुनेः ॥ २-६९ । ९९
कर्मण्यकर्म यः पश्येदकर्मणि च कर्म यः ।
स बुद्धिमान्मनुष्येषु स युक्तः कृत्स्नकर्मकृत् ॥ ४-१८ । १००

श्रीभगवान् सांगतातः—अशा ज्ञानी पुरुपाचें स्थूल चिन्ह म्हणून असें सांगतां येईल कीं, सामान्य जन ज्या व्यावहारिक गोष्टींचें जागरूकपणें चिंतन करीत असतात त्यांबद्दल ज्ञानी पुरुप पूर्ण उदासीन असतो. पण ज्या उच्चतर कल्याणाची सामान्य जनांना जाणीवहि नसते तें साध्य करण्याकरितां मात्र तो जागरूकपणें पूर्ण प्रयत्न करीत असतो. ९९—१००

ध्यायतो विषयान्पुंसः संगस्तेषूपजायते ।
संगात्संजायते कामः कामात्क्रोधोऽभिजायते ॥ २-६२ । १०१
क्रोधाद्भवति संमोहः संमोहात्स्मृतिविभ्रमः ।
स्मृतिभ्रंशाद्बुद्धिनाशो बुद्धिनाशात्प्रणश्यति ॥ २-६३ । १०२

याप्रकारें सामान्य जनांच्या वृत्तीपेक्षां वेगळी वृत्ति ब्रह्मनिष्ठानें धारण करण्यास कारणेंहि आहेत. सामान्य लोकांप्रमाणें विषयचिंतन करीत राहिल्यानें विषयाबद्दल इच्छा, नंतर आसक्ति, नंतर क्रोध, मोह, स्मृतिभ्रंश, बुद्धिनाश व अखेर सर्वस्वनाश ही अनर्थपरंपरा ओढवते. १०१—१०२

इंद्रियाणां हि चरतां यन्मनोऽनुविधीयते ।
तदस्य हरति प्रज्ञां वायुर्नावमिवांभसि ॥ २-६७ । १०३

स्वैरगामी इंद्रियांच्या धोरणानें ज्या मनुष्याचें मन वागतें त्या मनुष्याची सुकाणूंशिवाय नावेची वाऱ्यानें जशी त्रेधा उडते तशी त्रेधा उडते. १०३

यततो ह्यपि कौंतेय पुरुषस्य विपश्चितः ।
इंद्रियाणि प्रमाथीनि हरंति प्रसभं मनः ॥ २-६० । १०४
तानि सर्वाणि संयम्य युक्त आसीत मत्परः ।
वशे हि यस्येंद्रियाणि तस्य प्रज्ञा प्रतिष्ठिता ॥ २-६१ । १०५
यदा संहरते चायं कूर्मोऽगानीव सर्वशः ।
इंद्रियाणींद्रियार्थेभ्यस्तस्य प्रज्ञा प्रतिष्ठिता ॥ २-५८ । १०६
तस्माद्यस्य महाबाहो निगृहीतानि सर्वशः ।
इंद्रियाणींद्रियार्थेभ्यस्तस्य प्रज्ञा प्रतिष्ठिता ॥ २-६८ । १०७

सबब इंद्रियनिग्रह केला पाहिजे. १०४–१०७

विषया विनिवर्तंते निराहारस्य देहिनः ।
रसवर्जं रसोऽप्यस्य परं दृष्ट्वा निवर्तते ॥ २-५९ । १०८

इंद्रियनिग्रहाचा एक मार्ग निराहार हा होय. १०८

मात्रास्पर्शास्तु कौंतेय शीतोष्णसुखदुःखदाः ।
आगमापायिनोऽनित्यास्तांस्तितिक्षस्व भारत ॥ २-१४ । १०९
यं हि न व्यथयंत्येते पुरुषं पुरुषर्षभ ।
समदुःखसुखं धीरं सोऽमृतत्वाय कल्पते ॥ २-१५ । ११०

याशिवाय सहनशीलताहि अंगी असली पाहिजे. १०९-११०

रागद्वेषवियुक्तैस्तु विषयानिंद्रियैश्चरन् ।
आत्मवश्यैर्विधेयात्मा प्रसादमधिगच्छति ॥ २-६४ । १११
प्रसादे सर्वदुःखानां हानिरस्योपजायते ।
प्रसन्नचेतसो ह्याशु बुद्धिः पर्यवतिष्ठते ॥ २-६५ । ११२

नास्ति बुद्धिरयुक्तस्य न चायुक्तस्य भावना ।
न चाभावयतः शांतिरशांतस्य कुतः सुखम् ॥ २-६६ । ११३

तथापि दुसरी एक युक्ति अशी आहे कीं, आवडनावड न ठेवतां केवळ इंद्रियद्वारां विषयसेवन करण्यास हरकत नाहीं. म्हणजे चित्तप्रसन्नता, दुःख-नाश व स्थिरबुद्धित्व शक्य होतें. असें नसेल तर एऱ्हवीं शान्तता प्राप्त होणें शक्य नाहीं. १११–११३

आपूर्यमाणमचलप्रतिष्ठं समुद्रमापः प्रविशंति यद्वत् ।
तद्वत्कामा यं प्रविशंति सर्वे स शांतिमाप्नोति न कामकामी ॥
२-७० । ११४

एक उपमा द्यावयाची झाल्यास असें म्हणतां येईल कीं, ज्या वेळीं समुद्रास भरती नसते त्या वेळीं त्यांत नद्यांच्या मुखांमधून कितीहि पाणी आलें तरी समुद्र ज्याप्रमाणें उचंबळत नाहीं, त्याचप्रमाणें इंद्रियद्वारां विषयग्रहण करीत असतां कर्त्याच्या वृत्ती उचंबळून न आल्या पाहिजेत. ११४

प्रजहाति यदा कामान्सर्वान्पार्थ मनोगतान् ।
आत्मन्येवात्मना तुष्टः स्थितप्रज्ञस्तदोच्यते ॥ २-५५ । ११५

विहाय कामान्यः सर्वान्पुमांश्चरति निस्पृहः ।
निर्ममो निरहंकारः स शांतिमधिगच्छति ॥ २-७१ ११६

यस्य सर्वे समारंभाः कामसंकल्पवर्जिताः ।
ज्ञानाग्निदग्धकर्माणं तमाहुः पंडितं बुधाः ॥ ४-१९ । ११७

यः सर्वत्रानभिस्नेहस्तत्तत्प्राप्य शुभाशुभम् ।
नाभिनंदति न द्वेष्टि तस्य प्रज्ञा प्रतिष्ठिता ॥ २-५७ । ११८

यदृच्छालाभसंतुष्टो द्वंद्वातीतो विमत्सरः ।
समः सिद्धावसिद्धौ च कृत्वापि न निबद्ध्यते ॥ ४-२२ । ११९

त्यक्त्वा कर्मफलासंगं नित्यतृप्तो निराश्रयः ।
कर्मण्यभिप्रवृत्तोऽपि नैव किंचित्करोति सः ॥ ४-२० । १२०

पण **मुख्य गोष्ट ही कीं, कामनात्याग केलाच** पाहिजे; शिवाय निर्ममत्व, निरहंकारत्व, शुभाशुभ-औदासिन्य, रागद्वेषराहित्य, कर्मफलअनासक्ति, यदृच्छालाभसंतुष्टता, निर्मत्सरत्व, सिद्धासिद्धासमत्व व **निःसंगत्व** एवढे **गुण** अंगीं बाणले असतील तर प्रवाहपतित कार्य करीत राहिल्यानें कर्मविपाकबंधाचें भय उरत नाहीं.* ११५–१२०

दुःखेष्वनुद्विग्नमनाः सुखेषु विगतस्पृहः ।
वीतरागभयक्रोधः स्थितधीर्मुनिरुच्यते ॥ २-५६ । १२१

एषा ब्राह्मी स्थितिः पार्थ नैनां प्राप्य विमुह्यति ।
स्थित्वास्यामंतकालेऽपि ब्रह्म निर्वाणमृच्छति ॥ २-७२ । १२२

**थोडक्यांत सांगावयाचें** तर **सुखदुःखांबद्दल समत्व व राग, भय व क्रोध यांचा त्याग** हीं ज्ञान्यांचीं लक्षणें होत आणि हीं अखेरपर्यंत टिकतील तर मोक्ष हा निःसंशय मिळण्यासारखा आहे. १२१–१२२

सुखदुःखे समे कृत्वा लाभालाभौ जयाजयौ ।
ततो युद्धाय युज्यस्व नैवं पापमवाप्स्यसि ॥ २-३८ । १२३

**सबब** अर्जुना! तूं सुखदुःख, लाभालाभ, जयापजय यांच्याबद्दल समबुद्धि ठेवून खुशाल युद्ध कर; असें केल्यानें युद्धांतील हत्येचें पाप तुला बिलकुल लागणार नाहीं. १२३

हरिः ॐ तत्सत्

इति रचनान्तरितश्रीमद्भगवद्गीतासूपनिषत्सु० सांख्ययोगो नाम द्वितियोऽध्यायः ॥ २ ॥

---

* श्रीमद्भगवद्गीतेंत कर्मविपाकसिद्धान्ताचा जो निर्देश आहे, तो त्याच्या कचाट्यांतून सुटण्याचा मार्ग दाखविण्यापुरता अगर मार्ग दाखविण्याच्या हेतूनें केलेला आहे, हा एक गीतविशेष दाखविण्यासारखा आहे.

# तृतीयाध्याय

# अक्षरब्रह्मयोग

## प्राक्कथन

द्वितीयाध्यायांतील विवरणापैकीं, आत्मा, कर्म वगैरे कल्पना अर्जुनास दुर्बोध वाटल्यामुळें त्यांबद्दल विस्तृत विवेचन करण्यास तो श्रीकृष्णास पुढील सात प्रश्नांनी विनवितो:—( १ ) ब्रह्म म्हणजे काय ? ( २ ) आत्म्याचें अधिष्ठान कोणतें ? ( ३ ) ईश्वराचें अधिष्ठान कोणतें ? (४) प्रयाणकालीं ईश्वर कोणत्या प्रक्रियेनें आठवणें शक्य आहे ? ( ५ ) देहांत यज्ञाचें अधिष्ठान कोणतें ? ( ६ ) प्रकृतीचें अधिष्ठान कोणतें ? व (७) कर्म म्हणजे काय ?

या प्रश्नांचीं उत्तरें भगवान् प्रथम सूत्रात्मक अगर संक्षिप्तरीत्या व नंतर एक एक प्रश्न घेऊन सांगोपांग, विस्ताराने देतात.

प्रत्येक प्रश्नाच्या उत्तरानंतर विशिष्ट प्रश्नविषयक तत्त्वाच्या दृष्टीनें, " जें पिंडीं तें ब्रह्मांडीं " या न्यायानुरूप व्यक्तीचें स्वतःच्या ब्राह्मीघटनेला अनुरूप असें कार्य कोणतें तेंहि मधल्या निरनिराळ्या अध्यायांतून विस्तृतपणें श्रीभगवान् सांगतात.

तृतीयाध्यायांत अनिर्वाच्य अशा ब्रह्मशक्तीचें यथाशक्य शब्दचित्र आहे व श्रीकृष्णानें आपल्या ईश्वरी भावाचें त्या ब्रह्मशक्तीशी ऐक्य ध्वनित केलें आहे.

॥ अर्जुन उवाच ॥

**किं तद्ब्रह्म किमध्यात्ममधिदैवं किमुच्यते ।** ८-१-१ ।
**प्रयाणकाले च कथं ज्ञेयोऽसि नियतात्मभिः ॥** ८-२-२ । १२४
**अधियज्ञः कथं कोऽत्र देहेऽस्मिन्मधुसूदन ।** ८-२-१ ।
**अधिभूतं च किं प्रोक्तं किं कर्म पुरुषोत्तम ॥** ८-१-२ । १२५

अर्जुन विचारतोः—हे भगवन् ! ब्रह्म म्हणजे काय ? आत्मा म्हणजे काय ? ईश्वर म्हणजे काय ? अन्तकालीं तुला आठवणें कसें शक्य आहे ?

देहामध्यें त्याला उद्देशून केलेल्या यज्ञाचा भोक्ता कोण? प्रकृति म्हणजे काय? कर्म म्हणजे काय?[1] १२४–१२५

॥ श्रीभगवानुवाच ॥

अक्षरं ब्रह्म परमं स्वभावोऽध्यात्ममुच्यते। ८-३-१।
अधिभूतं क्षरो भावः पुरुषश्चाधिदैवतम्॥ ८-४-१। १२६

श्रीभगवान् सांगतातः—अर्जुना! विश्वांतील अत्यंत अविनाशी असें जें आद्य तत्त्व तें ब्रह्म[2] होय व तें तत्त्व म्हणजेच आत्मा. हें अक्षरब्रह्म अंशरूपानें क्षरभावांत अवतरत असतां याचा पहिला अवतार जो हिरण्यगर्भ तोच विराट पुरुष अगर ईश्वर होय व विश्वांतील नाशवंत प्रकृतितत्त्व हें या ब्रह्मवस्तूचा ईश्वरांतून तदनंतरचा अवतार होय. १२६

भूतभावोद्भवकरो विसर्गः कर्मसंज्ञितः। ८-३-२।
अधियज्ञोऽहमेवात्र देहे देहभृतां वर॥ ८-४-२। १२७

या ब्रह्मशक्तीचा प्रथम विराटपुरुषांत किंवा पुराणपुरुषांत व नंतर जड-प्रकृतींत किंवा दृश्य विश्वांत अवतार होण्याची जी क्रिया तेंच कर्म; आणि सर्व भतमात्रांच्या नांवानें ज्याला उद्देशून यज्ञादि कर्में करावयाचीं तो सर्वान्तर्यामीं आत्मा मीच. १२७

---

१. हे अर्जुनाचे प्रश्न सात कीं आठ व "अधिदेह कोण?" हा स्वतंत्र एक प्रश्न कीं काय हा थोडासा वादग्रस्त मुद्दा दिसतो. परंतु "कथं" व "कः" या दोन प्रश्नार्थ क्रियाविशेपणांनीं दोन स्वतंत्र प्रश्न उपस्थित होतात, असें मानावें तर पुढील उत्तरें मात्र प्रश्नांइतकीं आठ नसून सातच भरतात; सबब प्रश्नहि सातच मानणें व देहांत अधियज्ञ कोण व कसा असतो, हा एकच प्रश्न मानणें इष्ट वाटतें.

२. हें विश्वांतील आद्य तत्त्व वैश्वअवकाशांत वस्तुरूपानें भरलें आहे असें मानण्याचा वाचकांनीं आग्रह धरूं नये. ब्रह्म हें वस्तुमय नसून शक्तिमय असणें संभवतें व स्थल-काल-द्रव्यादि भाव जे द्रष्ट्याच्या समर्याद जड प्राकृतिक घटनेमुळें प्रत्ययास येतात ते या ब्रह्मशक्तीवर आरोपित केले जातात एवढेंच.

अंतकाले च मामेव स्मरन्मुक्त्वा कलेवरम् ।
यः प्रयाति स मद्भावं याति नास्त्यत्र संशयः ॥ ८-५ । १२८

जन्मभर माझी उपासना व स्मरण करीत राहिल्यानें अन्तःकालींहि माझें स्मरण घडत ज्याचा देहत्याग होतो तो मला निःसंशय येऊन मिळतो.* १२८

यं यं वापि स्मरन्भावं त्यजत्यंते कलेवरम् ।
तं तमेवैति कौन्तेय सदा तद्भावभावितः ॥ ८-६ । १२९

या विधानाला आधार काय म्हणशील तर जन्मभर ज्या ध्येयाच्या अगर भावाच्या चिंतनांत प्राणी रंगून-गढून-गेला असेल, त्याच ध्येयाची अगर भावाची अन्तकालींहि त्याला संवयीच्या जोरावर आठवण होते व अन्तकालीं तो त्या ध्येयाशीं अगर भावाशीं तादात्म्य पावल्यामुळें त्याला पुढील जन्महि तदनुरूपच प्राप्त होतो असा श्रुतींचा सिद्धान्त आहे. १२९

यदक्षरं वेदविदो वदंति विशंति यद्यतयो वीतरागाः ।
यदिच्छंतो ब्रह्मचर्यं चरंति तत्ते पदं संग्रहेण प्रवक्ष्ये ॥
८-११ । १३०

यानंतर, अर्जुना, तुला या ब्रह्मशक्तीचीं कांहीं लक्षणें सांगतों. १३०

ज्ञेयं यत्तत्प्रवक्ष्यामि यज्ज्ञात्वाऽमृतमश्नुते ।
अनादिमत्परं ब्रह्म न सत्तन्नासदुच्यते ॥ १३-१२ । १३१
सर्वतः पाणिपादं तत्सर्वतोऽक्षिशिरोमुखम् ।
सर्वतः श्रुतिमल्लोके सर्वमावृत्य तिष्ठति ॥ १३-१३ । १३२
सर्वेंद्रियगुणाभासं सर्वेंद्रियविवर्जितं ।
असक्तं सर्वभृच्चैव निर्गुणं गुणभोक्तृ च ॥ १३-१४ । १३३

* हे ज्या प्रश्नाचें उत्तर आहे तो प्रश्न "ईशस्मरण अन्तकालीं होणें कसें शक्य आहे?" (कथं ज्ञेयोऽसि) असा आहे. अर्थातच अन्तकालच्या गोंधळाच्या प्रसंगीं ईशस्मरण अचानकपणें सहजासहजीं शक्य नाहीं, तर जीवितावधींत ईशस्मरण सतत करीत राहिल्यानेंच—वृत्ति ईश्वरमय बनल्यामुळेंच—अन्तकाळीं ईशस्मरण होणें शक्य आहे.

बहिरंतश्च भूतानामचरं चरमेव च ।
सूक्ष्मत्वात्तदविज्ञेयं दूरस्थं चांतिके च तत् ॥ १३-१५ । १३४

अविभक्तं च भूतेषु विभक्तमिव च स्थितम् ।
भूतभर्तृ च तज्ज्ञेयं ग्रसिष्णु प्रभविष्णु च ॥ १३-१६ । १३५

ज्योतिषामपि तज्ज्योतिस्तमसः परमुच्यते ।
ज्ञानं ज्ञेयं ज्ञानगम्यं हृदि सर्वस्य धिष्ठितम् ॥ १३-१७ । १३६

हें ब्रह्म १ ( ज्योतिषामपि ज्योतिः ) परमावधीचें प्रकाशमान, २ (तमसः परम् ) अगदी गर्द अंधःकारमय [ आणि म्हणून उभयपक्षींहि डोळ्यांना न दिसणारें ], ३ ( अनादि ) अमर्याद, ४ (दूरस्थ) फार दूरपर्यंत पसरलेलें [ आधुनिक वैज्ञानिकांच्या मतें फक्त विश्वविस्तारदेखील एक कोटि प्रकाशवर्षांच्या घेराचा आहे—प्रकाशवर्ष म्हणजे दर सेकंदास १८६००० मैल या वेगानें धांवणाऱ्या प्रकाशकिरणाला एका वर्षांत गांठतां येईल एवढें अंतर], ५ ( अन्तिकस्थ ) प्रत्येकाला अगदीं जवळ—अगदी त्याचें सर्व शरीर अन्तर्बाह्य व्यापून टाकणारें, ६ (अविभक्त) एकच एक—अखंड, ७ (सूक्ष्म) अत्यंत विरल, ८ ( सूक्ष्मत्वादविज्ञेय ) अत्यत विरल असल्यामुळें समजून न येणारें, ९ ( सत् ) खरोखर असलेलें, १० ( असत् ) परंतु खऱ्या वाटणाऱ्या सामान्य वस्तूप्रमाणें प्रत्ययास न येणारें, ११ ( अचर ) स्थलातीत असल्यामुळें स्थलान्तर करूं न शकणारें, १२ ( चर ) हालचाल करणारें—स्पंदन पावणारें (?), १३ ( निर्गुण ) सामान्य वस्तूंचीं कोणतींहि लक्षणें नसलेलें, १४ ( गुणभोक्तृ ) सत्त्व, रज, तम हे गुण धारण करूं शकणारें, १५ ( प्रभविष्णु ) ज्यापासून विश्वाचा उद्भव होणें शक्य आहे असें, १६ ( सर्वेंद्रियविवर्जित ) कोणतेंहि इंद्रिय नसलेलें, १७ (सर्वेंद्रियगुणाभास) पण ज्यापासून सर्व इंद्रियांचा उद्भव होणें शक्य आहे असें, १८ ( सर्वतः पाणिपादं तत्सर्वतोऽक्षिशिरोमुखं । सर्वतः श्रुतिमल्लोके ) ज्याला सर्वत्र उत्पन्न झालेल्या नाना प्राण्यांच्या द्वारें सर्वत्र हात, पाय, डोळे, डोकीं, तोंडें, कान, इत्यादि इंद्रियें उत्पन्न होतात असें, १९ ( भूतभृत्, बहिरन्तश्चभूतानां) त्या सर्व भूतांना अगदीं अन्तर्बाह्य व्यापणारें, २० ( सर्वभृत्, सर्वमावृत्य

तिष्ठन् ) प्राण्यांखेरीज निरींद्रिय, जड वस्तूंनाहि अन्तर्बाह्य व्यापून शिवाय शिल्लक उरणारें, २१ ( भूतेषु विभक्तमिव च स्थितं ) नाना स्थावरजंगम भूतांच्या ठिकाणीं त्यांच्या जड देहाच्या पृथक्त्वामुळें पृथक्त्वानें व अनेकत्वानें प्रत्ययास येणारें, २२ ( ज्ञेय ) योग्य उपायांनीं ओळखतां येणारें, २३ ( ज्ञानगम्य ) ज्ञानद्वारांच ओळखतां येणारें, २४ ( ज्ञान ) केवळ ज्ञानरूप अगर अनुभवरूप असलेलें, २५ **हृदि सर्वस्य धिष्ठितम्** व प्रत्येकाला स्वतःच्या अन्तःकरणांत ' अहं ' अगर ' मी ' या रूपानें प्रत्ययास येणारें असें आहे.[1] १३१-१३६

**सहस्रयुगपर्यंतमहर्यद्ब्रह्मणो विदुः ।**
**रात्रिं युगसहस्रांतां तेऽहोरात्रविदो जनाः ॥** ८-१७ । १३७
**अव्यक्ताद्व्यक्तयः सर्वाः प्रभवंत्यहरागमे ।**
**रात्र्यागमे प्रलीयंते तत्रैवाव्यक्तसंज्ञके ॥** ८-१८ । १३८

ब्रह्मदेवाच्या सहस्रयुगावधि दिवसाच्या सकाळीं या अव्यक्त ब्रह्मापासून व्यक्त विश्व अविर्भाव पावूं लागतें व सायंकाळीं त्यांतच परत अन्तर्धान पावूं लागतें; आणि असें हें चक्र नेहमीं चालू आहे. १३७-१३८

**भूतग्रामः स एवायं भूत्वा भूत्वा प्रलीयते ।**
**रात्र्यागमेऽवशः पार्थ प्रभवत्यहरागमे ॥** ८-१९ । १३९
**परस्तस्मात्तु भावोऽन्यो व्यक्तोऽव्यक्तात्सनातनः ।**
**यः स सर्वेषु भूतेषु नश्यत्सु न विनश्यति ॥** ८-२० । १४०

या अविर्भावअन्तर्भावचक्रक्रमांत उद्भवविनाशाची बाधा या ब्रह्मशक्तीला मात्र होत नाहीं. १३९-१४०

**अव्यक्तोऽक्षर इत्युक्तस्तमाहुः परमां गतिम् ।**
**यं प्राप्य न निवर्तंते तद्धाम परमं मम ॥** ८-२१ । १४१

---

१. येथें श्लोकांतील लक्षणांचा क्रम बदलून तो " अव्यक्ताद्व्यक्तयः सर्वाः प्रभवंत्यहरागमे " या पदांतील विश्वोत्क्रान्तीच्या प्रक्रियेला यथाशक्य अनुसरून लाविला आहे.

न तद्भासयते सूर्यो न शशांको न पावकः ।
यद्गत्वा न निवर्तंते तद्धाम परमं मम ॥ १५-६ । १४२

ही परमावधीची स्थिति अगर अवस्था होय. या अवस्थेस जाऊन पोहोंचल्यावर परत येण्याची भीति नाही. १४१-१४२

ॐ तत्सदिति निर्देशो ब्रह्मणस्त्रिविधः स्मृतः ।
ब्राह्मणास्तेन वेदाश्च यज्ञाश्च विहिताः पुरा ॥ १७-२३ । १४३
तस्मादोमित्युदाहृत्य यज्ञदानतपःक्रियाः ।
प्रवर्तंते विधानोक्ताः सततं ब्रह्मवादिनाम् ॥ १७-२४ । १४४
तदित्यनभिसंधाय फलं यज्ञतपःक्रियाः ।
दानक्रियाश्च विविधाः क्रियंते मोक्षकांक्षिभिः ॥ १७-२५ । १४५
सद्भावे साधुभावे च सदित्येतत्प्रयुज्यते ।
प्रशस्ते कर्मणि तथा सच्छब्दः पार्थ युज्यते ॥ १७-२६ । १४६
यज्ञे तपसि दाने च स्थितिः सदिति चोच्यते ।
कर्म चैव तदर्थीयं सदित्येवाभिधीयते ॥ १७-२७ । १४७

या ब्रह्मशक्तीचा निर्देश ॐ, तत् व सत् या पदत्रयानें केला जातो व यज्ञदानादि सत्क्रिया करतांना या तीन पदांचा निर्देश ब्रह्मवादी अवश्य करतात. १४३-१४७

निर्मानमोहा जितसंगदोषा अध्यात्मनित्या विनिवृत्तकामाः ।
द्वंद्वैर्विमुक्ताः सुखदुःखसंज्ञैर्गच्छंत्यमूढाः पदमव्ययं तत् ॥
१५-५ । १४८

ज्यांना मान, मोह, आसक्ति, कामना, सुखदुःखादि द्वंदांचा त्रास, वगैरे नसून जे आत्मज्ञानी आहेत तेच या पदाला जाऊन पोहोंचण्यास पात्र आहेत. १४३-१४८

हरिः ॐ तत्सत्

इति रचनांतरितश्रीमद्भगवद्गीतासूपनिषत्सु० अक्षरब्रह्मयोगो नाम
तृतीयोऽध्यायः ॥ ३ ॥

# चतुर्थाध्याय

## ज्ञानयोग

तृतीयाध्यायांत वर्णिलेली ब्रह्मशक्ति ही ज्ञानमय व ज्ञानगम्य असल्यामुळें त्यापुढील या चतुर्थाध्यायांत ज्या ज्ञानाच्या योगानें या शक्तीला जाणावयाचें त्या ज्ञानाची महती, ज्ञानाच्या प्राप्तीचे मार्ग, ज्ञानाची फलश्रुति, ज्ञानाचें स्वरूप व ज्ञानयुक्त अवस्थेचें वर्णन, वगैरे विषय आलेले आहेत. ब्रह्मशक्तीच्या संबंधाचें व्यक्तिकार्य म्हणजे केवळ त्या शक्तीचें ज्ञानद्वारां आराधन करणें व त्या शक्तीशीं स्वतःचें आत्मैक्य जाणणें—अनुभवणें—एवढेंच होय, हें या अध्यायांत स्पष्टपणें दर्शविलें आहे.

॥ श्रीभगवानुवाच ॥

**लोकेऽस्मिन्द्विविधा निष्ठा पुरा प्रोक्ता मयानघ।**
**ज्ञानयोगेन सांख्यानां कर्मयोगेन योगिनाम्॥ ३-३ । १४९**

श्रीभगवान् पुढें सांगतातः—अर्जुना, मुमुक्षूनीं जगांत वागण्याचे जे ज्ञानमार्ग व कर्ममार्ग हे दोन प्रकारचे मार्ग पुरातन कालापासून चालत आहेत, त्यांपैकी यापूर्वीच्या अध्यायांत वर्णिलेलें ब्रह्म आकलन करण्याचा जो ज्ञानमार्ग तो मी तुला आतां सांगतों. १४९

**अज्ञश्चाश्रद्दधानश्च संशयात्मा विनश्यति।**
**नायं लोकोऽस्ति न परो न सुखं संशयात्मनः॥ ४-४० । १५०**

अर्जुना, अज्ञान व त्याचप्रमाणें श्रद्धाहीनता यांच्या योगानें फार नुकसान होतें. १५०

**न हि ज्ञानेन सदृशं पवित्रमिह विद्यते। ४-३८-१ ।**
**ज्ञानं लब्ध्वापरां शान्तिमचिरेणाधिगच्छति॥ ४-३९-२ । १५१**

ज्ञानासारखी पवित्र वस्तु अन्य कोणतीहि नाहीं. ज्ञानानें मनाला उच्च प्रकारची शांति प्राप्त होते. १५१

श्रेयान् द्रव्यमयाद्यज्ञाज्ज्ञानयज्ञः परंतप ।
सर्वं कर्माखिलं पार्थ ज्ञाने परिसमाप्यते[1] ॥ ४-३३ । १५२

ज्ञानदानासारखें पुण्य नाहीं. कर्माचा अन्तिम हेतु ज्ञान हाच होय. १५२

श्रद्धावाँल्लभते ज्ञानं तत्परः संयतेंद्रियः । ४-३९-१ ।
तत्स्वयं योगसंसिद्धः कालेनात्मनि विंदति ॥ ४-३८-२ । १५३

ज्ञान हें श्रद्धा, तत्परता व इंद्रियनिग्रह यांच्या साहाय्यानें मिळतें. १५३

तद्विद्धि प्रणिपातेन परिप्रश्नेन सेवया ।
उपदेक्ष्यंति ते ज्ञानं ज्ञानिनस्तत्त्वदर्शिनः ॥ ४-३४ । १५४

त्याचप्रमाणें ते ज्ञान ज्ञानसंपन्न गुरूची सेवा केल्यानेंहि मिळतें. १५४

ज्ञानेन तु तदज्ञानं येषां नाशितमात्मनः ।
तेषामादित्यवज्ज्ञानं प्रकाशयति तत्परम् ॥ ५-१६ । १५५

खरोखर पाहतां ज्ञानप्राप्तीची मुख्य प्रक्रिया म्हणजे अज्ञाननाश ही होय. अज्ञानपटल नाहींसें होतांच ज्ञानसूर्याचा प्रकाश अंतःकरणांत नेहमींचाच असलेला प्रत्ययास येतो. १५५

यज्ज्ञात्वा न पुनर्मोहमेवं यास्यसि पांडव ।
येन भूतान्यशेषेण द्रक्ष्यस्यात्मन्यथो मयि ॥ ४-३५ । १५६

---

१. या विधानानें टीकाकारांचा बराच गोंधळ उडालेला दिसतो. परंतु व्यवहाराला जेवढी सत्यता आहे, तेवढ्या सत्यतेच्या दृष्टीनें अन्तिम आणि उपांत्य किंवा अन्तिम आणि सद्यःकालीन यांत फरक करणें जरूर आहेसे वाटते. " पढतव्यं तरी मर्तव्यं, न पढतव्यं तरी मर्तव्यं वृथा श्रमं किं कर्तव्यं ' या प्रकारच्या एकाद्या उनाड बटूच्या वाचाळ युक्तिवादांत जेवढें स्वारस्य आहे त्यापेक्षां जास्त स्वारस्य, केवळ अन्ताची चिंता वाहणाऱ्या अंत्यवाद्यांच्या विधानांत असेल असें वाटत नाहीं. ध्येयाकडे पूर्ण दुर्लक्ष करून वाऱ्याबरोबर वाहत जाणें जसें चुकीचें, तसेंच फक्त ध्येयाकडेच लक्ष ठेवून बिकट सद्यःपरिस्थितीच्या खड्ड्यापलीकडे उडी मारावयास चुकणें हेंहि चुकीचेंच वाटतें. समाप्ति, शेवट व अन्त या संज्ञांचा तर्कशुद्ध अर्थ करूं गेल्यास हातीं निश्चितरूप कांहीं लागेल असें मानणें कठीण वाटतें.

ज्ञानप्राप्तीची एक खूण अशी आहे कीं, सर्व भूतमात्रांच्या ठिकाणीं एका ईश्वराचें व स्वतःच्या ईश्वरमयत्वामुळें स्वतःचेंहि अधिष्ठान प्रत्ययास येतें. म्हणजे आपण स्वतःच सर्व भूतांमध्यें आहोंत, असा वैश्वानुभव येऊं लागतो.[1] १५६

न कर्तृत्वं न कर्माणि लोकस्य सृजति प्रभुः ।
न कर्मफलसंयोगं स्वभावस्तु प्रवर्तते ॥ ५-१४ । १५७
नादत्ते कस्यचित्पापं न चैव सुकृतं विभुः ।
अज्ञानेनावृतं ज्ञानं तेन मुह्यंति जंतवः ॥ ५-१५ । १५८

शिवाय ज्ञानप्राप्तीचा अन्य एक परिणाम सहजच असा होतो कीं, परमेश्वर लोकांचीं कर्तव्यकर्मे आंखून देतो व तीं त्यांनीं केल्या न केल्यास पुण्य-पाप त्यांच्या माथीं मारून व त्यांबद्दल कर्मविपाकप्रक्रियेप्रमाणें त्यांना सुख-दुःखभोग प्राप्त करून देतो, इत्यादि भ्रामक कल्पना नाहींशा होतात. ईश्वर या कोणत्याहि भानगडींत पडत नाहीं, तर या सर्व गोष्टी केवळ जडप्राकृतिक-निसर्गनियमानुसार जेवढ्या घडतात तेवढ्याच घडतात.[2] १५७-१५८

अपि चेदसि पापेभ्यः सर्वेभ्यः पापकृत्तमः ।
सर्वं ज्ञानप्लवेनैव वृजिनं संतरिष्यसि ॥ ४-३६ । १५९
यथैधांसि समिद्धोऽग्निर्भस्मसात्कुरुतेऽर्जुन ।
ज्ञानाग्निः सर्वकर्माणि भस्मसात्कुरुते तथा ॥ ४-३७ । १६०
योगसंन्यस्तकर्माणं ज्ञानसंछिन्नसंशयम् ।
आत्मवंतं न कर्माणि निबध्नंति धनंजय ॥ ४-४१ । १६१

अर्जुना, ज्याअर्थी तूं भीष्मद्रोणादिकांशीं लढण्यांत पाप आहे, असा विवाद करीत आहेस, त्याअर्थी मला तुझ्या मनावर ही गोष्ट ठसवावयाची

---

१. (Cosmic Consciousness) शरीरांतील प्रत्येक कले(Cell) बद्दल आपलेपणा वाटण्याचा जो अनुभव प्रत्येक प्राण्याला येतो त्या अनुभवाची सर्व जगाला व्यापून टाकणारी परमावधि.

२. कर्मसिद्धान्तवाद्यांनीं या गीताविधानाचा नीटसा विचार केलेला दिसत नाहीं.

आहे कीं, तुझ्या हातून परमावधीचीं घोर पापें घडत आहेत. अशी जरी सांप्रत तुझी कल्पना असली तरी तुला सम्यग्ज्ञान होतांच त्या पापभावनेच्या समुद्रांतून तूं सहज तरून जाशील. कारण ज्ञानप्राप्ती होतांच पापपुण्याच्या ( पारलौकिक व पुनर्जन्मद्वारां ऐहिक ) फलभोगाच्या भ्रामक कल्पनांचा पार धुराळा उडून जातो. ज्यांनीं फलाबद्दल आसक्ति न ठेवण्याच्या युक्तीचा अवलंब करून केवळ प्रवाहपतित कर्में केलीं आहेत, त्यांना तीं कर्में कर्मविपाकप्रक्रियेंत ग्राह्य मानलेल्या पद्धतीनें बाधक होऊंच शकत नाहींत.[1] १५९-१६१

यानंतर अर्जुना तुला ज्ञानाचीं किंवा ज्याला ज्ञान झालें आहे अशा ज्ञानी पुरुषाचीं कांहीं लक्षणें सांगतों. तीं म्हणजे:—

अमानित्वमदंभित्वमहिंसा क्षांतिरार्जवं ।
आचार्योपासनं शौचं स्थैर्यमात्मविनिग्रहः ॥ १३-७ । १६२

इंद्रियार्थेषु वैराग्यमनहंकार एव च ।
जन्ममृत्युजराव्याधिदुःखदोषानुदर्शनम् ॥ १३-८ । १६३

असक्तिरनभिष्वंगः पुत्रदारगृहादिषु ।
नित्यं च समचित्तत्वमिष्टानिष्टोपपत्तिषु ॥ १३-९ । १६४

मयि चानन्ययोगेन भक्तिरव्यभिचारिणी ।
विविक्तदेशसेवित्वमरतिर्जनसंसदि ॥ १३-१० । १६५

---

१. या ठिकाणीं ही गोष्ट लक्षांत ठेवली पाहिजे कीं, स्वकर्माचें जडसृष्टिनियमानुसार मिळणारें फलहि ज्ञानानें टळतें, असला अपसिद्धान्त येथें प्रतिपादिलेला नाहीं. अर्जुन ज्या वेळीं भीष्मद्रोणांवर शस्त्र उपशील त्या वेळीं अर्जुन ज्ञानी असला तरी तो ज्ञानी आहे, एवढ्याचकरितां भीष्मद्रोण आपले हात खिशांत अगर गोमुखींत घालून बसणार नाहींत. अगर त्यांनीं अर्जुनावर रोखून फेंकलेलीं शस्त्रास्त्रें, अर्जुन स्वतः न चुकवील तर, केवळ अर्जुन ज्ञानी आहे एवढ्याचकरितां, स्वयंस्फूर्तीनें वांकड्या रस्त्यांनीं पळून जाऊन अर्जुनास बचावणार नाहींत. ज्ञानानें जें काय होणार आहे तें म्हणजे कर्मविपाकप्रक्रियेंतील भ्रामक विधानानुरूप, अर्जुनाची अस्थानीं असलेली कर्मसिद्धान्तानुरूप कर्मफलभोगाची भीति नाहींशी होणार आहे.

**अध्यात्मज्ञाननित्यत्वं तत्त्वज्ञानार्थदर्शनम् ।**
**एतज्ज्ञानमिति प्रोक्तमज्ञानं यदतोऽन्यथा ॥** १३-११ । १६६

१ सामान्य लोकांच्या संगतीची आवड नसणें, २ पुत्रदारगृहादिकांमध्यें गुरफटून न जाणें, ३ एकान्ताचा आश्रय करणें, ४ गुरुसेवा, ५ शुचिता, ६ स्थिरवृत्ति, ७ इष्टानिष्ट गोष्टी घडल्या असतां त्यांबद्दल औदासिन्य, ८ इंद्रियविषयांबद्दल तिटकारा, ९ अहिंसा, १० क्षमा, ११ सरळपणा, १२ दंभहीनता, १३ मानहीनता, १४ अहंकारहीनता, १५ जन्ममृत्यु इत्यादिक दोषांबद्दल तिरस्कार, १६ एकनिष्ठ ईश्वरसेवा, १७ तत्त्वज्ञानाचा हव्यास व १८ आत्मज्ञान हेंच टिकाऊ ज्ञान सबब संग्राह्य ज्ञान अशी भावना असणें, हीं होत. १६२-१६६

**बुद्ध्या विशुद्धया युक्तो धृत्यात्मानं नियम्य च ।**
**शब्दादीन्विषयांस्त्यक्त्वा रागद्वेषौ व्युदस्य च ॥** १८-५१ १६७

याशिवायहि याच प्रकारच्या अन्य अनेक लक्षणांचा निर्देश करितां येईल.[1] १६७

**विविक्तसेवी लघ्वाशी यतवाक्कायमानसः ।**
**ध्यानयोगपरो नित्यं वैराग्यं समुपाश्रितः ॥** १८-५२ । १६८

तथापि मुख्यत्वेंकरून अनासक्ति, कामनात्याग व आत्मजय यांच्या योगानें जी एक वृत्ति बनून राहते ती संन्यस्तवृत्ति म्हणतां येईल. त्या वृत्तीच्या जोरावर कर्में करीत असूनहि न केल्याप्रमाणें त्यांच्या फलाची बाधा न होतां राहण्याची अवस्था प्राप्त होते. १६८

---

१. ज्ञानाचीं आणि ज्ञाननिष्ठेचींहि मूलगीतेंत भिन्नभिन्न ठिकाणीं दिलेलीं लक्षणें, त्याचप्रमाणें, भक्त, योगी, स्थितप्रज्ञ, संन्यासी यांचींहि दिलेलीं लक्षणें थोडयाबहुत प्रमाणानें एकच आहेत. त्यांतील कमीजास्तपणावरून त्या विशिष्ट अवस्थेचा बोध होतोच असें नाहीं; फार तर त्यांच्या समवायानें गीतेतील इष्ट लक्षणांची एक सुंदर मालिका तयार करितां येईल.

**असक्तबुद्धिः सर्वत्र जितात्मा विगतस्पृहः ।**
**नैष्कर्म्यसिद्धिं परमां संन्यासेनाधिगच्छति ॥** १८-४९ । १६९
**सिद्धिं प्राप्तो यथा ब्रह्म तथाप्नोति निबोध मे ।**
**समासेनैव कौन्तेय निष्ठा ज्ञानस्य या परा ॥** १८-५० । १७०

अशा प्रकारची नैष्कर्म्यावस्था प्राप्त झाली असतां, ज्या प्रकारच्या ब्राह्मी स्थितीचा अनुभव सदेह स्थितींत असतांहि सिद्ध पुरुषाला येतो व जी ज्ञानाची परमोच्च अवस्था होय, त्या अवस्थेचें वर्णन मी आतां थोडक्यांत करतों. १६९-१७०

**अहंकारं बलं दर्पं कामं क्रोधं परिग्रहम् ।**
**विमुच्य निर्ममः शांतो ब्रह्मभूयाय कल्पते ॥** १८-५३ । १७१

अशा व्यक्तीच्या ठिकाणीं अहंकार, सामर्थ्य, मद, गर्व, वासना, क्रोध व आशापाश यांचा अभाव असतो. त्याच्या ठिकाणीं ममत्व अगर 'माझें'-पणा उरलेला नसतो व त्याची वृत्ति शान्त बनलेली असते. ही ब्रह्ममय होण्याची पात्रता होय. १७१

**ब्रह्मभूतः प्रसन्नात्मा न शोचति न कांक्षति ।**
**समः सर्वेषु भूतेषु मद्भक्तिं लभते पराम् ॥** १८-५४ । १७२

यानंतर ब्रह्ममयता अंगीं बाणून त्या अनुभवानें त्याचें अन्तःकरण आनंदित झालें असतां, त्याच्या मनांत अप्राप्य वस्तूची आकांक्षा अगर नष्ट वस्तूबद्दल शोक यांना थारा नसतो. सर्वांभूतीं त्याची दृष्टि सम असते व ईश्वराच्या ठिकाणीं तो भक्तिभावानें रमलेला असतो. १७२

**भक्त्या मामभिजानाति यावान्यश्चास्मि तत्त्वतः ।**
**ततो मां तत्त्वतो ज्ञात्वा विशते तदनंतरम् ॥** १८-५५ । १७३

याप्रमाणें ईशप्रेमांत रंगून गेल्यानंतर ईश्वर म्हणजे काय व तो कसा असतो हें त्याला कळतें; आणि नंतरच्या अवस्थेंत ईश्वर आणि आपण स्वतः एकच आहोंत, हें यथार्थ ज्ञान त्याला झालें म्हणजे तो ईश्वरमय झालाच असें समज. १७३

सर्वकर्माण्यपि सदा कुर्वाणो मद्व्यपाश्रयः ।
मत्प्रसादादवाप्नोति शाश्वतं पदमव्ययम् ॥ १८-५६ । १७४

अशा ईश्वरैक्यास्थितीस येऊन पोहोंचल्यानंतर तो प्रवाहपतित सर्व कर्मे करीत असतांहि त्याला त्याच्या ईश्वरैक्यवृत्तीमुळें कर्मफलभोगाच्या अज्ञानजन्य बाधेचा संभव उत्पन्न न होतां शाश्वत व अव्यय अशी जी ब्रह्मस्थिति त्या स्थितींत चिरकाल राहतां येतें. १७४

हरिः ॐ तत्सत्

इति रचनान्तरितश्रीमद्भगवद्गीतासूपनिषत्सु० ज्ञानयोगो नाम चतुर्थोऽध्यायः ॥ ४ ॥

---

## पंचमाध्याय

# पुराणपुरुषोत्तमयोग

तिसऱ्या अध्यायांत जें ब्रह्मशक्तीचें वर्णन आलें आहे, तें ती केवळ एक वैश्वशक्ति या दृष्टीनें आलें आहे. तथापि ही वैश्वशक्ति प्रत्येक व्यक्तीशींहि निगडित आहे एवढेंच नव्हे तर प्रत्येक व्यक्तीचा व या वैश्वशक्तीचा फारच जिव्हाळ्याचा संबंध असून व्यक्तीचें उच्च—वरिष्ठ—स्वरूप या वैश्वशक्तीशीं समरूपच आहे. श्रुतींनीं हा सिद्धान्त " अयमात्मा ब्रह्म " या महावाक्यानें प्रतिपादिलेला आहे. शिवाय अर्जुनाचा दुसरा प्रश्न " अध्यात्म म्हणजे काय? " अगर " व्यक्तीच्या आत्म्याचें स्वरूप कसें आहे ? " हा होय आणि या प्रश्नाचें उत्तर या अध्यायांत " अयं आत्मा ब्रह्म " या महावाक्याचा आधार घेऊन दिलेलें आहे.

या अध्यायांत आत्म्याचें ब्रह्मशक्तीशीं ऐक्य ध्वनित केलें असून ब्रह्मशक्तीप्रमाणें आत्माहि एक, सर्व विश्वाची उत्पत्तिस्थिति व लयकर्ता, सर्व भूतांना एकत्वानें व्यापून राहणारा, प्रकृतीशीं कमीअधिक दृढ संबंध ठेवणारा व तदनुसार सुखदुःखांचा अनुभव घेणारा, तथापि तो पूर्णपणें प्रकृतीच्या तावडींत कधींहि न सांपडणारा आहे, असें आत्म्याचें वर्णन केलेलें आहे.

श्रीभगवानुवाच

द्वाविमौ पुरुषौ लोके क्षरश्चाक्षर एव च ।
क्षरः सर्वाणि भूतानि कूटस्थोऽक्षर उच्यते ॥ १५-१६ । १७५

श्रीभगवान् सांगतातः—अर्जुना, सांप्रत प्रचलित लौकिक समजूत अशी आहे कीं, या विश्वांत (१) दृश्य, नाशवंत व जड अशी अधिभौतिक घटना अगर अपरा प्रकृति आणि (२) तिच्यापेक्षांहि खोलांत असलेली अदृश्य, नित्य व अव्यक्त अशी अधिदैविक घटना अगर परा प्रकृति अशीं दोनच तत्त्वें अगर पुरुष आहेत. या दोहोंसच अनुक्रमें क्षरपुरुष व अक्षरपुरुष अशीं मानवी नांवें आहेत. १७५

उत्तमः पुरुषस्त्वन्यः परमात्मेत्युदाहृतः ।
यो लोकत्रयमाविश्य बिभर्त्यव्यय ईश्वरः ॥ १५-१७ । १७६

परंतु या दोहोंपेक्षांहि वरिष्ठ अशी अध्यात्मिक सत्ता या विश्वांत आहे. त्या सत्तेला उत्तमपुरुष, पुरुषोत्तम अगर परमात्मा म्हणतात. हा या सर्व क्षराक्षरांना अन्तर्बाह्य व्यापून पुनःश्च पूर्णरूपानें उरला आहे. १७६

यतंतो योगिनश्चैनं पश्यंत्यात्मन्यवस्थितम् ।
यतंतोऽप्यकृतात्मानो नैनं पश्यंत्यचेतसः ॥ १५-११ । १७७

ज्यांची बुद्धि सुसंस्कृत आहे त्यांना हा परमात्मा प्रयत्न केल्यानें स्वतःच्या ठिकाणीं ओळखतां येतो. मात्र बुद्धि सुसंस्कृत नसेल तर नुसत्या प्रयत्नानेंच हा परमात्मा ओळखणें शक्य नाहीं. १७७

पुरुषः स परः पार्थ भक्त्या लभ्यस्त्वनन्यया ।
यस्यांतःस्थानि भूतानि येन सर्वमिदं ततम् ॥ ८-२२ । १७८

अर्जुना, तू या परमात्मपुरुषोत्तमाला भक्तिबलानें ओळखलें पाहिजेस. यानेंच हें सर्व विश्व स्वतःमध्यें उत्पन्न केलें आहे. १७८

समं सर्वेषु भूतेषु तिष्ठंतं परमेश्वरम् ।
विनश्यत्स्वविनश्यंतं यः पश्यति स पश्यति ॥ १३-२७ । १७९

या विनाशपरिणामी सर्व विश्वांत सम-एक-रूपानें भरून राहिलेल्या या अविनाशी तत्त्वाला ज्यानें जाणलें तोच खरा ज्ञाता. १७९

समं पश्यन्हि सर्वत्र समवस्थितमीश्वरम् ।
न हिनस्त्यात्मनात्मानं ततो याति परां गतिम् ॥ १३-२८ । १८०

हें तत्त्व उच्चनीच सर्व विश्वघटनांत एकरूपानें वावरत असून तें त्या घटनांच्या ठिकाणीं उच्चनीच भेदभाव ठेवीत नाहीं, हें ज्यानें ओळखलें तोच मरणातीत होत्साता मोक्षपद पावतो–जीवन्मुक्त होतो. १८०

यदा भूतपृथग्भावमेकस्थमनुपश्यति ।
तत एव च विस्तारं ब्रह्म संपद्यते तदा ॥ १३-३० । १८१

जेव्हां या नानारूप विश्वाची उत्पति, स्थिति व लय एकच तत्त्वाच्या ठिकाणीं संभवत असल्याचें उमगतें तेव्हांच मोक्ष प्राप्त होते. १८१

अनादित्वान्निर्गुणत्वात्परमात्मायमव्ययः ।
शरीरस्थोऽपि कौन्तेय न करोति न लिप्यते ॥ १३-३१ । १८२

आणि मौज ही आहे कीं, स्वतःमध्यें नानारूप विश्वोत्पत्ति करूनहि परमात्मा हा अनादि व त्याचप्रमाणें निर्गुण या अवस्थांत पुन्हा शिल्लक उरतच असल्यामुळें तो शरीराला अन्तर्बाह्य व्यापून टकणारा असतांहि कर्मफलभोगाचें बंधन त्यावर येतें असें म्हणतां येत नाहीं. १८२

यथा सर्वगतं सौक्ष्म्यादाकाशं नोपलिप्यते ।
सर्वत्रावस्थितो देहे तथात्मा नोपलिप्यते ॥ १३-३२ । १८३

ज्याप्रमाणें आकाश हें वस्तूंच्या अणुपरमाणूंच्या दरम्यान असलेल्या लहानलहान छिद्रां( Inter-Electronic Space ) मध्येंहि प्रवेश करीत असलें तरी त्यामुळें त्याचे लहान लहान तुकडे पडत नाहींत त्याचप्रमाणें या जड घटनांच्या दरम्यान् होणाऱ्या कार्याचाहि परिणाम त्यांना व्यापून असलेल्या ब्रह्मवस्तूवर होत नाहीं. ( कृति ही पृथक्रूप जडघटनांच्या दरम्यानच शक्य आहे. एकरूप ब्रह्मशक्तीच्या ठिकाणीं कृति संभवत नसून फक्त स्थितीच संभवते; आणि एवढ्यामुळेंच फक्त या मृत्युभूमीलाच कर्मभूमि म्हणतात. ) १८३

यथा प्रकाशयत्येकः कृत्स्नं लोकमिमं रविः ।
क्षेत्रं क्षेत्री तथा कृत्स्नं प्रकाशयति भारत ॥ १३-३३ । १८४

ज्याप्रमाणें सूर्य एकच असूनहि सर्व जगाला प्रकाश देतो, त्याचप्रमाणें अनेक, असंख्य देहघटनांत आत्मतत्त्व एकच असून तेंच नाना देहांच्या प्राकृतिक घटनाभिन्नत्वानुरूप त्यांच्यामध्यें भिन्न भिन्न प्रकारचा ज्ञानप्रकाश अगर चैतन्यमयता घडवून आणतें. १८४

यस्मात्क्षरमतीतोऽहमक्षरादपि चोत्तमः ।
अतोऽस्मि लोके वेदे च प्रथितः पुरुषोत्तमः ॥ १५-१८ । १८५

ज्याअर्थी, पूर्वी सांगितल्याप्रमाणें, हा आत्मस्वरूपी मी अगर हें माझें आत्मस्वरूप दृश्य विश्व व अदृश्य प्रकृतितत्त्व यांच्यापेक्षांहि वरिष्ठ दर्जाचें आहे, त्याअर्थी मला पुरुषोत्तम हें नांव पडलें आहे. १८५

अजोऽपि सन्नव्ययात्मा भूतानामीश्वरोऽपि सन् ।
प्रकृतिं स्वामधिष्ठाय संभवाम्यात्ममायया ॥ ४-६ । १८६

मी स्वतः अजन्मा आहें आणि अविनाशी आहें. तथापि मी माझ्या अंगच्या मायानामक विशिष्ट शक्तीनें माझ्या स्वतःमध्यें प्रकृतिरूपानें आविर्भूत होतों. १८६

भूमिरापोऽनलो वायुः खं मनो बुद्धिरेव च ।
अहंकार इतीयं मे भिन्ना प्रकृतिरष्टधा ॥ ७-४ । १८७
अपरेयमितस्त्वन्यां प्रकृतिं विद्धि मे पराम् ।
जीवभूतां महाबाहो ययेदं धार्यते जगत् ॥ ७-५ । १८८

अर्जुना, हे माझे प्राकृतिक आविर्भाव ( १ ) अपरा व ( २ ) परा अशा दोन उच्च-नीच प्रकारचे आहेत. माझी उच्च प्रकारची पराप्रकृति म्हणजे विश्वांतील जीवभाव अगर चित्कला होय; आणि या पराप्रकृतीच्या योगानें विश्वाचें धारण होतें. तसेंच माझी नीच प्रकारची अपराप्रकृति म्हणजे विश्वांतील जडभाव होय व या जडभावाचेहि अहंकार, बुद्धि, मन, आकाश, वायु, तेज, आप व पृथ्वी असे आठ बाढत्या प्रमाणांत जड पण प्रत्येकीं पूर्वोक्त सर्व भागांनीं अन्तर्बाह्य व्याप्त असलेले उपभाग होत. १८७-८८

**एतद्योनीनि भूतानि सर्वाणीत्युपधारय ।**
**अहं कृत्स्नस्य जगतः प्रभवः प्रलयस्तथा ॥** ७-६ । १८९

जगांतील सर्व भूतें या पराअपराप्रकृतींपासूनच उत्पन्न होतात व मी या दोन्ही परा-अपरा प्रकृतींचाहि उत्पत्तिस्थितिलयकर्ता आहें. १८९

**प्रकृतिं स्वामवष्टभ्य विसृजामि पुनः पुनः ।**
**भूतग्राममिमं कृत्स्नमवशं प्रकृतेर्वशात् ॥** ९-८ । १९०

या माझ्या प्रकृतीला मी उत्पन्न करतों व तींतच पुन्हा प्रवेश करून हें सर्व विश्व मी युगायुगाच्या ठायीं वारंवार उत्पन्न करतों.[1] १९०

**मयाऽध्यक्षेण प्रकृतिः सूयते सचराचरम् ।**
**हेतुनानेन कौंतेय जगद्विपरिवर्तते ॥** ९-१० । १९१

माझ्या नियमनानुरूप प्रकृति ही सर्व विश्वाची उत्पत्ति, उत्क्रान्ति, संस्कृति व लय वगैरे सर्व अवस्था घडवून आणते आणि यामुळेंच, हे कौन्तेया, ही जगाची सर्व घडामोड चालली आहे. १९१

**न च मां तानि कर्माणि निबध्नंति धनंजय ।**
**उदासीनवदासीनमसक्तं तेषु कर्मसु ॥** ९-९ । १९२

मात्र मी या सर्व उलाढालीबद्दल उदासीन आहें आणि सबब या उलाढालीमुळें जगांत नाना जीवांना प्राप्त होणाऱ्या सुखदुःखांची जबाबदारी मजवर नाहीं.[2] १९२

---

१. तुल्यः—' तत्सृष्ट्वा तदेवानुप्राविशत् । ' तैत्तिरीयोपानिषत् । २–६.

२. हें तत्त्वज्ञान विश्वोत्पत्ति ही निर्हेतुक (Purposeless) असल्याच्या कल्पनचा पाठपुरावा करतें हें नाकबूल करतां येत नाहीं. परंतु हेतुमत्त्वाचा वैयक्तिक दृष्टिकोण व निर्हेतुकत्वाचा वैश्वदृष्टिकोण हे एकच नसतील असें कशावरून ? ज्याप्रमाणें आइनस्टाइनच्या सापेक्षदर्शना( Theory of Relativity )नुरूप अनेक प्रचलित समजुतींचा उच्छेद झाला, त्याप्रमाणें गीतेंतील निर्हेतुक विश्वरचनेचें तत्त्व जर कोणी ज्ञाता समजावून सांगेल तर विश्व जर सहेतुक नसेल तर अध्यात्मिक मूल्य (Spiritual Value) कांहीं उरणार नाहीं ही मूल्यवाद्यांची कल्पनाहि समाधि घेईल.

यदादित्यगतं तेजो जगद्भासयतेऽखिलम् ।
यच्चंद्रमसि यच्चाग्नौ तत्तेजो विद्धि मामकम् ॥ ११-१२ । १९३
गामाविश्य च भूतानि धारयाम्यहमोजसा ।
पुष्णामि चौषधीः सर्वाः सोमो भूत्वा रसात्मकः ॥ ११-१३ । १९४

प्रत्यक्ष अग्नि, चंद्र, सूर्य, असल्या महान् ज्योतींमधला प्रकाश हाहि माझा स्वतःचाच होय. मीच पृथ्वीतत्त्वांत स्वबलानें आविर्भाव पावून त्या योगानें सर्व भूतांचें धारण करतों व जलतत्त्वांत आविर्भाव पावून जलावलंबी असलेल्या सर्व वनस्पतींचें पोषण करतों. १९३-१९४

अहं वैश्वानरो भूत्वा प्राणिनां देहमाश्रितः ।
प्राणापानसमायुक्तः पचाम्यन्नं चतुर्विधम् ॥ १५-१४ । १९५

प्राण्याच्या ठिकाणीं प्रत्ययास येणारी अन्नपचनाची क्रियाहि मीच वैश्वानर-नामक अग्नीचें रूप धारण करून घडवून आणतों. १९५

ममैवांशो जीवलोके जीवभूतः सनातनः ।
मनःषष्ठानींद्रियाणि प्रकृतिस्थानि कर्षति ॥ १५-७ । १९६

प्रत्येक देहामध्यें जडघटनाभिन्नत्वानुरूप भिन्न प्रकारें प्रत्ययास येणारी जीवात्मसंज्ञक शक्ति ही माझाच घटाकाशवत् अखंडांश होय आणि तोच अव्यक्तप्रकृतींमधून इंद्रियें व मन यांचें आविष्करण ( Physical and Mental Evolution) घडवून आणतो. १९६

श्रोत्रं चक्षुः स्पर्शनं च रसनं घ्राणमेव च ।
अधिष्ठाय मनश्चायं विषयानुपसेवते ॥ १५-९ । १९७

आणि ज्ञानेंद्रियें व मन यांच्या ठिकाणींहि तो असल्यामुळें तो इंद्रिय-विषयोपभोग घेतोसा दिसतो. १९७

शरीरं यदवाप्नोति यच्चाप्युत्क्रामतीश्वरः ।
गृहीत्वैतानि संयाति वायुर्गंधानिवाशयात् ॥[1] १५-८ । १९८

---

१. तुल्यः—यदेतद्रेतस्तदेतत्सर्वेभ्योऽङ्गेभ्यस्तेजःसंभूतमात्मन्येवात्मानं बिभर्ति तद्यदा स्त्रियां सिञ्चत्यथैनज्जनयति तदस्य प्रथमं जन्म ( ऐतरेयारण्यक । )

जुन्या ( पितृ ) देहाचा त्याग करतांना व नव्या ( संतति ) देहाप्रत पावतांना हा अखंडांश जीवात्मा इंद्रियें व मन या जडघटनांचें तन्मात्रक सूक्ष्मांश मातापितृशरीरांतून घेऊन त्यांच्या पासूनच संततीच्या शरीराची वृद्धि घडवून आणतो. १९८

**उत्क्रामंतं स्थितं वापि भुंजानं वा गुणान्वितम् ।**
**विमूढा नानुपश्यंति पश्यंति ज्ञानचक्षुषः ॥ १५-१० । १९९**

या प्रकारें देहान्तर करतोसा वाटणाऱ्या व त्रिगुणात्मक प्राकृतिक घटनांचा परिपोष करून सुखदुःखांचा अनुभव घेतोसा वाटणाऱ्या आत्म्याला ज्ञानीच ओळखूं शकतात, अज्ञानी ओळखूं शकत नाहींत. १९९

**सर्वस्य चाहं हृदि संनिविष्टो मत्तः स्मृतिर्ज्ञानमपोहनं च ।**
**वेदैश्च सर्वैरहमेव वेद्यो वेदांतकृद्वेदविदेव चाहम् ॥ ११-१५ । २००**

अर्जुना, सर्व प्राण्यांच्या बाह्येंद्रियसमवायरूपी जडशरीरांमध्यें जें त्याव्यतिरिक्त त्यांचें अन्तःकरण अगर व्यापक शरीर असतें तें या माझ्या उच्च रूपाचेंच बनलें आहे आणि सर्व प्राण्यांची स्मरणशक्ति आणि ज्ञानशक्ति अगर त्या शक्तींचा नाश यांचें आश्रयस्थान हें माझेंच उच्च रूप होय.[1] वेदांचें कार्य हें माझें स्वरूप यथाशक्य ओळखण्याचें होय. मी मात्र, अर्थात्, वेदज्ञानातीत आहें.

**क्षेत्रज्ञं चापि मां विद्धि सर्वक्षेत्रेषु भारत ।**
**क्षेत्रक्षेत्रज्ञयोर्ज्ञानं यत्तज्ज्ञानं मतं मम ॥ १३-२ । २०१**

अर्जुना, सर्व देहांमध्यें त्या देहांचा जो ज्ञाता तो मी एकटाच आहें हें समजून घे. अनेक क्षेत्रांचा ज्ञाता एकच असतो, हें जें ज्ञान तेंच सम्यग्ज्ञान होय. २०१

**यावत्संजायते किंचित्सत्त्वं स्थावरजंगमम् ।**
**क्षेत्रक्षेत्रज्ञसंयोगात्तद्विद्धि भरतर्षभ ॥ १३-२६ । २०२**

---

१. *Comp.*—The Phenomena of life and mind seem connected with the all-permeating Ether.—**Sir Oliver Lodge.**

कोणतीहि स्थावर अगर जंगम वस्तु जी निर्माण झालीशी दिसते ती कितीहि लहान असली तरी, ती बाहेरून एक दृश्य जड प्राकृतिक भाग व त्याला अन्तर्बाह्य व्यापून टाकणारें दुसरें विश्वव्यापी आत्मतत्त्व या दुहेरी घटनेची असते. ही दुहेरी विश्वरचना नीट लक्षांत ठेवण्यासारखी आहे. २०२

उपद्रष्टानुमंता च भर्ता भोक्ता महेश्वरः ।
परमात्मेति चाप्युक्तो देहेऽस्मिन्पुरुषः परः ॥ १३-२२ । २०३

हा जो सर्व देहांमध्यें एक थोर पुरुष आहे, तो कधीं त्रिगुणात्मक प्रवृत्तीचे खेळ नुसते शेजाऱ्यांप्रमाणें बघत असतो, कोठें त्यांना अनुमति देतो व कोठें ते पूर्णतेस आणून त्यांचा बरावाईट फलभोगहि घेतो. मात्र हें सर्व करीत असतां तो त्या गुणांच्या तावडींत न सांपडतां त्यांचा नेहमीं मालक अगर धनीच असतो. २०३

प्रकृतिं पुरुषं चैव विद्ध्यनादी उभावपि ।
विकारांश्च गुणांश्चैव विद्धि प्रकृतिसंभवान् ॥ १३-१९ । २०४

अर्जुना, तसें पाहू गेलें तर प्रकृति व पुरुष या दोन्हीहि अवस्था मानवजीविताच्या दृष्टीनें फार पुरातनच्या, अगदीं अनादि आहेत, असें म्हटलें तरी चालेल. कारण अव्यक्तप्रकृतिमय विश्वाची स्थिति तरी कोणीं पाहिली आहे? तथापि प्रकृतीचे तन्मात्रादि व पंचमहाभूतादि विकार व सत्त्वरजस्तम हे गुण मात्र ब्रह्मशक्तीपासून अव्यक्त प्रकृतीचा आविर्भाव घडून आल्यानंतरचे आहेत, त्या आविर्भावापूर्वीचे नव्हेत.[१] २०४

---

१. अनादित्व ( Eternity ) म्हणजे नक्की काय हा एक तत्त्वशास्त्रांतील कूटात्मक प्रश्नच आहे. अतिवैयक्तिक व ऐतिहासिक अगर इतिहासपूर्वकाळच्या सर्व गोष्टी या अनादि या सदरांत घालावयास हरकत नसली तरी त्या योगानें त्या समकालीन अगर स्वतंत्र अगर जन्यजनकसंबंधहीनच असल्या पाहिजेत असें मानण्याचें कारण नाहीं. उदाहरणार्थ, पासिफिक महासागर ( ३२,१०० फूट खोल ) व अटलँटिक महासागर ( २७,००० फूट खोल ) हे दोघेहि, त्यांचीं मापें करतां येण्याच्या वेळेपूर्वी, सारखेच खोल होते हें म्हणणें चुकीचें नव्हे.

**कार्यकारणकर्तृत्वे हेतुः प्रकृतिरुच्यते ।**
**पुरुषः सुखदुःखानां भोक्तृत्वे हेतुरुच्यते ॥** १३-२० । २०५

देहेंद्रियादि जडघटनांचें उत्पादन हें जडप्रकृतीच्या साह्यानें शक्य झालें आहे व त्या जड घटनांच्या अनुषंगानें उत्पन्न होणारा सुखदुःखभोग हा मात्र आत्म्यास भोगावयास मिळतो अगर लागतोहि.[1] २०५

**पुरुषः प्रकृतिस्थो हि भुंक्ते प्रकृतिजान्गुणान् ।**
**कारणं गुणासंगोऽस्य सदसद्योनिजन्मसु ॥** १३-२१ । २०६

आत्मा हा भिन्नभिन्न प्राकृतिक घटनांनीं जों जों युक्त होतो तों तों त्याला भिन्नभिन्न सुखदुःखभोग प्राप्त होतात. आणि विशिष्टदेहघटनेच्या रूपांत, बऱ्या-वाईट स्थितींत जन्मास येणें हें केवळ त्रिगुणांच्या भिन्नभिन्न यादृच्छिक संयोगामुळें घडतें. ( तो कर्त्याच्या बऱ्यावाईट कर्मफलाचा परिणाम असें जें म्हणतात तें खरें नव्हे. ) २०६

**प्रकृत्यैव च कर्माणि क्रियमाणानि सर्वशः ।**
**यः पश्यति तथात्मानमकर्तारं स पश्यति ॥** १३-२९ । २०७

कर्में अगर कार्यें हीं प्रकृतीच्या नानाविध गुणभेदांच्या परस्पर संघर्षामुळें घडतात, हें लक्षांत ठेवून त्या कार्यांचें कर्तृत्व आपणाकडे नाहीं हें समजणें याचेंच नांव ज्ञान. २०७

**य एवं वेत्ति पुरुषं प्रकृतिं च गुणैः सह ।**
**सर्वथा वर्तमानोऽपि न स भूयोऽभिजायते ॥** १३-२३ । २०८
**क्षेत्रक्षेत्रज्ञयोरेवमंतरं ज्ञानचक्षुषा ।**
**भूतप्रकृतिमोक्षं च ये विदुर्यांति ते परम् ॥** १३-३४ । २०९

प्रकृति, पुरुष, देह व आत्मा, यांचीं लक्षणें व त्यांच्यांतील संबंध हें ज्याला कळलें त्यानें कांहींहि केलें तरी त्याला पुनर्जन्म प्राप्त होण्याची भीति नाहीं. तो मोक्षाला जाणारच. २०८-२०९

---

१. भोक्तृत्वाचा आरोप आत्म्यावर होतच नाहीं असें नाहीं. परंतु भोक्तृत्वांत गुरफटून जाणें न जाणें याबद्दलचें स्वातंत्र्य आत्म्यास आहे.

योे मामेवमसंमूढो जानाति पुरुषोत्तमम् ।
स सर्वविद्भजति मां सर्वभावेन भारत ॥ १५-१९। २१०

आणि अर्जुना, पुरुष व प्रकृति याहिपलीकडचा पुरुषोत्तम जो म्हणतात तो मीच हें जो बिनचूक ओळखतो त्याचेंच ज्ञान परिपूर्ण म्हणावयाचें व तोच माझी भक्ति अनन्यभावानें करून मोक्षाला जातो. २१०

हरिः ॐ तत्सत्

इति रचनांतरितश्रीमद्भगवद्गीतासूपनिषत्सु० पुराणपुरुषोत्तमयोगो नाम पंचमोऽध्यायः ॥ ५ ॥

---

## षष्ठाध्याय

# आत्मसंयमयोग

मागील अध्यायांत दृश्यविश्वाच्या मागें अव्यक्त स्वरूपांत पण दृश्य विश्वाला अन्तर्बाह्य व्यापून टाकणारें दुसरें एक अध्यात्मिक विश्व असल्याचें विशद केलें. त्याचप्रमाणें हें अध्यात्मिक विश्व प्रत्येक व्यक्तिबद्ध जडघटनेलाहि व्यापून उरलें असून तें व्यक्तीचा तिच्या जड घटनेपेक्षां जास्त महत्त्वाचा व अत्यन्त जिव्हाळ्याचा भाग—अगदीं आत्मा होय—असेंहि स्पष्ट केलें. शिवाय, विद्युच्छक्ति ही ज्याप्रमाणें सर्वव्यापी असून तिची निरनिराळ्या धातूंत निरनिराळी उत्कटता प्रत्ययास येते, त्याचप्रमाणें आत्मशक्ति ही नाना प्राकृतिक जडदेहघटनांच्या द्वारें नानाप्रकारें प्रत्ययास येते व विशिष्ट देहांत देखील कधीं उपद्रष्टा, कधीं अनुमंता, कधीं भर्ता व कधीं भोक्ता या कमी-जास्त अनुषंगाचा प्रत्यय दाखविते. मात्र या वाढत्या अनुषंगानुरूप सुखा-बरोबरच दुःखाचाहि वाढता अनुभव येणें शक्य असल्यामुळें हा जडानुषंग शक्य तितका कमी केलेलाच बरा असें कांहीं [1]मुमुक्षूंचें मत बनलें गेलें आहे;

---

१. या मोक्षमार्गी विचारसरणीच्या बुडाशीं जी एक गोष्ट दिसून येते ती ही कीं, ब्रह्मशक्तीची आविर्भावक्रिया सांप्रत परमावधीस पोहोंचली असून तिची व्यक्तिगत आत्मतत्त्वांत उत्क्रांति अगर अवतार पूर्ण झाला आहे व लंबकाच्या झोक्या

आणि शिवाय, व्यक्तिगत आत्मतत्त्वाच्या द्वारें ही योजना शक्य आहे असाहि तज्ज्ञांचा अनुभव आहे. सबब जडभावांत विशेषेंकरून गुरफटून गेलेल्या आत्मतत्त्वाचा तेथून उद्धार करून, त्यास खेंचून, त्याच्या शुद्ध स्वरूपाकडे परत नेऊन, तेथें त्याचा लय करण्याची प्रक्रिया अगर पद्धतिहि त्यांनीं निश्चित केली आहे. या प्रक्रियेला पातंजलयोग असें म्हणतात. प्रस्तुत अध्यायांत या पातंजलयोगाचें विस्तृत विवेचन आहे व त्याच अनुषंगानें असलेल्या अन्य कांहीं संबद्ध उपप्रश्नांचें उत्तरहि यांत आहे. विशेषतः अन्तकालीं ईश्वरस्मरण घडणें कसें शक्य आहे, या अर्जुनाच्या सात प्रश्नांपैकीं चवथ्या प्रश्नाचें उत्तर या अध्यायांत आहे असें म्हणतां येईल.

॥ श्रीभगवानुवाच ॥

उद्धरेदात्मनात्मानं नात्मानमवसादयेत् ।
आत्मैव ह्यात्मनो बंधुरात्मैव रिपुरात्मनः ॥ ६-५ । २११
बंधुरात्मात्मनस्तस्य येनात्मैवात्मना जितः ।
अनात्मनस्तु शत्रुत्वे वर्तेतात्मैव शत्रुवत् ॥ ६-६ । २१२

श्रीभगवान् पुढें सांगतात–अर्जुना, आत्मा हा जों जों जड घटनांत गुरफटून जाऊं लागतो, तों तों स्वतःचें शत्रुत्व करीत असल्याप्रमाणें स्वतःच्या दुःखास कारणीभूत होतो. उलट जों जों तो आपल्या अव्यक्त रूपाकडे झुकत जातो तों तों मित्रवत् बनून शाश्वत सुखाची वृद्धी करूं शकतो. सबब आत्म्याचा जड घटनेशीं अनुषंग कमी करून त्याचा तेथून उद्धार करून त्याला पुन्हा अव्यक्त स्थितीकडे नेणें हा उत्तम मार्ग होय. या प्रयत्नांत विश्वात्मा हा त्याच्या व्यक्तिगत अखंडांशाशीं मित्रवत् सहकार्य करण्यास तयार असतो. २११–२१२

---

प्रमाणें आतां तिची परागति सुरू झाली असून व्यक्ताकडून अव्यक्ताकडे जाण्याचें सामान्य धोरण सुरू झालें आहे. अर्थातच या वरिष्ठ सत्तेच्या धोरणाला अनुकूल असें आचरण ज्या घटकांच्या द्वारें होईल ते या वरिष्ठ सत्तेशीं मैत्रीच्या सुखाचा व विरुद्धपक्षी प्रतिरोधाच्या–वैराच्या–दुःखाचा अनुभव घेतील यांत नवल काय?

( याप्रमाणें आत्म्याला दुःखरहित करण्याचा प्रयत्न करणाऱ्या योग्यानें काय काय करावें हें मी तुला आतां सांगतों. )

योगी युंजीत सततमात्मानं रहसि स्थितः ।
एकाकी यतचित्तात्मा निराशीरपरिग्रहः ॥ ६-१० । २१३

गुप्त ठिकाणीं रहावें, एकटेंच असावें. आपणास कांहीं मिळावें अशी आशा नसावी. कोणीं दिलें तरी घेऊं नये व मनाचें व जीवात्म्याचें नियमन करीत असावें. २१३

नात्यश्नतस्तु योगोऽस्ति न चैकांतमनश्नतः ।
न चातिस्वप्नशीलस्य जाग्रतो नैव चार्जुन ॥ ६-१६ ।२१४

अतिभक्षण करूं नये व निराहारीहि राहूं नये. फार झोंप नसावी व झोंपेवांचूनहि चालवूं नये. २१४

युक्ताहारविहारस्य युक्तचेष्टस्य कर्मसु ।
युक्तस्वप्नावबोधस्य योगो भवति दुःखहा ॥ ६-१७ । २१५

आहारविहारादिकांत परिमितता राखल्यानें योगसाधन शक्य होतें. २१५

प्रशांतात्मा विगतभीर्ब्रह्मचारिव्रते स्थितः ।
मनः संयम्य मच्चित्तो युक्त आसीत मत्परः ॥ ६-१४ । २१६

चित्त शान्त व निर्भय असावें. ब्रह्मचर्य पालन करावें व ईश्वरचरणीं लक्ष असूं द्यावें. २१६

शुचौ देशे प्रतिष्ठाप्य स्थिरमासनमात्मनः ।
नात्युच्छ्रितं नातिनीचं चैलाजिनकुशोत्तरम् ॥ ६-११ । २१७
तत्रैकाग्रं मनः कृत्वा यतचित्तेंद्रियक्रियः ।
उपविश्यासने युंज्याद्योगमात्मविशुद्धये ॥ ६-१२ । २१८

स्वच्छ ठिकाणीं मध्यम उंचीचें, भक्कम आसन तयार करावें व त्यावर बसून इंद्रियव्यापारांचें नियमन करून एकाग्र चित्तानें योगसाधनाला आरंभ करावा. २१७-२१८

समं कायशिरोग्रीवं धारयन्नचलं स्थिरः ।
संप्रेक्ष्य नासिकाग्रं स्वं दिशश्चानवलोकयन् ।। ६-१३ । २१९

कमर, पाठ, मान व डोकें हीं सर्व ताठ व अगदीं एका लंब रेषेंत असतील अशीं धरून, इकडेतिकडे न बघतां, दृष्टि फक्त नाकाच्या ( दोन्ही भुवयांमधील, कपाळाकडच्या ) अग्रावर स्थिर करावी. २१९

स्पर्शान्कृत्वा बहिर्बाह्यांश्चक्षुश्चैवांतरे भ्रुवोः ।
प्राणापानौ समौ कृत्वा नासाभ्यंतरचारिणौ ।। ५-२७ । २२०
यथा दीपो निवातस्थो नेंगते सोपमा स्मृता ।
योगिनो यतचित्तस्य युंजतो योगमात्मनः ।। ६-१९ । २२१

बाह्यस्पर्शांची बाधा न होण्याइतकें जडत्व ज्ञानेंद्रियांच्या ठिकाणीं आणावें, दृष्टि भुवयांमध्यें वळवावी आणि श्वासोच्छ्वास समकालप्रमाण चालवावा. वारा नसल्या ठिकाणचा दिवा जसा संथ असतो तसा योगी संथ असावा. २२०-२२१

यतो यतो निश्चरति मनश्चंचलमस्थिरम् ।
ततस्ततो नियम्यैतदात्मन्येव वशं नयेत् ।। ६-२६ । २२२
यदा विनियतं चित्तमात्मन्येवावतिष्ठते ।
निस्पृहः सर्वकामेभ्यो युक्त इत्युच्यते तदा ।। ६-१८ । २२३

मन इकडेतिकडे भ्रमण करूं लागेल तर त्याला खेंचून परत वळवावें व तें परमात्म्याच्या ठिकाणीं स्थिर करावें. २२२-२२३

संकल्पप्रभवान्कामांस्त्यक्त्वा सर्वानशेषतः ।
मनसैवेंद्रियग्रामं विनियम्य समंततः ।। ६-२४ । २२४

मनांत कोणत्याहि गोष्टीची इच्छा उद्भवूं देऊं नये. २२४

शनैःशनैरुपरमेद्बुद्ध्या धृतिगृहीतया ।
आत्मसंस्थं मनः कृत्वा न किंचिदपि चिंतयेत् ।। ६-२५ । २२५

इंद्रियांना जडत्व आणावें, व धैर्यानें व प्रक्रियेच्या ज्ञानानें मन हेंहि वें विषयांवरून काढून आत्म्याच्या ठिकाणीं स्थिर करावें. २२५

जितात्मनः प्रशांतस्य परमात्मा समाहितः ।
शीतोष्णसुखदुःखेषु तथा मानापमानयोः ॥ ६-७ । २२६

जो योगी याप्रमाणें आत्म्यापर्यंत जाऊन पोहोंचला व तेथें शान्त झाला तो ब्रह्मपदाला जाऊन पोहोंचलाच. मग त्याला शीतोष्णादि द्वंद्वांची पर्वा कोठची ? २२६

ज्ञानविज्ञानतृप्तात्मा कूटस्थो विजितेंद्रियः ।
युक्त इत्युच्यते योगी समलोष्टाश्मकांचनः ॥ ६-८ । २२७

या मूळ आत्म्यांत जाऊन पोहोंचलेल्या योग्याला सिद्धावस्थेस पोहोंचलेला योगी म्हणतात. २२७

प्रशांतमनसं ह्येनं योगिनं सुखमुत्तमम् ।
उपैति शांतरजसं ब्रह्मभूतमकल्मषम् ॥ ६-२७ । २२८

या प्रकारच्या योग्याला एक उच्च प्रकारचा आनंद प्राप्त होतो. २२८

यत्रोपरमते चित्तं निरुद्धं योगसेवया ।
यत्र चैवात्मनात्मानं पश्यन्नात्मनि तुष्यति ॥ ६-२० । २२९

तेथें तो शोधीत असलेल्या परमात्म्याला स्वतःच्या आत्म्याच्या ठिकाणीच सांपडलेला पाहून फारच आनंदित होतो.[१] २२९

सुखमात्यंतिकं यत्तद्बुद्धिग्राह्यमतींद्रियम् ।
वेत्ति यत्र न चैवायं स्थितश्चलति तत्त्वतः ॥ ६-२१ । २३०

---

१. *Comp.*—" In mystic states we both become one with the Absolute and we become aware of our oneness. "—W. James.

श्रीभगवद्गीतेंतील हें गूढानुभवाचें प्राचीन वर्णन अद्यापहि लागू आहे.

*Comp.*—" This is the everlasting triumphant mystical tradition, hardly altered by differences of clime or creed...... The mystical classics have neither birth nor native land.

—W. James. *Varieties of Religious Experience*
Chap. ' Mysticism ', page 419.

या स्थितींत ज्या आनंदाचा अनुभव येतो, तो इंद्रियसुखाच्या आनंदापेक्षां वेगळा व सामान्य बुद्धीला न समजण्यासारखा अत्यंत उच्च प्रकारचा असतो. २३०

यं लब्ध्वा चापरं लाभं मन्यते नाधिकं ततः ।
यस्मिन्स्थितो न दुःखेन गुरुणापि विचाल्यते ।। ६-२२ । २३१

त्या आनंदापेक्षां जास्त कांहीं त्याला हवेंसेंच वाटत नाहीं व त्या अवस्थेंत इकडे देहाला परमावधीचें दुःख होत असतांहि त्या स्थितीपासून तो ढळत नाहीं. २३१

तं विद्याद्दुःखसंयोगवियोगं योगसंज्ञितम् ।
स निश्चयेन योक्तव्यो योगोऽनिर्विण्णचेतसा ।। ६-२३ । २३२

ही अवस्था पूर्ण दुःखरहित अशी आहे व हिच्या प्राप्तीकरतां महाप्रयत्न करण्यासारखा आहे. २३२

युंजन्नेवं सदात्मानं योगी नियतमानसः ।
शांतिं निर्वाणपरमां मत्संस्थामधिगच्छति ।। ६-१५ । २३३

या प्रकारचें योगाचरण करणारा योगी अत्यंत उच्च प्रकारच्या शान्तीचा व प्रत्यक्ष ब्रह्मप्राप्तीच्या अत्यंत उच्च आनंदाचा अखंड अनुभव घेतो. २३३

युंजन्नेवं सदात्मानं योगी विगतकल्मषः ।
सुखेन ब्रह्मसंस्पर्शमत्यंतं सुखमश्नुते ।। ६-२८ । २३४

अशा प्रकारच्या आनंदाचा अनुभव घेणाऱ्या अगर घेतलेल्या योग्याची अत्यंत आनंदयुक्त मनस्थिति अशी असते कीं,— २३४

सर्वभूतस्थमात्मानं सर्वभूतानि चात्मनि ।
ईक्षते योगयुक्तात्मा सर्वत्र समदर्शनः ।। ६-२९ । २३५

सर्व भूतांच्या ठिकाणीं त्याला तो स्वतःच दिसत असतो व त्याला सर्व भूतें स्वतःमध्यें दिसत असतात. त्याला जें जें दिसतें, तें तें "मी" या रूपांतच दिसतें.[1] २३५

---

१. सर्व विश्व हें मजकरतां अगर "माझें" आहे व सर्व विश्व हें "मीच" आहे या दोन अनुक्रमें वैयष्टिक व सामष्टिक भावनांमधील अंतर लक्षांत ठेवण्यासारखें आहे.

सुहृन्मित्रार्युदासीनमध्यस्थद्वेष्यबंधुषु ।
साधुष्वपि च पापेषु समबुद्धिर्विशिष्यते ॥ ६-९ । २३६

आप्त, मित्र, शत्रु, तटस्थ, सज्जन व दुर्जन वगैरे नाना व्यावहारिक भेद त्याच्या ठिकाणीं उरलेले नसतात. २३६

यो मां पश्यति सर्वत्र सर्वं च मयि पश्यति ।
तस्याहं न प्रणश्यामि स च मे न प्रणश्यति ॥ ६-३० । २३७

जो सर्वत्र ईश्वराला पाहूं शकतो व सर्वांना ईश्वराच्या ठिकाणीं पाहूं शकतो तो ईश्वराइतका अमर अगर ईश्वररूपच होय. २३७

सर्वभूतस्थितं यो मां भजत्येकत्वमास्थितः ।
सर्वथा वर्तमानोपि स योगी मयि वर्तते ॥ ६-३१ । २३८

ज्याला स्वतःसह भूतमात्रामध्यें ईश्वराचा म्हणजे माझाच अनुभव येतो त्यानें कांहींहि केलें तरी त्याचें भूतमात्रांशीं आचरण माझ्या स्वतःच्या आचरणाइतकेंच निष्पाप ठरतें. २३८

आत्मौपम्येन सर्वत्र समं पश्यति योऽर्जुन ।
सुखं वा यदि वा दुःखं स योगी परमो मतः ॥ ६-३२ । २३९

अर्जुना, जो योगी भूतमात्रांच्या दुःखालाच आपलें दुःख मानून तें जणूं काय आपलेंच दुःख निवारण्याच्या उत्कंठेनें निवारूं जातो व जो त्यांना होणाऱ्या सुखाचा अनुभव आपणच घेणार आहोंत या भावनेनें भूतमात्रांना सुखी करूं पाहतो तोच योगी परमोच्च अवस्थेला पोहोंचलेला होय. २३९

॥ अर्जुन उवाच ॥

योऽयं योगस्त्वया प्रोक्तः साम्येन मधुसूदन ।
एतस्याहं न पश्यामि चंचलत्वात्स्थितिं स्थिराम् ॥ ६-३३ । २४०
चंचलं हि मनः कृष्ण प्रमाथि बलवद्दृढम् ।
तस्याहं निग्रहं मन्ये वायोरिव सुदुष्करम् ॥ ६-३४ । २४१

अर्जुन म्हणतो, भगवन्, सर्वांभूतीं सम दृष्टि उत्पन्न करणारा हा आपण सांगितलेला योग फारच कठीण वाटतो. विशेषतः मन फार चंचल असल्यामुळें तो टिकणार नाहीं अशी भीति वाटते. २४०–२४१

॥ श्रीभगवानुवाच ॥

**असंशयं महाबाहो मनो दुर्निग्रहं चलम् ।**
**अभ्यासेन तु कौंतेय वैराग्येण च गृह्यते ॥** ६-३५ । २४२
**असंयतात्मना योगो दुष्प्राप्य इति मे मतिः ।**
**वश्यात्मना तु यतता शक्योऽवाप्तुमुपायतः ॥** ६-३६ । २४३

श्रीभगवान् या अडचणींतून मार्ग दाखविण्याकरतां म्हणतातः—अर्जुना, मन चंचल आहे ही गोष्ट खरी; परंतु इंद्रियविषयांबद्दल वैराग्य जर उत्पन्न झालें असेल आणि सतताभ्यास करण्याची तयारी असेल तर मात्र मनोजय सुलभ, निदान शक्य आहे यांत शंका नाहीं. २४२–२४३

**यत्र काले त्वनावृत्तिमावृत्तिं चैव योगिनः ।**
**प्रयाता यांति तं कालं वक्ष्यामि भरतर्षभ ॥** ८-२३ । २४४

यानंतर, अर्जुना, या योगाचा अभ्यास करीत असतांना, योग पूर्ण होण्यापूर्वी मृत्यु आला असतां ज्या दोन मार्गांनीं योग्याचा जडदेह इहपरलोकभ्रमण करीत असल्याच्या कल्पना आहेत ते मार्ग तुला सांगतों. २४४

**अग्निर्ज्योतिरहः शुक्लः षण्मासा उत्तरायणम् ।**
**तत्र प्रयाता गच्छंति ब्रह्म ब्रह्मविदो जनाः ॥** ८-२४ । २४५

उत्तरायणाच्या षण्मासांत, त्यांतल्यात्यांत शुक्लपक्षीं मृत्यु येऊन धडधडलेल्या ज्वालायुक्त अग्नीशीं जर योग्याच्या देहाचा संयोग होईल तर त्या विशिष्ट अनुकूल परिस्थितींत पूर्ण ज्वलनामुळें त्याच्या देहाचें जें सूक्ष्म—हलकें—रूपांतर होतें तें थेट सूर्यमंडळापलीकडे जाऊन ब्रह्मरूपांत मिळून जातें. २४५

**धूमो रात्रिस्तथा कृष्णः षण्मासा दक्षिणायनम् ।**
**तत्र चांद्रमसं ज्योतिर्योगी प्राप्य निवर्तते ॥** ८-२५ । २४६

उलटपक्षीं दक्षिणायनाच्या शीत कालांत, त्यांतहि अंधाऱ्या कृष्णपक्षीं मृत्यु येऊन, मंदमंद जळत असलेल्या धूम्रयुक्त अग्नीशीं जर योग्याच्या मृत देहाचा संयोग घडेल तर अपूर्ण ज्वलनाच्या कारणामुळें त्या देहाचें धूम्रांतच रूपांतर होतें व हें जात्याच जड असल्यामुळें फारतर चंद्रलोकापर्यंत अगर

चंद्राच्या कक्षेच्या मर्यादेपर्यंत जाऊन पोहोंचतें व त्यानंतर अर्थातच तें स्वतःच्या अंगच्या जडपणामुळें कालांतरानें हळुहळू पृथ्वीवर येऊन स्थिरावतें.[1] २४६

शुक्लकृष्णे गती ह्येते जगतः शाश्वते मते ।
एकया यात्यनावृत्तिमन्यया वर्तते पुनः ॥ ८-२६ । २४७
नैते सृती पार्थ जानन्योगी मुह्यति कश्चन ।
तस्मात्सर्वेषु कालेषु योगयुक्तो भवार्जुन ॥ ८-२७ । २४८

या मार्गांना शुक्लमार्ग अगर अर्चिरादिमार्ग व कृष्णमार्ग अगर धूमादि मार्ग अशीं नांवें आहेत. मात्र या मार्गांचा केवळ जडदेहाशीं संबंध आहे हें कळल्यानंतर देहपात कोणत्या काळीं होणार याबद्दल फिकीर करण्याचें योग्यास कारण उरत नाहीं. फक्त आत्मदृष्ट्या सिद्धि प्राप्त करून घेऊन सतत त्या अवस्थेंत असलें म्हणजे झालें. २४७-२४८

॥ अर्जुन उवाच ॥

अयतिः श्रद्धयोपेतो योगाच्चलितमानसः ।
अप्राप्य योगसंसिद्धिं कां गतिं कृष्ण गच्छति ॥ ६-३७ । २४९
कच्चिन्नोभयविभ्रष्टश्छिन्नाभ्रमिव नश्यति ।
अप्रतिष्ठो महाबाहो विमूढो ब्रह्मणः पथि ॥ ६-३८ । २५०
एतन्मे संशयं कृष्ण छेत्तुमर्हस्यशेषतः ।
त्वदन्यः संशयस्यास्य छेत्ता नह्युपपद्यते ॥ ६-३९ । २५१

याबर अर्जुन विचारतो, एखादा योगी श्रद्धावान् असून इंद्रियदमन मात्र

---

१. या दोन श्लोकांचा अर्थ लावणें ही गीतेच्या टीकाकारांना मोठी अडचणीची बाब होऊन बसली आहे. ब्रह्मप्राप्ति होण्याकरतां ज्ञानप्राप्ति महत्त्वाची कीं, विशिष्ट कालीं मरण महत्त्वाचें हा तर याबाबतचा एक मूळचा प्रश्न होय. परंतु, अयन, प्रकाश, अग्नीची धूममय अगर ज्वालामय अवस्था, यांचा संबंध योग्याच्या मृतदेहाशीं जितका लागतो, तितका त्याच्या ज्ञानसंपन्न आत्मस्थितीशीं लागत नाहीं, सबब वरील अर्थच युक्त होय, असें आग्रहानें म्हणावयास हरकत नाहीं.

पूर्ण करूं न शकल्यामुळें योगभ्रष्ट होईल तर त्याचें भवितव्य काय होतें तें मला सांगा. २४९–२५१

॥ श्रीभगवानुवाच ॥

पार्थ नैवेह नामुत्र विनाशस्तस्य विद्यते ।
न हि कल्याणकृत्कश्चिद्दुर्गतिं तात गच्छति ॥ ६-४० । २५२

श्रीभगवान् या प्रश्नाचें उत्तर देतातः--अर्जुना, अशा योग अपूर्ण राहिलेल्या योग्याचें इहपरलोकीं नुकसान कसलेंच होणें शक्य नाहीं. कारण, चांगल्या कर्माची परिणति वाईट फलांत कधींच होत नाहीं-- २५२

प्राप्य पुण्यकृतांल्लोकानुषित्वा शाश्वतीः समाः ।
शुचीनां श्रीमतां गेहे योगभ्रष्टोऽभिजायते ॥ ६-४१ । २५३
अथवा योगिनामेव कुले भवति धीमताम् ।
एतद्धि दुर्लभतरं लोके जन्म यदीदृशम् ॥ ६-४२ । २५४

तर तो पुण्यकर्मे करणारे लोक ज्या स्थानीं मृत्यूनंतर जातात, तेथें जाऊन राहून नंतर त्याचा शुचिर्भूत पवित्र कुलांत पुनर्जन्म होतो.[1] २५३–२५४

---

१. या ठिकाणीं विशिष्ट व्यक्तीच्या ठिकाणीं बनून राहिलेल्या अध्यात्मिक मूल्याचा ऱ्हास न होण्याकरितां व त्याला पूर्णता प्राप्त होण्याकरितां पुनर्जन्माची इयत्ता व त्याचबरोबर शक्यता प्रतिपादिलेली आहे. व्यक्तिबद्ध विचारदृष्ट्या ही विचारसरणी अर्थात् मान्य करावी लागते. परंतु वैयक्तिक पूर्णत्व ही एक तर स्वार्थाची परमावधि होय व दुसरें म्हणजे व्यक्तीच्या पृथक्त्वाची ग्राह्य मानलेली समजूत हीच मुळांत भ्रामक होय. 'वैयक्तिकपूर्णत्व' या शब्दसमुच्चयाला तत्त्वशास्त्रांत कांहीं अर्थ असेल असें वाटत नाहीं. ही गोष्ट पटण्यास 'वैयक्तिक सार्वभौमत्व' या शब्दसमुच्चयाचा अर्थ करून पहावा.

शिवाय पूर्वजन्मसंस्कारप्राप्तीचा येथें जो निर्देश केला आहे, त्याची प्रक्रिया सांप्रतच्या अनुहरणशास्त्रा (Science of Heredity) नें इतकी निश्चयरूप, सोपपत्तिक आणि सप्रयोग उदाहरणांनीं सिद्ध केली आहे कीं, ती लक्षांत घेणेंच जरूर आहे. एवंच, श्रीभगवान् येथें अप्रस्तुत विषयाच्या मागें फारसें न लागतां केवळ त्याबाबत आहे त्या प्रचालित मताचा निर्देश करून ही अर्जुनाची उपजिज्ञासा तृप्त करितात एवढेंच.

तत्र तं बुद्धिसंयोगं लभते पौर्वदेहिकम् ।
यतते च ततो भूयः संसिद्धौ कुरुनंदन ॥ ६-४३ । २५५

त्या जन्मांत त्याला पूर्वजन्मींच्या सुसंस्कृत बनलेल्या बुद्धीची जोड मिळते. ही पूर्वतयारी हस्तगत झाल्यानंतर पुढं जाण्याला त्याला या जन्मीं जरूर तो अवसर मिळाल्यामुळें सिद्धीकरितां त्याचे प्रयत्न पुढें चालू राहतात. २५५

पूर्वाभ्यासेन तेनैव ह्रियते ह्यवशोऽपि सः ।
जिज्ञासुरपि योगस्य शब्दब्रह्मातिवर्तते ॥ ६-४४ । २५६

पूर्वजन्मीं त्याच्या अंगवळणीं पडलेल्या दिशेनेंच त्याचें या जन्मींचें वर्तन त्याला न कळतच, त्याची या जन्मीं प्रथम इच्छा नसली तरी, होतें. अशा रीतीनें " योग म्हणजे काय तें पाहूं तर खरें! " अशी नुसती जिज्ञासा उत्पन्न झाली तरी देखील तिची परिणति वेदोक्तकर्मानुष्ठान करण्याच्या फलापेक्षांहि जास्त किंमतीची होते. २५६

प्रयत्नाद्यतमानस्तु योगी संशुद्धकिल्बिषः ।
अनेकजन्मसंसिद्धस्ततो याति परां गतिम् ॥ ६-४५ । २५७

अभ्यासयोगयुक्तेन चेतसा नान्यगामिना ।
परमं पुरुषं दिव्यं याति पार्थानुचिंतयन् ॥ ८-८ । २५८

अशा रीतीनें चिकाटीनें प्रयत्न करणारा योगी एका जन्मीं मोक्षाला न गेला तरी एकापेक्षां जास्त जन्मांनंतर, पण अखेर मोक्षाला गेल्याशिवाय राहत नाहीं. २५७–२५८

अनन्यचेताः सततं यो मां स्मरति नित्यशः ।
तस्याहं सुलभः पार्थ नित्ययुक्तस्य योगिनः ॥ ८-१४ । २५९

अर्जुना, जो अनन्य चित्तानें माझें नेहमीं स्मरण करतो त्याला मी सहज प्राप्त होतों.

मामुपेत्य पुनर्जन्म दुःखालयमशाश्वतम् ।
नाप्नुवंति महात्मानः संसिद्धिं परमां गताः ॥ ८-१५ । २६०

आब्रह्मभुवनाल्लोकाः पुनरावर्तिनोऽर्जुन ।
मामुपेत्य तु कौंतेय पुनर्जन्म न विद्यते ॥ ८-१६ । २६१

मला येऊन मिळाल्यानंतर पुनर्जन्मादि दुःखाची बाधा होत नाहीं. २६०–२६१

( यानंतर अर्जुना, तुला मी योग्यानें ज्या प्रक्रियेनें देहत्याग करावा ती प्रक्रिया सांगतों. )

सर्वद्वाराणि संयम्य मनो हृदि निरुध्य च ।
मूर्ध्न्याधायात्मनः प्राणमास्थितो योगधारणाम् ॥ ८-१२ । २६२
ओमित्येकाक्षरं ब्रह्म व्याहरन्मामनुस्मरन् ।
यः प्रयाति त्यजन्देहं स याति परमां गतिम् ॥ ८-१३ । २६३

सर्वेंद्रियद्वारें मनानें बंद करावींत, मनाचा अन्तःकरणांत लय करावा. जीवनशक्ति शरीरांतून खेंचून–म्हणजे सर्व शरीर निश्चेष्ट करून–ती ज्ञानेंद्रियाचें नियमनस्थान जो मेंदू तेथें स्थिर करावी. तोंडानें ॐ या प्रणवाक्षराचा जप करीत असावें व शेवटीं या मेंदूची क्रियाहि स्वबलानें बंद पाडावी, म्हणजे त्यायोगानें देहपात झाला असतां ज्ञानयुक्त अवस्थेंत मरण आलें असें होतें. याप्रमाणें देहत्याग करणाऱ्याला उत्तमपदप्राप्ति होते. २६२–२६३

कविं पुराणमनुशासितारमणोरणीयांसमनुस्मरेद्यः ।
सर्वस्य धातारमचिंत्यरूपमादित्यवर्णं तमसः परस्तात् ॥
८-९ । २६४
प्रयाणकाले मनसाऽचलेन भक्त्या युक्तो योगबलेन चैव ।
भ्रुवोर्मध्ये प्राणमावेश्य सम्यक् स तं परं पुरुषमुपैति दिव्यम् ॥
८-१० । २६५

जो मनुष्य अन्तकालीं भक्तियुक्त अन्तःकरणानें व योगबलानें सर्वज्ञ, सनातन, सर्वशक्तिमान, सर्वव्यापि, सर्वाधार, अत्यंत सुस्वरूप व सूर्याप्रमाणें दैदीप्यमान अशा ईश्वराचें स्मरण करूं शकेल तो त्याच ईश्वरामध्यें मिळून जाऊन तद्रूप होतो. २६४–२६५

वेदेषु यज्ञेषु तपःषु चैव दानेषु यत्पुण्यफलं प्रदिष्टम् ।
अत्येति तत्सर्वमिदं विदित्वा योगी परं स्थानमुपैति चाद्यम् ॥
८-२८ । २६६

वेदाध्ययन, यज्ञकर्म, तपश्चर्या, दान, इत्यादिकांनीं जें फल प्राप्त होतें असें सांगितलें आहे, त्याहिपेक्षां उच्चतर फल उपरिनिर्दिष्ट प्रक्रियेच्या ज्ञानानें व (त्यानंतर अर्थात्) त्या प्रक्रियेच्या अनुसरणानें योग्याला प्राप्त होतें व तो विश्वारंभशक्ति जें ब्रह्म त्या शक्तींत मिळून जातो. २६६

हरिः ॐ तत्सत्

इति रचनान्तरितश्रीमद्भगवद्गीतासूपनिषत्सु० आत्मसंयमयोगो नाम षष्ठोऽध्यायः ॥ ६ ॥

---

## सप्तमाध्याय

# राजविद्याराजगुह्ययोग

तृतीयाध्यायांतील अक्षरब्रह्माच्या अंगीं गुणभोक्तृत्व म्हणजे गुणधारणक्षमता व प्रभविष्णुत्व म्हणजे विश्वोद्भव करण्याची शक्ति हे गुण असल्याचें सांगितलें आहे. या गुणांना अनुसरून हें ब्रह्म अक्षरावस्थेंतून क्षरावस्थेंत आविर्भूत होण्याच्या क्रमांत तें ज्या पहिल्या हिरण्यगर्भ नामक अवस्थेंत असतें त्या अवस्थेला विराटपुरुष अगर ईश्वर हें नांव येथें दिलें असून त्या अवस्थेचें वर्णन या अध्यायांत आलेलें आहे.

मात्र या ठिकाणीं हें लक्षांत ठेवणें जरूर आहे. परब्रह्म, ब्रह्म, महद्ब्रह्म, परमात्मा, आत्मा, जीव, परमेश्वर, ईश्वर इत्यादि भाव अगदीं सांख्याच्या प्रकृतिपुरुष द्वंद्वाप्रमाणें* 'अगदीं एक आहे तर दुसरें नाहीं' इतक्या परस्परविरोधी लक्षणांनीं युक्त आहेत असें मानणें चुकीचें होईल. वेदान्त्यांचें ब्रह्म ही एक अखंड घटना आहे व तिच्या नाना आविर्भावांना अखंडाचे खंड म्हणणेंच

* 'विपरीतः' ही या बाबतची सांख्यसंज्ञा होय.

शोभेल. प्रत्येक आविर्भावाचा लक्षणविशेष दाखवितांच येईल असें नाहीं. उदाहरणार्थ, वृक्षाचें खोड व फांद्या या संज्ञा व्यवहारदृष्ट्या इष्ट व सत्य आहेत, पण तत्त्वतः त्या सर्वांचा मिळून एकच वृक्ष होतो; त्याचप्रमाणें विवेचनाच्या सोयीसाठीं ही हिरण्यगर्भावस्था ब्रह्मशक्तीपासून पृथक् मानणें इष्ट असलें तरी त्या अवस्थेच्या वर्णनांत कांहीं लक्षणें ब्रह्मशक्तीचीं तर कांहीं जीवाचीं तर कांहीं जडाचीं समाविष्ट होणें तर्कास व युक्तीस सोडून नाहीं.

या अध्यायांतील बहुतेक विवरण श्रीभगवान् स्वतःचें ईश्वरीभावाशीं ऐक्य पुरकृत करून प्रथमपुरुषीं म्हणजे 'मी' 'मला' 'मजपासून' 'माझें' इ० भाषेंत करीत आहेत आणि हीच गोष्ट येथून पुढच्या अध्यायांतून विशेष प्रामुख्यानें नजरेस येणार आहे.

---

॥ श्रीभगवानुवाच ॥

इदं तु ते गुह्यतमं प्रवक्ष्याम्यनसूयवे ॥
अधिदैवात्मकं ज्ञानं[1] यज्ज्ञात्वा मोक्ष्यसे शुभात् ॥ ९-१ । २६७

श्रीभगवान् पुढें सांगतात—अर्जुना, तुला मी या अध्यायांत तुझ्या "अधिदैव म्हणजे काय ?" या प्रश्नाचें उत्तर सांगतों. २६७

राजविद्या राजगुह्यं पवित्रमिदमुत्तमम् ।
प्रत्यक्षावगमं धर्म्यं सुसुखं कर्तुमव्ययम् ॥ ९-२ । २६८

---

१. "ज्ञानं विज्ञानसहितं" या मूळच्या पदसमुच्चयाच्या ऐवजीं "अधिदैवात्मकं ज्ञानं" हा नवीन पदसमुच्चय येथें घालण्याची परवानगी प्रस्तुत लेखक अगदीं अगतिक होऊन घेत आहे. कारण मात्र, थोडक्यांत, असें आहे कीं, मूळ ग्रंथांतील सातव्या अध्यायाचा दुसरा व नवव्या अध्यायाचा पहिला हे दोन्ही श्लोक एकाच अर्थाचे व जवळजवळ एकाच पदरचनेचे असून पुन्हां दोहोंचा हेतुहि विषयप्रस्तावना हा आहे. परंतु दोन्ही अध्यायांत एकाच विषयाचें विवरण आहे असें मानण्यांत अगर तें तसें असूं देण्यांत स्वारस्य वाटत नाहीं. सबब या सातव्या अध्यायांत अधिदैवात्मक विवरण विषयानुक्रमानुरूप घेतलें आहे व त्या विषयाची प्रस्तावना करण्याकरतां जरूर तेवढें पदसमुच्चयांतर केलेलें आहे.

हें ज्ञान फार श्रेष्ठ प्रकारचें व फार काळजीनें, जपून, संग्रहीं ठेवण्यासारखें आहे व हें व्यावहारिक आचारधर्मांस आधारभूत होण्याइतक्या किंमतीचेंहि आहे. २६८

पिताहमस्य जगतो माता धाता पितामहः ।
वेद्यं पवित्रमोंकार ऋक साम यजुरेव च ॥ ९-१७ । २६९

मी या जगाचा उत्पन्नकर्ताच काय, पण या जगाच्या उत्पन्नकर्त्याचाहि उत्पन्नकर्ता आहें. २६९

गतिर्भर्ता प्रभुः साक्षी निवासः शरणं सुहृत् ।
प्रभवः प्रलयः स्थानं निधानं बीजमव्ययम् ॥ ९-१८ । २७०

त्याचप्रमाणें सर्वांचा पोषणकर्ता, साहाय्यकर्ता, आश्रयदाता, रक्षणकर्ता व अखेरचा आधारहि मीच आहें. २७०

तपाम्यहमहं वर्षं निगृण्हाम्युत्सृजामि च ।
अमृतं चैव मृत्युश्च सदसच्चाहमर्जुन ॥ ९-१९ । २७१

प्रकाश व पर्जन्य यांचें नियमनहि मी करतों. चांगलें, वाईट, मृत्यु, अमृतत्व इत्यादि परस्परविरोधी भाव हंदेखील माझींच रूपें होत. २७१

मया ततमिदं सर्वं जगदव्यक्तमूर्तिना ।
मत्स्थानि सर्वभूतानि न चाहं तेष्ववस्थितः ॥ ९-४ । २७२

मी माझ्या अव्यक्तावस्थेमधूनच हें सर्व विश्व निर्माण केलें आहे आणि सर्व भूतें माझ्या आंत आहेत; म्हणजे मीं त्यांना व्यापून टाकिलें आहे. खारकेंत जशी बी असते, त्याप्रमाणें मी फक्त भूतांच्या आंत असतों, अशी जी समजूत आहे ती चुकीची आहे. २७२

न च मत्स्थानि भूतानि पश्य मे योगमैश्वरम् ।
भूतभृन्न च भूतस्थो ममात्मा भूतभावनः ॥ ९ ५ । २७३

त्याचप्रमाणें भूतेंहि डाळिंबांत दाणे असतात त्याप्रमाणें माझ्या आंत आहेत असेंहि नव्हे; आणि हाच तर माझा विशेष प्रभाव आहे. ज्याप्रमाणें पाण्यांतील स्पंजाला पाणी आंतूनबाहेरूनहि व्यापून टाकतें त्याप्रमाणेंच मी या भूतांना अन्तर्बाह्य व्यापून टाकणारा आहें. २७३

**यथाकाशस्थितो नित्यं वायुः सर्वत्रगो महान् ।**
**तथा सर्वाणि भूतानि मत्स्थानीत्युपधारय ॥ ९-६ । २७४**

या माझ्या अन्तर्बाह्यव्यापकत्वाचें उत्तम उदाहरण म्हणजे वायूला देखील आंतूनबाहेरून व्यापून टाकणाऱ्या आकाशाचें होय. आकाशामध्यें जसा त्यानें अन्तर्बाह्य व्याप्त वायु तशींच माझ्या ठिकाणीं भूतें समज. २७४

**अश्रद्दधानाः पुरुषा धर्मस्यास्य परंतप ।**
**अप्राप्य मां निवर्तंते मृत्युसंसारवर्त्मनि ॥ ९-३ । २७५**

ईश्वराच्या अंगच्या या अन्तर्बाह्यव्यापनधर्मावर ज्यांचा विश्वास बसत नाहीं त्यांना सम्यग्ज्ञान होण्याची व त्यांची संस्कृतिचक्रांतून सुटका होण्याची मात्र आशा नको. २७५

**न मां दुष्कृतिनो मूढाः प्रपद्यंते नराधमाः ।**
**माययापहृतज्ञाना आसुरं भावमाश्रिताः ॥ ७-१५ । २७६**
**अवजानंति मां मूढा मानुषीं तनुमाश्रितम् ।**
**परं भावमजानंतो मम भूतमहेश्वरम् ॥ ९-११ । २७७**
**मोघाशा मोघकर्माणो मोघज्ञाना विचेतसः ।**
**राक्षसीमासुरीं चैव प्रकृतिं मोहिनीं श्रिताः ॥ ९-१२ । २७८**

दुराचारी, राक्षसी वृत्तीचे, अज्ञ, मायामोहित जन हे माझ्याबद्दल विचार करीत नाहींत व मनुष्याकाराच्या माझ्या मूर्ती पाहून व मनुष्याच्या आचरणांसारखीं माझीं चरित्रें ऐकून अर्धशिक्षित लोक माझी उपेक्षा करितात. माझें उच्च स्वरूप जाणावयाचें त्यांना जमत नाहीं. अशा लोकांच्या आकांक्षा, ज्ञान व कर्म वगैरे फुकट फुसकें होय. २७६-२७८

**महात्मानस्तु मां पार्थ दैवीं प्रकृतिमाश्रिताः ।**
**भजंत्यनन्यमनसो ज्ञात्वा भूतादिमव्ययम् ॥ ९-१३ । २७९**

परंतु दैवी प्रकृतीनें युक्त असून ज्यांची धारणाशक्ति मोठी आहे ते, मी अव्यय व तथापिहि त्यांच्यासह सर्व भूतांचा उत्पन्नकर्ता हें ओळखतात व त्यांचा व माझा हा संबंध ओळखून अनन्य भावानें मला भजतात. २७९

सततं कीर्तयंतो मा यतंतश्च दृढव्रताः ।
नमस्यंतश्च मां भक्त्या नित्ययुक्ता उपासते ॥ ९-१४ । २८०
ज्ञानयज्ञेन चाप्यन्ये यजंतो मामुपासते ।
एकत्वेन पृथक्त्वेन बहुधा विश्वतोमुखम् ॥ ९-१५ । २८१

ते माझें नेहमीं गुणसंकीर्तन करतात व माझ्या प्राप्तीकरितां कठिण अशीं व्रतेंहि करीत असतात; आणि त्यांपैकीं कोणी आपआपल्या ज्ञानाप्रमाणें सर्व-व्यापी असलेल्या मला एक अगर अनेकहि मानून माझी उपासना करीत असतात. २८०–२८१

त्रैविद्या मां सोमपाः पूतपापा यज्ञैरिष्ट्वा स्वर्गतिं प्रार्थयंते ।
ते पुण्यमासाद्य सुरेंद्रलोकमश्नंति दिव्यान् दिवि देवभोगान् ॥
९-२० । २८२

ते तं भुक्त्वा स्वर्गलोकं विशालं क्षीणे पुण्ये मर्त्यलोकं विशंति ।
एवं त्रयीधर्ममनुप्रपन्ना गतागतं कामकामा लभंते ॥ ९-२१ । २८३

यांपैकीं वेदवेत्ते जे असतात ते स्वर्गप्राप्तीच्या इच्छेनें यज्ञद्वारां माझी पूजा करतात व त्या पुण्याच्या बलानें स्वर्गसुख भोगतातहि. मात्र पुण्यसंचय संपला कीं, त्यांना पुन्हां मृत्युलोकीं यावें लागतें व त्यांच्या मागच्या या येरझारा सुटत नाहींत. २८२–२८३

कामैस्तैस्तैर्हृतज्ञानाः प्रपद्यंतेऽन्यदेवताः ।
तं तं नियममास्थाय प्रकृत्या नियताः स्वया ॥ ७-२० । २८४

याप्रमाणें स्वतःच्या आवडीप्रमाणें निरनिराळे भोग प्राप्त करून घेण्या-करितां पुष्कळ लोक निरनिराळ्या देवतांच्या भजनीं लागतात. २८४

यो यो यां यां तनुं भक्तः श्रद्धयार्चितुमिच्छति ।
तस्य तस्याचलां श्रद्धां तामेव विदधाम्यहम् ॥ ७-२१ । २८५

मीहि जो ज्या देवतेची आराधना करूं इच्छीत असेल त्या देवतेच्या ठिकाणीं त्याची श्रद्धा दृढ होईलसें करतों. कारण त्या देवतेमध्यें व मजमध्यें फरक फक्त नांवाचा आहे. २८५

स तया श्रद्धया युक्तस्तस्याराधनमीहते ।
लभते च ततः कामान्मयैव विहितान्हि तान् ॥ ७-२२ । २८६
अंतवत्तु फलं तेषां तद्भवत्यल्पमेधसाम् ।
देवान्देवयजो यांति मद्भक्ता यांति मामपि ॥ ७-२३ । २८७

या प्रकारची आराधनाहि फलद्रूप होत नाहीं असें नाहीं. परंतु हीं फलें अल्पकाल टिकणारीं असतात. उलट माझ्या प्राप्तीकारितांच जे माझी आराधना करतात त्यांना माझी प्राप्ति हें टिकाऊ फळ मिळतें. २८६—२८७

यांति देवव्रता देवान् पितॄन्यांति पितृव्रताः ।
भूतानि यांति भूतेज्या यांति मद्याजिनोपि माम् ॥ ९-२५ । २८८

जे ज्या देवतेची आराधना करतात ते त्या देवतेच्या स्थानाप्रत जातात. २८८

येऽप्यन्यदेवताभक्ता यजंते श्रद्धयान्विताः ।
तेऽपि मामेव कौंतेय यजंत्यविधिपूर्वकम् ॥ ९-२३ । २८९

तथापि ते श्रद्धापूर्वक आराधना करणारे असतील तर त्यांच्या आराधनेंत थोडासा आडवळणीपणा असला तरी अखेरीस ती त्यांची आराधना मजकडेच रुजू होते. २८९

अहं हि सर्वयज्ञानां भोक्ता च प्रभुरेव च ।
न तु मामभिजानंति तत्त्वेनातश्च्यवंति ते ॥ ९-२४ । २९०

मीच सर्व यज्ञांचा भोक्ता आहें. परंतु माझें तत्त्वतः ज्ञान नाहीं, म्हणून नाना देवतांना भजणारे लोक आपआपल्या आवडत्या देवतेचें पृथक पृथक् यजन करतात. २९०

अहं क्रतुरहं यज्ञः स्वधाहमहमौषधम् ।
मन्त्रोऽहमहमेवाज्यमहमग्निरहं हुतम् ॥ ९-१६ । २९१

खरोखर पाहतां, श्रौतस्मार्तपितृयज्ञादि सर्व प्रकारचे यज्ञ, त्या यज्ञांत उपयोग करावयाचें अन्न, तूप, आहुति, व ज्या अग्नीमध्यें त्या अर्पण करावयाच्या तो अग्नि हें सर्व मीच होय. २९१

पत्रं पुष्पं फलं तोयं यो मे भक्त्या प्रयच्छति ।
तदहं भक्त्युपहृतमश्नामि प्रयतात्मनः ॥ ९-२६ । २९२

भक्तीनें मला पान, फळ, निदान थोडें पाणीदेखील कोणीं अर्पण केलें तरी तें मी मोठ्या आवडीनें स्वीकारतों. २९२

अनन्याश्चिंतयंतो मां ये जनाः पर्युपासते ।
तेषां नित्याभियुक्तानां योगक्षेमं वहाम्यहम् ॥ ९-२२ । २९३

आणि केवळ माझीच भक्ति करणारा जो कोणी असेल त्याचा संपूर्ण प्रापंचिक भार तर मी स्वतःच वाहतों. २९३

समोऽहं सर्वभूतेषु न मे द्वेष्योऽस्ति न प्रियः ।
ये भजंति तु मां भक्त्या मयि ते तेषु चाप्यहम् ॥ ९-२९ । २९४

अर्जुना ! मी सर्वांना सारखाच लेखतों. तथापि, त्यांतल्यात्यांत, जे माझी भक्ति करतात त्यांच्याशीं तर मी विशेषपणेंच समरस होतों. २९४

अपि चेत्सुदुराचारो भजते मामनन्यभाक् ।
साधुरेव स मंतव्यः सम्यग्व्यवसितो हि सः ॥ ९-३० । २९५

अगदीं दुराचरणी मनुष्य देखील जर माझी भक्ति करूं लागले तर तोहि एक प्रकारें संभाव्यसाधुच समजावयाचा. कारण त्यानें योग्य मार्ग स्वीकारला आहे. २९५

क्षिप्रं भवति धर्मात्मा शश्वच्छांतिं निगच्छति ।
कौंतेय प्रतिजानीहि न मे भक्तः प्रणश्यति ॥ ९-३१ । २९६

तो त्यानंतर लवकरच सच्छील बनतो. कारण, अर्जुना, माझ्या भक्ताचें कधींहि वांकडें होणार नाहीं अशी माझी प्रतिज्ञा आहे. २९६

बहूनां जन्मनामंते ज्ञानवान्मां प्रपद्यते ।
वासुदेवः सर्वमिति स महात्मा सुदुर्लभः ॥ ७-१९ । २९७

फार तर, मोक्ष मिळण्यापूर्वीं त्याचे कांहीं जन्मच्या जन्म जातील. परंतु, सर्व विश्व ईश्वरमय आहे हें ओळखून माझी भक्ति करीत करीत ज्यानें अनेक जन्ममरणांचे फेरे आनंदानें घेतले तो महात्मा खराच विरळा. २९७

मनुष्याणां सहस्रेषु कश्चिद्यतति सिद्धये ।
यततामपि सिद्धानां कश्चिन्मां वेत्ति तत्त्वतः ॥ ७-३ । २९८

हजारों मनुष्यांपैकीं एखादाच मोक्षाकरतां यत्न करणारा असतो आणि अशा यत्न करणाऱ्या हजारांपैकीं एखादाच मला ओळखूं शकतो. २९८

चतुर्विधा भजंते मां जनाः सुकृतिनोऽर्जुन ।
आर्तो जिज्ञासुरर्थार्थी ज्ञानी च भरतर्षभ ॥ ७-१६ । २९९

माझी भक्ति करणारे चार प्रकारचे असतात. कोणी दुःखनाशाकरतां, तर कोणी द्रव्यप्राप्तीकरतां, कोणी केवळ बौद्धिक समाधानाकरतां, तर कोणी ज्ञानवान् बनल्यानंतरहि माझ्या भक्तीचें रहस्य अगर गोडी जाणून त्या आनंदाच्या सतत अनुभवाकरतां माझी भक्ति करितात. २९९

तेषां ज्ञानी नित्ययुक्त एकभक्तिर्विशिष्यते ।
प्रियो हि ज्ञानिनोऽत्यर्थमहं स च मम प्रियः ॥ ७-१७ । ३००

या चार प्रकारांच्या भक्तांपैकीं ज्ञानी असून जो भक्त असेल त्याला मी व मलाहि पण तो फार आवडतो. ३००

उदाराः सर्व एवैते ज्ञानी त्वात्मैव मे मतम् ।
आस्थितः स हि युक्तात्मा मामेवानुत्तमां गतिम् ॥ ७-१८ । ३०१

हे सर्व भक्त मनाचे थोर तर खरेच, परंतु ज्ञानी भक्त हा मला प्राणापेक्षां प्यारा वाटतो. कारण तो सर्वांत उत्तम गति जी मी त्या माझ्याशीं ऐक्याचा अनुभव नेहमींच घेत असतो. ३०१

मां हि पार्थ व्यपाश्रित्य येऽपि स्युः पापयोनयः ।
स्त्रियो वैश्यास्तथा शूद्रास्तेऽपि यांति परां गतिम् ॥ ९-३२ । ३०२

तथापि, अर्जुना, कुटुंबधारणेस अत्यंत उपयुक्त अशा गृहकार्यव्यापृतेमुळें ज्या स्त्रियांना, त्याचप्रमाणें समाजधारणेस अत्यंत उपयुक्त अशा वैश्यवृत्ति व सेवावृत्ति यांच्या कारणांमुळें ज्या वैश्यादि समाजघटकांना, शिक्षण, गुरुसेवा, ज्ञान, इत्यादि माझ्या प्राप्तीचीं साधनें लाभणें सहसा शक्य नाहीं, असा हा समाजाचा भाग जरी भक्तिमार्गानें माझा आश्रय करील तरी देखील तो माझ्या उत्तम पदाला म्हणजे मोक्षाला जाईल. ३०२

किं पुनर्ब्राह्मणाः पुण्या भक्ता राजर्षयस्तथा ।
अनित्यमसुखं लोकमिमं प्राप्य भजस्व माम् ॥ ९-३३ । ३०३
मन्मना भव मद्भक्तो मद्याजी मां नमस्कुरु ।
मामेवैष्यसि युक्त्वैवमात्मानं मत्परायणः ॥ ९-३४ । ३०४

मग, ज्ञानार्जनाकरतां स्वतःला आजन्म वाहून घेणारे, तसेंच परदुःखहरणाकरतां स्वतःचा जीव धोक्यांत घालणारे जर सतत माझी भक्ति करतील तर मुक्त होतील यांत नवल काय? अर्जुना, तू या अशाश्वत व दुःखमय जगांत आहेस हें लक्षांत ठेव व यामध्यें तुला सुखाची जीवयात्रा हवी असेल तर माझी भक्ति कर व माझ्याच भजनपूजनचिंतनाकडे तुझें लक्ष असूं दे. म्हणजे तूं मलाच येऊन मिळशील. ३०३–३०४

हरिः ॐ तत्सत्

इति रचनान्तरितश्रीमद्भगवद्गीतासूपनिषत्सु० राजविद्याराजगुह्ययोगो नाम सप्तमोध्यायः ॥ ७ ॥

---

## अष्टमाध्याय

# विभूतियोग

पूर्वाध्यायांत अर्जुनाच्या "आधिदैव म्हणजे काय" या प्रश्नाचें उत्तर श्रीभगवानानीं दिलें. आतां या अध्यायांत त्याच उत्तराचा कांहींसा विकास केला असून अर्जुनाच्या एका प्रश्नास उत्तर म्हणून विश्वांतील स्थावरजंगमादि नाना घटनांत ईश्वराचें अस्तित्व विशेष प्रकारें कोठें कोठें प्रत्ययास येतें याचें विवेचन केलें आहे.

या अध्यायांतील विवरणांपैकीं विशेष लक्षांत ठेवण्यासारखी गोष्ट म्हणजे अध्यायाच्या सुरुवातीस व शेवटासहि, ईश्वर सर्वव्यापी आहे, कोठें नाहीं असें नाहींच, सर्व जें काय आहे तें ईश्वरच व जें कांहीं विश्व म्हणून दिसतें त्याला ईश्वर पूर्णपणें अन्तर्बाह्य व्यापून उरला आहे हें निःसंदिग्धपणें सांगितलें असून त्यावरहि विश्वांतील कांहीं वस्तूंत ईश्वरीभाव अन्य वस्तूंपेक्षां

विशेष उत्कटपणें प्रत्ययास येतो असें सांगितलें असून अशा वस्तूंचीं अगर व्यक्तींचीं सामान्य परिचयाचीं उदाहरणेंहि दिलीं आहेत. हें विभूतितत्त्व म्हणजे ईश्वराच्या अंगची एक विशिष्ट शक्तीच होय. याला दृष्टांत विद्युच्छक्तीचा देतां येईल. विद्युच्छक्ति विश्वांत सार्वत्रिक आहे; परंतु तिचा विशेष प्रभाव कोठें कोठेंच दिसतो. कोठें ती दिवे लावणें, पंखे फिरविणें, गाडया चालविणें वगैरे विधायक कार्यें करतांना दिसते; तर कोठें अशनि-पाताच्या रूपानें विध्वंसक कार्येंहि करते. ईश्वरी विभूति या सर्व प्रकारच्या आहेत व त्यांचा वेचक निर्देश या अध्यायांत केलेला आहे.

मात्र या अध्यायाचा विशिष्ट हेतु लक्षांत ठेवण्यासारखा आहे आणि तो म्हणजे अर्जुनाच्या ठिकाणीं त्याचें व्यक्तित्व पूर्ण प्रकट .करणें हा आहे. द्वितीयाध्यायांत हें व्यक्तित्व अगदीं पूर्णपणें लयास पावलें होतें व अर्जुन शत्रूकडून मारला जाण्यास देखील तयार झाला होता. ही अवस्था कार्य-सिद्धीस उपयोगी नाहीं हें जाणून या अध्यायांत ईश्वराचा नाना वस्तूंत व नाना व्यक्तींत आविर्भाव-अवतार-सांगतां सांगतांच "आपण स्वतःहि ईश्वरी विभूति आहोंत, एवढेच काय पण प्रत्यक्ष, अर्जुना, तूंहि एक ईश्वरी विभूतीच आहेस," असें अर्जुनास सांगून भगवान् कार्यदृष्टया त्याचा व्यक्तिभाव पूर्ण-पणें जागृत करूं पहात आहेत. हा व्यक्तीच्या दैवी दिशेचा परमावधीचा आविर्भाव ( Extreme Projection ) होय व हा पुढें यथाक्रम येणाऱ्या दैवासुरसपद्विभागयोगाच्या अध्यायांतील व्यक्तीच्या आसुरी दिशेच्या परमावधीच्या आविर्भावाशीं योग्य प्रकारें झगडा कारण्याकरतां उद्दीपित केलेला आहे.

॥ श्रीभगवानुवाच ॥

**भूय एव महाबाहो शृणु मे परमं वचः ।**
**यत्तेऽहं प्रीयमाणाय वक्ष्यामि हितकाम्यया ॥ १०-१ । ३०५**

श्रीभगवान् सांगतातः—अर्जुना, तुला पुढें सांगतों, ऐक. ३०५

**न मे विदुः सुरगणाः प्रभवं न महर्षयः ।**
**अहमादिर्हि देवानां महर्षीणां च सर्वशः ॥ १०-२ । ३०६**

महर्षयः सप्त पूर्वे चत्वारो मनवस्तथा।
मद्भावा मानसा जाता येषां लोक इमाः प्रजाः ॥ १०-६ । ३०७

मी देवांचा व ऋषींचाहि उत्पन्नकर्ता आहें. सबब त्यांनाहि माझा संपूर्ण प्रभाव ठाऊक नाहीं. ज्यांची प्रजा सांप्रत जगभर पसरली आहे, ते ऋषि-महर्षि, मनु वगैरे सर्व माझ्यापासून उत्पन्न झालेले आहेत. ३०६-३०७

बुद्धिर्ज्ञानमसंमोहः क्षमा सत्यं दमः शमः।
सुखं दुःखं भवोऽभावो भयं चाभयमेव च ॥ १०-४ । ३०८

बुद्धि, ज्ञान, इत्यादि अनेक प्रकारचे प्राणिमात्रांचे भाव माझ्यापासूनच उत्पन्न होतात. ३०८

अहिंसा समता तुष्टिस्तपो दानं यशोऽयशः।
भवंति भावा भूतानां मत्त एव पृथग्विधाः ॥ १०-५ । ३०९

मी सर्वांचें उत्पत्तिस्थान आहें. ३०९

अहं सर्वस्य प्रभवो मत्तः सर्वं प्रवर्तते।
इति मत्वा भजंते मां बुधा भावसमन्विताः ॥ १०-८ । ३१०

हें जाणून ज्ञानी माझी भक्ति करतात. ३१०

मच्चिता मद्गतप्राणा बोधयंतः परस्परम्।
कथयंतश्च मां नित्यं तुष्यंति च रमंति च ॥ १०-९ । ३११

अगदीं चित्तप्राण मजकडे लावून ते परस्परांजवळ माझें गुणसंकीर्तन करीत, संतुष्ट होत्साते आनंदानें कालक्रमणा करतात. ३११

तेषा सततयुक्तानां भजतां प्रीतिपूर्वकम्।
ददामि बुद्धियोगं तं येन मामुपयांति ते ॥ १०-१० । ३१२

अशा प्रकारें सतत माझ्या भक्तींत गर्क झालेल्यांना मी ज्ञानप्राप्ति होईलसें करतों व त्यानंतर त्या ज्ञानानें ते मला येऊन मिळतात. ३१२

तेषामेवानुकंपार्थमहमज्ञानजं तमः।
नाशयाम्यात्मभावस्थो ज्ञानदीपेन भास्वता ॥ १०-११ । ३१३

त्यांच्यावर अनुग्रह करण्याकरितां मी त्यांच्या अंतरंगांत प्रवेश करून, तेथें ज्ञानाचा प्रकाश पाडून त्यांचा अज्ञानांधःकार नाहींसा करतों.

॥ अर्जुन उवाच ॥

**परं ब्रह्म परं धाम पवित्रं परमं भवान् ।**
**पुरुषं शाश्वतं दिव्यमादिदेवमजं विभुम् ॥** १०-१२ । ३१४
**आहुस्त्वामृषयः सर्वे देवर्षिर्नारदस्तथा ।**
**असितो देवलो व्यासः स्वयं चैव ब्रवीषि मे ॥**
१०-१३ । ३१५
**सर्वमेतदृतं मन्ये यन्मां वदसि केशव ।**
**न हि ते भगवन्व्यक्तिं विदुर्देवा न दानवाः ॥** १०-१४ । ३१६

अर्जुन यावर म्हणतो, भगवान्, आपण सर्वव्यापि परब्रह्म आहां असें अनेक श्रेष्ठ ऋषीहि सांगतात, आपणहि मला तसेंच म्हणत आहां व मला तें सर्व खरें वाटतें. ३१४-१६

**स्वयमेवात्मनाऽऽत्मानं वेत्थ त्वं पुरुषोत्तम ।**
**भूतभावन भूतेश देवदेव जगत्पते ॥** १०-१५ । ३१७

पण, हे भगवान्, आपणच आपणा स्वतःला पूर्णपणें जाणत आहां. ३१७

**वक्तुमर्हस्यशेषेण दिव्या ह्यात्मविभूतयः ।**
**याभिर्विभूतिभिर्लोकानिमांस्त्वं व्याप्य तिष्ठसि ॥**
१०-१६ । ३१८

सबब, आपणच आपल्या ज्या दिव्य विभूतींच्या स्वरूपांत हें विश्व व्यापून राहिलां आहां त्या विभूती मला सांगा. ३१८

**कथं विद्यामहं योगिंस्त्वां सदा परिचिंतयन् ।**
**केषु केषु च भावेषु चिन्त्योऽसि भगवन्मया ॥** १०-१७ । ३१९

म्हणजे आपणाला कोठें कोठें पहावें व ओळखावें हें मला कळेल. ३१९

विस्तरेणात्मनो योगं विभूतिं च जनार्दन ।
भूयः कथय तृप्तिर्हि शृण्वतो नास्ति मेऽमृतम् ॥
१०-१८। ३२०

भगवन्, आपण सांगत असतां ऐकण्याची माझी इच्छा तृप्तच होत नाहीं. ३२०

॥ श्रीभगवानुवाच ॥

हंत ते कथयिष्यामि दिव्या ह्यात्मविभूतयः ।
प्राधान्यतः कुरुश्रेष्ठ नास्त्यंतो विस्तरस्य मे ॥ १०-१९ । ३२१

श्रीभगवान् म्हणाले, अर्जुना, ठीक आहे. माझ्या विभूतींपैकीं मुख्य मुख्य विभूती मी तुला सांगतों. सर्वच सागणें शक्य नाहीं. कारण त्या अनंत आहेत. ३२१

अहमात्मा गुडाकेश सर्वभूताशयस्थितः ।
अहमादिश्च मध्यं च भूतानामंत एव च ॥ १०-२० । ३२२

सर्वभूतव्यापी आत्मा मी आहें. त्यांची उत्पत्ति-स्थिति-लयकर्ताहि मीच आहें. ३२२

सर्गाणामादिरंतश्च मध्यं चैवाहमर्जुन । १०-३२-१ ।
अहमेवाक्षयः कालो धाताहं विश्वतोमुखः ॥ १०-३३-२ । ३२३

चराचर सृष्टीचें आदिमध्यान्तरूप मीच. त्याचप्रमाणें विश्वांत प्रत्ययास येणारा काल हाहि माझेंच रूप आणि विश्वोत्पत्तीची क्रिया करणारा ब्रह्मदेवहि मीच. ३२३

आदित्यानामहं विष्णुर्ज्योतिषां रविरंशुमान् ।
मरीचिर्मरुतामस्मि नक्षत्राणामहं शशी ॥ १०-२१ । ३२४

मी द्वादशादित्यांतील विष्णु, आकाशस्थ ज्योतींतील सूर्य, मरुद्गणांपैकीं मरीचि, नक्षत्रगणांपैकीं चंद्र. ३२४

रुद्राणां शंकरश्चास्मि १०-२३-१ ।
देवानामस्मि वासवः । १०-२२-२ ।
वसूनां पावकश्चास्मि १०-२३-३ ।
उद्भवश्च भविष्यताम् ॥ १०-३४-२ । ३२५

एकादश रुद्रांपैकीं शंकर, देवगणांपैकीं इंद्र, अष्टवसूंपैकीं अग्नि, व जन्मास येणाऱ्याचें उत्पत्तिस्थान मीच आहें. ३२५

मासानां मार्गशीर्षोऽहं १०-३५-३ ।
ऋतूनां कुसुमाकरः । १०-३५-४ ।
पवनः पवतामस्मि १०-३१-१ ।
स्थावराणां हिमालयः ॥ १०-२५-४ । ३२६

मासांत मार्गशीर्ष, ऋतूंत वसंत, वेगवानांत वायु, स्थिर वस्तूंत हिमालय. ३२६

अश्वत्थः सर्व वृक्षाणां १०-२६-१ ।
मेरुः शिखरिणामहम् । १०-२३-४ ।
सागरः सरसामस्मि १०२४--४ ।
स्रोतसामस्मि जाह्नवी ॥ १०-३१-४ । ३२७

उंच पर्वतांमध्यें मेरु, वृक्षांमध्यें वड,[२] सरोवरांत समुद्र, नद्यांमध्यें गंगा. ३२७

---

१. हीं विभूतिरत्नें सूत्रहीनावस्थेंत, एखाद्या पुरचुंडींत बांधून ठेवल्याप्रमाणें विष्कळीतशीं वाटलीं. सबब, अन्यत्र्य क्वचितच केलेला श्लोकरचनांतराचा प्रयत्न येथें विशेष केला असून श्रीमद्भगवद्गीतारूपी मुगुटावर बसविण्याकरतां या रत्नांचा एकादा नीटसा तुरा बनवितां येतो कीं काय हें करून पाहिलें आहे.

२. हा वडच होय. पिंपळ नव्हे, असें मानावयास अनेक कारणें आहेतः— ( १ ) व्युत्पत्ति–अश्व इव तिष्ठते अश्वत्थः, फांद्यांस फुटलेल्या मुळांचीं ठिकठिकाणीं खोडें बनून त्या खोडांच्या पायावर घोड्याप्रमाणें उभें असलेलें झाड वडाचेंच होय. ( २ ) उर्ध्वमूलः अधःशाखः अश्वत्थः, म्हणजे वर मुळया असलेला व शाखा फार खालीं लवलेला वड–पिंपळ नव्हे. ( ३ ) न्यग्रोधः, अपभ्रष्ट रूप नादरूख

इंद्रियाणां मनश्चास्मि १०-२२-३ ।

भूतानामस्मि चेतना । २०-२२-३ ।

झषाणां मकरश्चास्मि १०-३१-३ ।

वरुणो यादसामहम् ।। १०-२९-२ । ३२८

अकरा इंद्रियांपैकीं मन, शरिरांमध्यें चेतना, जलचरांतील मगर व मत्स्यांमध्यें देवमासा. ३२८

मृगाणां च मृगेंद्रोऽहं १०-३०-३ ।

वैनतेयश्च पक्षिणाम् । १०-३०-४ ।

ऐरावतः गजेंद्राणां १०-२७-३ ।

धेनूनामास्मि कामधुक् ।। १०-२८-२ । ३२९

पक्षिगणांमध्यें गरुड, चतुष्पाद वन्यपशूंमध्यें सिंह, हत्तींपैकीं ऐरावत, गायींपैकीं कामधेनू. ३२९

उच्चैश्रवसमश्वानां विद्धि माममृतोद्भवम् । १९-२७-१ ।

अनन्तश्चास्मि नागानां १०-२९-१ ।

सर्पाणामास्मि वासुकी ।। १९-२८-४ । ३३०

घोड्यांमध्यें उच्चैःश्रवा, नागनामक मानवजातीपैकीं अनंत, सर्पनामक मानवजातीपैकीं वासुकी. ३३०

गंधर्वाणां चित्ररथो १०-२६-३ ।

वित्तेशो यक्षरक्षसाम् । १०-२३-२ ।

प्रल्हादश्चास्मि दैत्यानां १०-३०-१ ।

अर्यमा पितृणामहम् ।। १०-२९-३ । ३३१

---

अगर सांप्रतचा नांदुरखी–वड नव्हे. ( ४ ) पिप्पल म्हणजे पिंपळ–वर मुळें नसलेला व ज्याच्या फांद्या उंच–उभट–आहेत असा. ( ५ ) श्रीमत्, उर्जित, ह्या विभूतीच्या खुणाहि पिंपळापेक्षां वडालाच जास्त लागू पडतात. एवंच अश्वत्थ म्हणजे वड–पिंपळ नव्हे.

पितरांपैकीं आर्यमा, गंधर्वांपैकीं चित्ररथ, यक्षांमध्यें कुबेर, दैत्यांपैकीं प्रल्हाद. ३३१

**पुरोधसां च मुख्यं मां**
**विद्धि पार्थ बृहस्पतिम् ।** १०-२४-१ ।
**महर्षीणां भृगुरहं** १०-२५-१ ।
**देवर्षीणां च नारदः ॥** १०-२६-२ । ३३२

पुरोहितांमध्यें बृहस्पति, महर्षींमध्यें भृगु, देवर्षींमध्यें नारद. ३३२

**मुनीनामप्यहं व्यासः** १० ३७-३ ।
**कवीनामुशनाकविः ।** १०-३७-४ ।
**मौनं चैवास्मि गुह्यानां** १०-३८-३ ।
**सिद्धाना कपिलो मुनिः ॥** १०-२६-४ । ३३३

मुनींमध्यें व्यास, कवींमध्यें शुक्राचार्य, सिद्धांमध्यें कपिलमुनि, गुह्यांपैकीं मौन. ३३३

**अक्षराणामकारोऽस्मि** १०-३३-१ ।
**गिरामस्म्येकमक्षरम् ।** १०-२५-२ ।
**वेदानां सामवेदोऽस्मि** १०-२२-१ ।
**द्वंद्वः सामासिकस्य च ॥** १०-३३-२ । ३३४

वाणीमध्यें ॐ कार, अक्षरांपैकीं अ, समासांपैकीं द्वंद्व, वेदांपैकीं सामवेद. ३३४

**बृहत्साम तथा साम्नां** १०-३५-१ ।
**गायत्री छंदसामहम् ।** १०-३५-२ ।
**यज्ञानां जपयज्ञोऽस्मि** १०-२५-३ ।
**ज्ञानं ज्ञानवतामहम् ॥** १०-३८-४ । ३३५

छंदांपैकीं गायत्री, गावयांच्या स्तोत्रांपैकीं बृहत्साम, यज्ञांपैकीं जपयज्ञ, ज्ञानवानांचें ज्ञान. ३३५

अध्यात्मविद्या विद्यानां १०-३२-३ ।
वादः प्रवदतामहम् । १०-३०-४ ।
कीर्तिः श्रीर्वाक्च नारीणां १०-३४-३ ।
स्मृतिर्मेधा धृतिः क्षमा ॥ १०-३४-४ । ३३६

विद्यांपैकीं अध्यात्मविद्या, संभाषणांमध्यें विवाद, स्त्रीदेवतांपैकीं लक्ष्मी, सरस्वती, कीर्ति, स्मृति, बुद्धि, धृति व क्षमा या. ३६६

जयोऽस्मि व्यवसायोऽस्मि
सत्त्वं सत्त्ववतामहम् । १०-३६-३ ।
द्यूतं छलयतामस्मि १०-३६-१ ।
कंदर्पः प्र- ( दुर् ? )–जनोऽप्यहम् ॥ १०-२८-३ । ३३७

अन्यत्र, जय, निश्चय व सत्त्व, छल करणाऱ्याच्या साधनांपैकीं द्यूत व छल करणाऱ्या मनोभावनांपैकीं काम. ( ? ) ३३७

दण्डो दमयतामास्मि १०-३८-१ ।
यमः संयमतामहम् । १०-२९-४ ।
मृत्युः सर्वहरश्चाहम् १०-३४-१ ।
कालः कलयतामहम् ॥ १०-३०-२ । ३३८

दमनाच्या साधनांपैकीं दण्ड, दमनकर्मांत प्रवीण असणारांपैकीं यम, सर्वस्व हरण करणारांपैकीं मृत्यु, सर्व भक्षण करणाऱ्यांपैकीं काल. ३३८

आयुधानामहं वज्रम् १०-२८-१ ।
रामः शस्त्रभृतामहम् । १०-३१-२ ।
सेनानीनामहं स्कंदः १०-२४-३ ।
तेजस्तेजस्विनामहम् ॥ १०-३६-२ । ३३९

शस्त्रांपैकीं वज्र, शस्त्राधाऱ्यांपैकीं राम, सेनापतींपैकीं कार्तिकेय, तेजस्वी व्यक्तीचें तेज. ३३९

**नराणां च नरपतिः** १०-२७-४ ।

**नीतिरस्मि जिगीषताम्** । १०-३८-२ ।

**वृष्णीनां वासुदेवोऽस्मि** १०-३७-१ ।

**पाण्डवानां धनंजयः** ॥ १०-३७-२ । ३४०

मनुष्यांत राजा, जयाच्या साधनांपैकीं नीति, यादवांपैकीं श्रीकृष्ण, पाण्डवांपैकीं अर्जुन.

म्हणजे अर्जुना, तू स्वतः देखील माझीच विभूति आहेस हें नीट लक्षांत ठेव. ३४०

**नांतोऽस्ति मम दिव्यानां विभूतीनां परंतप ।**

**एष तूद्देशतः प्रोक्तो विभूतेर्विस्तरो मया ॥** १०-४० । ३४१

मात्र, खरोखर पाहतां, माझ्या दिव्य विभूती अनन्त आहेत, त्यांपैकीं हा तुला येथवर सांगितलेला विस्तार फक्त नमुन्याकरतां होय. ३४१

**यद्यद्विभूतिमत्सत्त्वं श्रीमदूर्जितमेव वा ।**

**तत्तदेवावगच्छ त्वं मम तेजोंऽशसंभवम् ॥** १०-४१ । ३४२

जी जी वस्तु अगर व्यक्ति वैभव, लक्ष्मी किंवा प्रभाव यांनीं युक्त आहे ती ती माझ्या तेजाच्या विशेषांशांपासून झाली आहे असें समज. ३४२

**यच्चापि सर्वभूतानां बीजं तदहमर्जुन ।**

**न तदस्ति विना यत्स्यान्मया भूतं चराचरम् ॥** १०-३९ । ३४३

त्याचप्रमाणें सर्व भूतांच्या बीजांच्या ठिकाणीं मीच आहें. माझ्या विरहित विश्वांत कांहींहि नाहीं. ३४३

**अथवा बहुनैतेन किं ज्ञातेन तवार्जुन ।**

**विष्टभ्याहमिदं कृत्स्नमेकांशेन स्थितो जगत् ॥** १०-४२ । ३४४

किंवा, अर्जुना, तुला विशेष तपशिलांत शिरून माझ्या विभूतींची यादीच लक्षांत ठेवावयास हवी असें नाहीं. फक्त एवढें लक्षांत ठेव कीं, माझ्या

---

१ कालानुसार (१) गुप्त मसलत अगर (२) उघड न्यायाचा व्यवहार.

केवळ एकाच अंशापासून हें जग उत्पन्न करून, त्याला व्यापून, मी बहुंशानें पुनः शिल्लकच राहिलों आहें. ३४४

एतां विभूतिं योगं च मम यो वेत्ति तत्त्वतः ।
सोऽविकंपेन योगेन युज्यते नात्र संशयः ॥ १०-७ । ३४५

माझें हें विभूतिमत्व आणि तें प्रकट करण्याची युक्ति यांतील तत्त्व जो जाणतो त्याला जगांत स्थिरपणें वागणें शक्य होतें. ३४५

यो मामजमनादिं च वेत्ति लोकमहेश्वरम् ।
असंमूढः स मर्त्येषु सर्वपापैः प्रमुच्यते ॥ १०-३ । ३४६

मनुष्यांमध्यें जो मला अजन्मा, अनादि व सर्व विश्वाचा परमेश्वर या दृष्टीनें जाणूं शकतो तो मोहविरहित होऊन सर्व पापापासून मुक्त होऊन मोक्षाला जातो. ३४६

इति गुह्यतमं शास्त्रमिदमुक्तं मयानघ ।
एतद्बुध्वा बुद्धिमान्स्यात्कृतकृत्यश्च भारत ॥ १५-२० । ३४७

हें तुला सांगितलेलें ज्ञान अत्यंत गुह्य आहे. हें ज्यानें जाणलें तो कृतकृत्य होतो. ३४७

हरिः ॐ तत्सत्

इति रचनान्तरीकृतश्रीमद्भगवद्गीतासूपनिषत्सु० विभूतियोगे नाम अष्टमोऽध्यायः ॥ ८ ॥

---

## नवमाध्याय

# विश्वरूपदर्शनयोग

पूर्वाध्यायांत आपली व्याप्ति विभूतिबद्धच नसून ती सर्व विश्वभर व त्याच्याहि आंतून व बाहेरून असल्याचें भगवंतानीं अर्जुनास जें सांगितलें तो केवळ श्राव्यभाग झाला. परंतु श्रवणापेक्षां दर्शन जास्त परिणामकारक होईल, असें वाटून या अध्यायांत अर्जुन आपणांस विश्वरूप दाखविण्याबद्दल

भगवंतास विनवीत आहे व त्याच्या विनंतीस मान देऊन भगवान् अर्जुनास प्रथम दिव्य दृष्टि देऊन नंतर विश्वरूप दाखवीत आहेत.

अर्जुनाची ही विश्वरूपदर्शनाची जिज्ञासा एखाद्या चौकस मुलानें एखाद्या लष्करी दारूच्या कोठाराला पेटलेलें कोलीत लावलें असतां काय होतें तें पाहण्याच्या प्रयत्नाइतकी अगर त्यापेक्षां अनंत पटींनीं जास्त फलद्रूप झाली. विश्वरूप प्रगट झालें! पण कसलें तें विश्वरूप आणि काय!! अर्जुनापुढें एक अत्यंत सुंदर, आश्चर्यकारक, अद्‌भुत, दैदीप्यमान, भयानक, उग्र, आक्राळविक्राळ असें सर्वभक्षक कालरूप प्रगट झालें!!! तें पाहून अर्जुनाची भयानें गाळणच उडाली. मोठ्या धैर्यानें "हे महापुरुष, आपण कोण?" असा प्रश्न अर्जुनानें या रूपास करितांच "मी साक्षात् सर्वभक्षक काल आहें आणि तुला लढावयाचें नसलें तरी या रणांगणावर जमलेल्या बहुतेक क्षत्रियांचा मी हा पहा फडशा उडवितों!!! तुला हवें असल्यास निमित्तमात्रानें लढून फुकटचें यश पदरांत पाडून घे." असा रोकडा जबाब त्याला मिळाला. एवढ्यानें फारतर अर्जुनाची जयशंका दूर झाली. परंतु तें रूप इतकें उग्र, भयानक होतें कीं, मोठें प्रसंगावधान दाखवून, त्यापुढें अनेक साष्टांग नमस्कार घालघालून, अखेर अर्जुनानें त्या रूपाचें विसर्जन घडवून आणलें. अर्थात्, भगवानहि अर्जुनाचें प्रिय करणारेच होते. परंतु व्यक्तीची क्षुद्रता, ईश्वराची अगाधता, त्याचप्रमाणें वरिष्ठ ईश्वरी सत्तेचें मानवी व्यवहारावर नियमन व फार तर त्याला अनुकूलपणें वागण्याचें मानवी स्वातंत्र्य, या गोष्टी विश्वरूपदर्शनानें अर्जुनाच्या मनावर इतक्या दृढ प्रतिबिंबित झाल्या कीं, भविष्य कालीं त्याच्या वागण्याची दिशाच त्यांनीं जवळजवळ ठरवून टाकली असें म्हणावयास हरकत नाहीं.

या अध्यायाचें काव्य फार हृदयंगम असून त्यांत अद्‌भुत, रौद्र, भयानक, व त्याचप्रमाणें वात्सल्य, या रसांचा चांगला मिलाफ आहे. उपदेशाला परिणामकारकपणा आणण्याच्या दृष्टीनें या अध्यायाचें महत्त्व फार आहे. या सर्वोत्तम मानला गेलेल्या गीताध्यायाला अगदींच प्रक्षिप्त ठरविल्याशिवाय गीतारहस्य कर्मपर नव्हे असें म्हणणें म्हणजे थोडक्यांत भाषेंतील शब्दांची व त्यांच्या अर्थाची फारकत करणें होय व असें ज्यांना करावयाचें असेल त्यांनीं गीतार्थ लावण्याच्या भानगडींतच न पडणें बरें. पण असें

ज्यांना करावयाचें नसेल, त्यांनीं अर्जुनाप्रमाणें, निदान या विश्वरूपदर्शनाच्या कल्पनामय अनुभवानें देखिल शुद्धीवर येणें व स्वकर्तव्य योग्य प्रकारें बजावीत राहणें हेंच बरें. सबब, आतां तिकडे वळूं.

---

॥ अर्जुन उवाच ॥

मदनुग्रहाय परमं गुह्यमध्यात्मसंज्ञितम् ।
यत्त्वयोक्तं वचस्तेन मोहोऽयं विगतो मम ॥ ११-१ । ३४८

अर्जुन म्हणतो, भगवन्, आपण सांगितलेलें गुह्य अध्यात्मज्ञान ऐकून माझा मोह नाहींसा झाला. ३४८

भवाप्ययौ हि भूतानां श्रुतौ विस्तरशो मया ॥
त्वत्तः कमलपत्राक्ष माहात्म्यमपि चाव्ययम् ॥ ११-२ । ३४९

मीं आपलें माहात्म्यहि ऐकिलें. ३४९

एवमेतद्यथाऽऽत्थ त्वमात्मानं परमेश्वर ।
द्रष्टुमिच्छामि ते रूपमैश्वरं पुरुषोत्तम ॥ ११-३ । ३५०

पण मीं आपलें विश्वरूप पाहूं इच्छितों. ३५०

मन्यसे यदि तच्छक्यं मया द्रष्टुमिति प्रभो ।
योगेश्वर ततो मे त्वं दर्शयात्मानमव्ययम् ॥ ११-४ । ३५१

हे भगवन्, शक्य असेल तर तें मला दाखवाल काय? ३५१

॥ श्रीभगवानुवाच ॥

न तु मां शक्यसे द्रष्टुमनेनैव स्वचक्षुषा ।
दिव्यं ददामि ते चक्षुः पश्य मे योगमैश्वरम् ॥ ११-८ । ३५२

श्रीभगवान् म्हणाले, अर्जुना, बरें आहे. पण तुझ्या या सामान्य चर्मचक्षूंनीं तूं माझें विश्वरूप पाहूं शकणार नाहींस, त्याकरतां मी प्रथम तुला दिव्य दृष्टि देणें जरूर आहे, व ती ही मी देतों.

पश्य मे पार्थ रूपाणि शतशोऽथ सहस्रशः ।
नानाविधानि दिव्यानि नानावर्णाकृतानि च ॥ ११-५ । ३५३
पश्यादित्यान्वसून्रुद्रानश्विनौ मरुतस्तथा ।
बहून्यदृष्टपूर्वाणि पश्याश्चर्याणि भारत ॥ ११-६ । ३५४
इहैकस्थं जगत्कृत्स्नं पश्याद्य सचराचरम् ।
मम देहे गुडाकेश यच्चान्यद्द्रष्टुमिच्छसि ॥ ११-७ । ३५५

आणि, आतां, पहा काय देखावा दिसतो तो! ३५३–३५५

॥ संजय उवाच ॥

एवमुक्त्वा ततो राजन् महायोगेश्वरो हरिः ।
दर्शयामास पार्थाय परमं रूपमैश्वरम् ॥ ११-९ । ३५६
अनेकवक्त्रनयनमनेकाद्भुतदर्शनम् ।
अनेकदिव्याभरणं दिव्यानेकोद्यतायुधम् ॥ ११-१० । ३५७

संजय सांगतो— राजा धृतराष्ट्रा ! काय तें अत्यंत आश्चर्यकारक दृश्य ! कितीतरी तीं मस्तकें व कितीतरी ते डोळे!! कितीतरी दिव्य अलंकार व कितीतरी तेजस्वी उगारलेलीं आयुधें!!! ३५६–३५७

दिव्यमाल्यांबरधरं दिव्यगंधानुलेपनम् ।
सर्वाश्चर्यमयं देवमनंतं विश्वतोमुखम् ॥ ११-११ । ३५८

काय ती अंगाला लाविलेली सुंदर उटी, काय त्यावरचीं सुंदर वस्त्रें व काय त्या सुंदर फुलांच्या माळा! सर्वच आश्चर्य! आश्चर्य!! आश्चर्य!!! ३५८

दिवि सूर्यसहस्रस्य भवेद्युगपदुत्थिता ।
यदि भाः सदृशी सा स्याद्भासस्तस्य महात्मनः ॥ ११-१२।३५९
तत्रैकस्थं जगत्कृत्स्नं प्रविभक्तमनेकधा ।
अपश्यद्देवदेवस्य शरीरे पांडवस्तदा ॥ ११-१३ । ३६०
ततः स विस्मयाविष्टो हृष्टरोमा धनंजयः ।
प्रणम्य शिरसा देवं कृतांजलिरभाषत ॥ ११-१४ । ३६१

जणूं काय आकाशांत हजारों सूर्य एकदम उगवले असावेत एवढा त्या रूपाचा प्रचंड प्रकाश! आणि तेथें सर्व विश्व एकवटलेलें!! त्या विश्वरूपाला पाहून अर्जुन हात जोडून म्हणतो— ३५९–३६१

॥ अर्जुन उवाच ॥

पश्यामि देवांस्तव देव देहे सर्वांस्तथा भूतविशेषसंघान् ।
ब्रह्माणमीशं कमलासनस्थमृषींश्च सर्वानुरगांश्च दिव्यान् ॥
११-१५ । ३६२

अनेकबाहूदरवक्त्रनेत्रं पश्यामि त्वां सर्वतोऽनंतरूपम् ।
नांतं न मध्यं न पुनस्तवादिं पश्यामि विश्वेश्वर विश्वरूपम् ॥
११-१६ । ३६३

किरीटिनं गदिनं चक्रिणं च तेजोराशिं सर्वतो दीप्तिमंतम् ।
पश्यामि त्वां दुर्निरीक्ष्यं समंताद्दीप्तानलार्कद्युतिमप्रमेयम् ॥
११-१७ । ३६४

भगवन्, या आपल्या विश्वरूपांत सर्व......दिसत आहे. ओं! जिकडेतिकडे तोंडें, डोळे, हात आणि शरीरेंच शरीरें! किती मुगूट, किती गदा, किती चक्रें!! आणि केवढा प्रचंड हा प्रकाश!!! ३६२–३६४

अनादिमध्यांतमनंतवीर्यमनंतबाहुं शशिसूर्यनेत्रम् ।
पश्यामि त्वां दीप्तहुताशवक्त्रं स्वतेजसा विश्वमिदं तपंतम् ॥
११-१९ । ३६५

मला तर पाहवत देखील नाहीं! ओहोहो! केवढा हा प्रभाव! काय सूर्यासारखे तेजस्वी डोळे! आणि तोंडें तर भडकलेल्या अग्नीप्रमाणेंच आहेत! शिवाय प्रकाश तर सर्व विश्वभर पसरलेला दिसत आहे!!! ३६५

त्वमक्षरं परमं वेदितव्यं त्वमस्य विश्वस्य परं निधानम् ।
त्वमव्ययः शाश्वतधर्मगोप्ता सनातनस्त्वं पुरुषो मतो मे ॥
११-१८ । ३६६

रुद्रादित्या वसवो ये च साध्या विश्वेऽश्विनौ मरुतश्चोष्मपाश्च ।
गंधर्वयक्षासुरसिद्धसंघा वीक्षंते त्वां विस्मिताश्चैव सर्वे ।।
११-२२ । ३६७

भगवन्, मला तर आपण फारच अबाढव्य, प्रचंड व श्रेष्ठ वाटतां; आणि हे सर्व देवहि आपणाभोंवतीं जमा झाले असून विस्मयादरानें आपल्याकडे पाहत आहेत. ३६६–३६७

अमी हि त्वां सुरसंघा विशंति केचिद्भीताः प्रांजलयो गृणंति ।
स्वस्तीत्युक्त्वा महर्षिसिद्धसंघाः स्तुवंति त्वां स्तुतिभिः पुष्कलाभिः ।।
११-२१ । ३६८

अनेक ऋषिगण भयभीत होऊन, 'भगवन्, शान्त व्हा! शान्त व्हा!' अशी आपली हात जोडून स्तुति करीत आहेत. ३३८

द्यावापृथिव्योरिदमंतरं हि व्याप्तं त्वयैकेन दिशश्च सर्वाः ।
दृष्ट्वाद्भुतं रूपमुग्रं तवेदं लोकत्रयं प्रव्यथितं महात्मन् ।।
११-२० । ३६९

आपण एकट्यानें हें सर्व आकाश व्यापून टाकलें आहे व आपल्या उग्र रूपाचा त्रैलोक्याला त्रास होत आहे. ३६९

रूपं महत्ते बहुवक्त्रनेत्रं महाबाहो बहुबाहूरुपादम् ।
बहूदरं बहुदंष्ट्राकरालं दृष्ट्वा लोकाः प्रव्यथितास्तथाऽहम् ।।
११-२३ । ३७०

नभःस्पृशं दीप्तमनेकवर्णं व्यात्ताननं दीप्तविशालनेत्रम् ।
दृष्ट्वा हि त्वां प्रव्यथितांतरात्मा धृतिं न विंदामि शमं च विष्णो ।।
११-२४ । ३७१

आणि मलाहि भीति वाटूं लागली आहे. छे! छे!! तो आपला पसरलेला प्रचंड व आक्राळविक्राळ जबडा व ते चकाकणारे डोळे पाहून माझा तर भयानें थरकांप झाला आहे!!! ३७०–३७१

**यथा प्रदीप्तं ज्वलनं पतंगा विशंति नाशाय समृद्धवेगाः ।**
**तथैव नाशाय विशंति लोकास्तवापि वक्त्राणि समृद्धवेगाः ॥**

११-२९ । ३७२

अग्नीमध्यें पतंग जसे जोरानें उड्या घेतात तसे हे सर्व लोक स्वतःचा नाश करून घेण्याकरतां आपणांमध्यें उड्या घेत आहे. ३७२

**यथा नदीनां बहवोऽबुवेगाः समुद्रमेवाभिमुखा द्रवंति ।**
**तथा तवामी नरलोकवीरा विशंति वक्त्राण्याभिविज्वलंति ॥**

११-२८ । ३७३

अरे! केवढा प्रचंड हा मानवी वीरांचा लोंढा आपल्या प्रज्वलित जबड्यांत एकसारखा ओतत आहे!! ३७३

**अमी च त्वां धृतराष्ट्रस्य पुत्राः सर्वे सहैवावनिपालसंघैः ।**
**भीष्मो द्रोणः सूतपुत्रस्तथासौ सहास्मदीयैरपि योधमुख्यैः ॥**

११-२६ । ३७४

आणि त्यांमध्यें हे तर भीष्म, द्रोण, कर्ण, दुर्योधन व त्याचे भाऊ, तसेंच आमच्याकडचेहि अनेक योद्धे! ३७४

**वक्त्राणि ते त्वरमाणा विशंति दंष्ट्राकरालानि भयानकानि ।**
**केचिद्विलग्ना दशनांतरेषु संदृश्यन्ते चूर्णितैरुत्तमांगैः ॥**

११-२७ । ३७५

कांहींचीं तर डोकींच आपल्या दाढांमध्यें सांपडून, रगडून, चूर्ण होऊन गेलीं आहेत! ३७५

**लेलिह्यसे ग्रसमानः समंताल्लोकान्समग्रान्वदनैर्ज्वलद्भिः ।**
**तेजोभिरापूर्य जगत्समग्रं भासस्तवोग्राः प्रतपंति विष्णो ॥**

११-३० । ३७६

आणि तरीहि आपण इतरांना आंत खेंचण्याकारितां जिभल्या चाटीतच आहांत. ३७६

दंष्ट्राकरालानि च ते मुखानि दृष्ट्वैव कालानलसंनिभानि ।
दिशो न जाने न लभे च शर्म प्रसीद देवेश जगन्निवास ।।
११-२५ । ३७७

भगवन्, आपल्या त्या आक्राळविक्राळ दाढा व काळाग्नीप्रमाणें तीं धगधगीत तोंडें पाहून माझी तर अगदीं पूर्ण त्रेधा उडाली आहे. ३७७

आख्याहि मे को भवानुग्ररूपो नमोऽस्तु ते देववर प्रसीद ।
विज्ञातुमिच्छामि भवंतमाद्यं न हि प्रजानामि तव प्रवृत्तिम् ।।
११-३१ । ३७८

हे भगवन , आपणांपुढें मी अनेकवार साष्टांग प्रणिपात घालतों, मजवर दया करा व इतके उग्ररूपी आपण कोण आहांत तें मला सांगा. ३७८

।। श्रीभगवानुवाच ।।

कालोऽस्मि लोकक्षयकृत्प्रवृद्धो लोकान्समाहर्तुमिह प्रवृत्तः ।
ऋतेऽपि त्वां न भविष्यंति सर्वे येऽवस्थिताः प्रत्यनीकेषु योधाः ।।
११-३२ । ३७९

तस्मात्त्वमुत्तिष्ठ यशो लभस्व जित्वा शत्रून्भुंक्ष्व राज्यं समृद्धम् ।
मयैवैते निहताः पूर्वमेव निमित्तमात्रं भव सव्यसाचिन् ।।
११-३३ । ३८०

द्रोणं च भीष्मं च जयद्रथं च कर्णं तथान्यानपि योधवीरान् ।
मया हतांस्त्वं जहि मा व्यथिष्ठा युद्धयस्व जेताऽसि रणे सपत्नान् ।।
११-३४ । ३८१

विश्वरूपी भगवान् उत्तर करतात, अरे अर्जुना, हा बघ मी प्रत्यक्ष सर्वभक्षक काल! आणि रणभूमीवर असलेल्या तुझ्या सर्व शत्रूंचा संहार करण्याकरतां येथें प्रकट झालों आहें!! अरे, तूं लढणार नसलास तरी या सर्वांचा मी हा फडाशा उडवितों पहा!!! तुला हवें असेल तर केवळ निमित्ताकरतां लढ आणि शत्रूचा निःपात करून लौकिक, यश व राज्य हीं मिळीव. तुला जय मिळण्यांत आतां काय बाकी राहिली आहे? ३७९-३८१

॥ संजय उवाच ॥

एतच्छ्रुत्वा वचनं केशवस्य कृतांजलिर्वेपमानः किरीटी।
नमस्कृत्वा भूय एवाह कृष्णं सगद्गदं भीतभीतः प्रणम्य ॥
११-३५ । ३८२

॥ अर्जुन उवाच ॥

स्थाने हृषीकेश तव प्रकीर्त्या जगत्प्रहृष्यत्यनुरज्यते च ।
रक्षांसि भीतानि दिशो द्रवंति सर्वे नमस्यंति च सिद्धसंघाः ॥
११-३६ । ३८३

अर्जुन अनेकावर प्रणिपात करून भीत भीत म्हणतो—खरेंच, भगवन्, आपणांला पाहून सज्जन आनंदित होतात व दुर्जन भयभीत होतात तें योग्यच आहे. ३८२–३८३

कस्माच्च ते न नमेरन्महात्मन् गरीयसे ब्रह्मणोऽप्यादिकर्त्रे ।
अनंत देवेश जगन्निवास त्वमक्षरं सदसत्तत्परं यत्॥ ११-३७ । ३८४
त्वमादिदेवः पुरुषः पुराणस्त्वमस्य विश्वस्य परं निधानम् ।
वेत्ताऽसि वेद्यं च परं च धाम त्वया ततं विश्वमनंतरूप।
११-३८। ३८५

पितासि लोकस्य चराचरस्य त्वमस्य पूज्यश्च गुरुर्गरीयान् ॥
न त्वत्समोऽस्त्यभ्यधिकः कुतोऽन्यो लोकत्रयेऽप्यप्रतिमप्रभावः ॥
११-४३ । ३८६

आपण फार थोर, फार अनादि, फार श्रेष्ठ. आपल्या तोंडीचाहि कोणी नाहीं; मग वरचढ तर कोण असणार? ३८४–३८६

वायुर्यमोऽग्निर्वरुणः शशांकः प्रजापतिस्त्वं प्रपितामहश्च ।
नमो नमस्तेऽस्तु सहस्रकृत्वः पुनश्च भूयोऽपि नमोनमस्ते ॥
११-३९। ३८७

नमः पुरस्तादथ पृष्ठतस्ते नमोऽस्तु ते सर्वत एव सर्व ।
अनंतवीर्यामितविक्रमस्त्वं सर्वं समाप्नोषि ततोऽसि सर्वः ॥

११-४० । ३८८

सर्व देवांचे देव आपणच. मी आपणांला वारंवार अनेक प्रणिपात करतों. ३८७–३८८

सखेति मत्वा प्रसभं यदुक्तं हे कृष्ण हे यादव हे सखेति ।
अजानता महिमानं तवेदं मया प्रमादात्प्रणयेन वापि ॥

११-४१ । ३८९

यच्चावहासार्थमसत्कृतोऽसि विहारशय्यासनभोजनेषु ।
एकोऽथवाप्यच्युत तत्समक्षं तत्क्षामये त्वामहमप्रमेयम् ॥

११-४२ । ३९०

तस्मात्प्रणम्य प्रणिधाय कायं प्रसादये त्वामहमीशमीड्यम् ।
पितेव पुत्रस्य सखेव सख्युः प्रियः प्रियायार्हसि देव सोढुम् ॥

११-४४ । ३९१

आजवर मी आपला प्रभाव न जाणून एकेरी हांका वगैरे मारिल्या असतील त्याबद्दल, हे भगवन्, मला आपल्या मुलाप्रमाणें मानून, दयाळूपणानें क्षमा करा; मी आपणांपुढें साष्टांग प्रणिपात घालतों. ३८९–३९१

अदृष्टपूर्वं हृषितोऽस्मि दृष्ट्वा भयेन च प्रव्यथितं मनो मे ।
तदेव मे दर्शय देव रूपं प्रसीद देवेश जगन्निवास ॥ ११-४५ । ३९२

आजवर कधींच पाहिलें नाहीं, असें आपलें अद्भुत व भयानक रूप पाहून मला आनंद झाला आहे; पण मी फार भ्यालोंहि आहें. ३९२

किरीटिनं गदिनं चक्रहस्तमिच्छामि त्वां द्रष्टुमहं तथैव ।
तेनैव रूपेण चतुर्भुजेन सहस्रबाहो भव विश्वमूर्ते ॥

११-४६ । ३९३

सबब, भगवन्, हें आपलें विश्वरूप विसर्जन करून माझ्या नेहमींच्या परिचयाचें शंखचक्रगदाधारी चतुर्भुज रूप आपण धारण कराच. ३९३

॥ श्रीभगवानुवाच ॥

मया प्रसन्नेन तवार्जुनेदं रूपं परं दर्शितमात्मयोगात् ।
तेजोमयं विश्वमनंतमाद्यं यन्मे त्वदन्येन न दृष्टपूर्वम् ॥ ११-४७ । ३९४

न वेदयज्ञाध्ययनैर्न दानैर्न च क्रियाभिर्न तपोभिरुग्रैः ।
एवंरूपः शक्य अहं नृलोके द्रष्टुं त्वदन्येन कुरुप्रवीर ॥
११-४८ । ३९५

मा ते व्यथा मा च विमूढभावो दृष्ट्वा रूपं घोरमीदृङ्ममेदम् ।
व्यपेतभीः प्रीतमनाः पुनस्त्वं तदेव मे रूपमिदं प्रपश्य ॥
११-४९ । ३९६

॥ संजय उवाच ॥

इत्यर्जुनं वासुदेवस्तथोक्त्वा स्वकं रूपं दर्शयामास भूयः ।
आश्वासयामास च भीतमेनं भूत्वा पुनः सौम्यवपुर्महात्मा ॥
११-५० । ३९७

श्रीभगवान्, यावर, विश्वरूप विसर्जन करून व मानव देहधारी बनून म्हणतात—अर्जुना, मी सहसा जें कधीं कोणाला दाखवीत नाहीं तें माझें विश्वरूप तुझ्या विनंतीवरून मी तुला दाखविलें. पण आतां घाबरू नकोस. हा मी नेहमींच्या रूपानें तुझ्या पुढें उभा आहें. ३९४–३९७

॥ अर्जुन उवाच ॥

दृष्ट्वेदं मानुषं रूपं तव सौम्यं जनार्दन ।
इदानीमस्मि संवृत्तः सचेताः प्रकृतिं गतः ॥ ११-५१ । ३९८

अर्जुन उसासा टाकून म्हणतो—भगवन्, आत्तां कोठें माझ्या जिवांत जीव आला व मी सावरलों. ३९८

॥ श्रीभगवानुवाच ॥

सुदुर्दर्शमिदं रूपं दृष्टवानसि यन्मम ।
देवा अप्यस्य रूपस्य नित्यं दर्शनकांक्षिणः ॥ ११-५२ । ३९९

नाहं वेदैर्न तपसा न दानेन न चेज्यया ।
शक्य एवंविधो द्रष्टुं दृष्टवानसि मां यथा ॥ ११-५३ । ४००

श्रीभगवान् पुढें म्हणतात--अरे अर्जुना, इतका भ्यालास! अरे, हें माझें रूप पाहण्याची देवादिक देखील इच्छा करतात व महाप्रयत्नानेंसुद्धां तें पाहण्याचें त्यांचें भाग्य नसतें. ३९९-४००

भक्त्या त्वनन्यया शक्य अहमेवंविधोऽर्जुन ।
ज्ञातुं द्रष्टुं च तत्त्वेन प्रवेष्टुं च परंतप ॥ ११-५४ । ४०१

अनन्य भक्तीच्या जोरावरच मी या प्रकारें दिसणें व त्यायोगानेंच मला ओळखणें व मजशीं ऐक्य पावणें शक्य आहे. ४०१

मत्कर्मकृन्मत्परमो मद्भक्तः संगवर्जितः ।
निर्वैरः सर्वभूतेषु यः स मामेति पांडव ॥ ११-५५ । ४०२

जो माझा भक्त मी सांगतों त्याप्रमाणें वागतो, जो निःसंग वृत्तीनें कोणाशींहि वैर न करतां वागतो तोच मला येऊन मिळतो. ४०२

हरिः ॐतत्सत्

इति रचनान्तरीकृतश्रीमद्भगवद्गीतासूपनिषत्सु० विश्वरूपदर्शनयोगो नाम नवमोऽध्यायः ॥ ९ ॥

---

## दशमाध्याय

# भक्तियोग

यापूर्वीच्या तीन अध्यायांत विश्वांतील अधिदैवभाव अगर ईश्वर म्हणजे काय याचें विस्तृत विवेचन आलें असून हा ईश्वर भक्तांशीं कसा वागतो हें तेथें स्पष्ट केलें आहे. या प्रस्तुतच्या अध्यायांत, अन्य पक्षीं, मनुष्यानें ईश्वराशीं कसें वागावयाचें याचें विवेचन केलें आहे. सुरुवातीस पूर्वविवरणांतील ब्रह्म किंवा आत्मा या अव्यक्तभावाची उपासना करणें श्रेष्ठ कीं व्यक्तरूप ईश्वराची ( हा विशिष्टाकारच्या मूर्तीच्या रूपाचाच असला पाहिजे असें नाहीं, )

उपासना करणें श्रेष्ठ असा प्रश्न अर्जुनानें उपस्थित केला असून त्या प्रश्नाचें उत्तर देतांना भगवंतानीं सांगितलें आहे कीं, हा प्रश्न श्रेष्ठाश्रेष्ठतेचा म्हणतां येत नसून तो भक्ताच्या सोयीगैरसोयींचा आहे; सोयीच्या दृष्टीनें अव्यक्त–निर्गुण–ब्रह्मोपासनेपेक्षां सगुण–ईश्वरोपासनाच जास्त ग्राह्य होय. त्यांतहि भजकांच्या क्षमतेचे तरतमभाव लक्षांत घेऊन किमान पक्षीं काय केलें असतांहि भक्तीचें पूर्ण श्रेय पदरांत पडेल तेंहि क्रमाक्रमानें सांगितलें आहे; आणि शेवटीं भक्तानें स्वतःमध्यें संग्रह करण्याच्या लक्षणांची यादी देऊन हा अध्याय संपविला आहे.

---

॥ अर्जुन उवाच ॥

एवं सततयुक्ता ये भक्तास्त्वां पर्युपासते ।
ये चाप्यक्षरमव्यक्तं तेषां के योगवित्तमाः ॥ १२-१ । ४०३

अर्जुन विचारतो––भगवन्, निर्गुणोपासना व सगुणोपासना यांपैकीं श्रेष्ठ उपासना कोणती हें मला सांगा. ४०३

॥ श्रीभगवानुवाच ॥

मय्यावेश्य मनो ये मां नित्ययुक्ता उपासते ।
श्रद्धया परयोपेतास्ते मे युक्ततमा मताः ॥ १२-२ । ४०४

श्रीभगवान् सांगतात––अर्जुना, सगुण ईश्वराची उपसना हीच जास्त सोयीस्कर होय. ४०४

ये त्वक्षरमनिर्देश्यमव्यक्तं पर्युपासते ।
सर्वत्रगमचिंत्यं च कूटस्थमचलं ध्रुवम् ॥ १२-३ । ४०५
संनियम्योंद्रियग्रामं सर्वत्र समबुद्धयः ।
ते प्राप्नुवंति मामेव सर्वभूतहिते रताः ॥ १२-४ । ४०६
क्लेशोऽधिकतरस्तेषामव्यक्तासक्तचेतसाम् ।
अव्यक्ता हि गतिर्दुःखं देहवद्भिरवाप्यते ॥ १२-५ । ४०७

ये तु सर्वाणि कर्माणि मयि संन्यस्य मत्पराः ।
अनन्येनैव योगेन मां ध्यायंत उपासते ॥ १२-६ । ४०८
तेषामहं समुद्धर्ता मृत्युसंसारसागरात् ।
भवामि न चिरात्पार्थ मय्यावेशितचेतसाम् ॥ १२-७ । ४०९

निर्गुणोपासकहि मलाच येऊन मिळतो.

परंतु निगुर्णोपासना कष्टसाध्य आहे; अन्यपक्षीं जे अनन्य भावानें माझ्या सगुण रूपाची उपासना करतात त्यांच्या त्या उपासनेनें माझा सगुण भाव त्यांच्याकरतां आविर्भूत होऊन त्या भावानें युक्त असलेला मी त्यांचा सहज व लवकर उद्धार करतों.[1] ४०५–४०९

मय्येव मन आधत्स्व मयि बुद्धिं निवेशय ।
निवसिष्यसि मय्येव अत ऊर्ध्वं न संशयः ॥ १२-८ । ४१०

सबब, अर्जुना, तुझी बुद्धि, तुझें मन, हें माझ्या सगुण रूपाच्या ठिकाणीं स्थिर कर, म्हणजे तूं मला सहज येऊन मिळशील यांत कांहीं शंका नाहीं. ४१०

अथ चित्तं समाधातुं न शक्नोषि मयि स्थिरम् ।
अभ्यासयोगेन ततो मामिच्छाप्तुं धनंजय ॥ १२-९ । ४११

आतां, कदाचित् तुझें मन माझ्या ठिकाणीं एकदम स्थिर होणार नाहीं. पण त्याकरतां तूं थोडा सतत प्रयत्न केला पाहिजेस. ४११

अभ्यासेऽप्यसमर्थोऽसि मत्कर्मपरमो भव ।
मदर्थमपि कर्माणि कुर्वन्सिद्धिमवाप्स्यसि ॥ १२-१० । ४१२

जर कदाचित् हा सततोद्योग करणें तुला शक्य नसलें तर तूं जें जें करीत असशील तें तें माझ्याकरतां माझ्या सांगण्यावरून, माझ्या तर्फे, करीत आहेस या भावनेनें कर, म्हणजेहि तूं सिद्धिप्रत पावशील. ४१२

---

१. एखाद्याच्या मदतीची अपेक्षा असतांना हे मनुष्या! हे प्राण्या! हे देहधारी आत्म्या! अशा प्रकारें संबोधण्याऐवजीं, ए गड्या! ए दादा! अहो बाबा! अशा प्रकारें संबोधण्यानें मदत लवकर मिळण्याच्या व्यवहारासिद्ध पद्धतीचाच येथें अवलंब केला आहे हें दिसून येईल.

अथैतदप्यशक्तोऽसि कर्तुं मद्योगमाश्रितः ।
सर्वकर्मफलत्यागं ततः कुरु यतात्मवान् ॥ १२-११ । ४१३

आणि अखेर हेंहि तुला अशक्य असेल तर निदानपक्षीं तूं जीं जीं कर्मे करीत असशील त्यांचें फल तुलाच मिळालें पाहिजे ही फलाशा सोड म्हणजे झालें. ४१३

ध्यानेनात्मनि पश्यंति केचिदात्मानमात्मना ।
अन्ये सांख्येन योगेन कर्मयोगेन चापरे ॥ १३-२४ । ४१४
अन्ये त्वेवमजानंतः श्रुत्वान्येभ्य उपासते ।
तेऽपि चातितरंत्येव मृत्युं श्रुतिपरायणाः ॥ १३-२५ । ४१५

अर्जुना, कोणी पातंजल योगांत सांगितलेल्या ध्यानाच्या पद्धतीनें स्वतःच्या ठिकाणींच आत्म्याला पाहून, आत्मसाधन करतात, तर कोणी सांख्यपद्धतीनें देहापेक्षां आत्मा वेगळा मानून ज्ञानद्वारां त्याचें साधन करतात. कोणी ईश्वरार्पणबुद्धीनें कर्मे करून मुक्त होऊं पहातात, तर कोणी समजावून घेण्याच्या भानगडींत न पडतां, केवळ गुरूपदेशानुरूप ईश्वरोपासना करतात. परंतु हें कसेंहि असलें तरी मोक्ष या सर्वांनाहि मिळतो. ४१४–४१५

श्रेयो हि ज्ञानमभ्यासाज्ज्ञानाद्ध्यानं विशिष्यते ।
ध्यानात्कर्मफलत्यागस्त्यागाच्छांतिरनंतरम् ॥ १२-१२ । ४१६

आतां ही गोष्ट खरी कीं, केवळ योगाभ्यास करीत असण्यापेक्षां ज्ञानयुक्त अवस्था ही श्रेष्ठ होय. त्यानंतर ज्ञानी असूनहि जो ध्यानी म्हणजे भक्त असेल तो त्याहिपेक्षां श्रेष्ठ होय. आणि जो ज्ञानी व भक्त असूनहि निष्काम-कर्मयोगाचें आचरण करीत असेल तो सर्वश्रेष्ठ व सर्वसंपूर्ण होय[1], व

---

१. या श्लोकावर टीका करतांना श्रीमदाचार्य लिहितात–"ज्ञानात् ज्ञानपूर्वकं ध्यानं विशिष्यते। ज्ञानवतो ध्यानादपि कर्मफलत्यागः विशिष्यते॥" या दोन वाक्यांपैकीं पहिल्या वाक्याला अनुसरून दुसऱ्या वाक्यांत "ज्ञानपूर्वकः ध्यानयुक्तः कर्मफलत्यागः" हा पदसमुच्चय उद्दिष्ट असावासें दिसतें. कारण पुढें लगेंच "एवं पूर्वोक्तविशेषणवतः कर्मफलत्यागात्" असा शब्दप्रयोग आढळतो.

अशा पूर्ण मनुष्याला मोक्ष हा कालांतरसाध्य नसून तो सर्वकाल सिद्ध असतो. तो मुक्तच होय. ४१६

अर्जुना, अशा प्रकारच्या व मला अत्यंत प्रिय असणाऱ्या भक्तांचीं लक्षणें थोडक्यांत हीं होतः—

अद्वेष्टा सर्वभूतानां मैत्रः करुण एव च ।
निर्ममो निरहंकारः समदुःखसुखः क्षमी ॥ १२-१३ । ४१७
संतुष्टः सततं योगी यतात्मा दृढनिश्चयः ।
मय्यर्पितमनोबुद्धिर्यो मे भक्तः स मे प्रियः ॥ १२-१४ । ४१८
यस्मान्नोद्विजते लोको लोकान्नोद्विजते च यः ।
हर्षामर्षभयोद्वेगैर्मुक्तो यः स च मे प्रियः ॥ १२-१५ । ४१९
अनपेक्षः शुचिर्दक्ष उदासीनो गतव्यथः ।
सर्वारंभपरित्यागी यो मद्भक्तः स मे प्रियः ॥ १२-१६ । ४२०
यो न हृष्यति न द्वेष्टि न शोचति न कांक्षति ।
शुभाशुभपरित्यागी भक्तिमान्यः स मे प्रियः ॥ १२-१७ । ४२१
समः शत्रौ च मित्रे च तथा मानापमानयोः ।
शीतोष्णसुखदुःखेषु समः संगविवर्जितः ॥ १२-१८ । ४२२
तुल्यनिंदास्तुतिर्मौनी संतुष्टो येनकेनचित् ।
अनिकेतः स्थिरमतिर्भक्तिमान्मे प्रियो नरः ॥ १२-१९ । ४२३
योगिनामपि सर्वेषां मद्गतेनांतरात्मना ।
श्रद्धावान्भजते यो मां स मे युक्ततमो मतः ॥ ६-४७ । ४२४

द्वेषहीनता, मैत्री, कारुण्य, निर्ममत्व, निरहंकारत्व, क्षमा, सततयोगाचरण, आत्मनिग्रह, दृढनिश्चय, ईश्वरनिष्ठा, लोकप्रियता, हर्ष-क्रोध-शोक-भय-उद्वेग-हीनता, निरपेक्षत्व, शुचित्व, दक्षत्व, काम्यकर्मारंभत्याग, शुभाशुभौदासिन्य; शत्रुमित्र-शीतोष्ण-मानापमान-सुखदुःख-निंदास्तुति, यांबद्दल समभावना, मौन, संतुष्टता, स्थिर बुद्धित्व व भक्तिमत्व हीं तीं लक्षणें होत. ४१७-४२४

ये तु धर्म्यामृतमिदं यथोक्तं पर्युपासते ।
श्रद्दधाना मत्परमा भक्तास्तेऽतीव मे प्रियाः ॥ १२-२० । ४२५

येणेंप्रकारें तुला सांगितलेल्या अमृततुल्य भक्तिधर्माचें जे यथायोग्य आचरण करतात ते भक्त तर मला अत्यंत प्रिय होत. ४२५

हरिः ॐ तत्सत्

इति रचनान्तरीकृतश्रीमद्भगवद्गीतासूपनिषत्सु० भक्तियोगो नाम दशमोऽध्यायः ॥ १० ॥

---

## एकादशाध्याय

## विज्ञानयोग

यापूर्वीच्या चार अध्यायांत विश्वाच्या आधिदैविक घटनेचा व तदनुषंगिक व्यक्तिकार्यांचा विचार झाला. यानंतरच्या या अध्यायापासून श्रीभगवान् प्रतिपाद्यविषय अधिदैवघटनेपुढच्या म्हणजे अधिभौतिक घटनेच्या क्षेत्रांत नेण्यास सुरुवात करीत आहेत. या अध्यायाचें योगनाम "विज्ञानयोग" असें असून यांत मूळच्या ब्रह्मशक्तीपासून अधिभौतिक विश्वोत्पत्ति कशी झाली याचें अल्प विवेचन आलेलें आहे; आणि विशेषतः या जड जगाचें व्यापन आणि नियमन त्यापेक्षां एक वरिष्ठ शक्ति करीत असल्याचें स्पष्टपणें या अध्यायांतहि नमूद केलेलें आहे.

---

॥ श्रीभगवानुवाच ॥

मय्यासक्तमनाः पार्थ योगं युंजन्मदाश्रयः ।
असंशयं समग्रं मां यथा ज्ञास्यासि तच्छृणु ॥ ७-१ । ४२६

ज्ञानं तेऽहं सविज्ञानमिदं वक्ष्याम्यशेषतः ।
यज्ज्ञात्वा नेह भूयोऽन्यज्ज्ञातव्यमवशिष्यते ॥ ७-२ । ४२७

श्रीभगवान् पुढें सांगतात—अर्जुना, माझी भक्ति करीत असतां तुला माझें ज्ञान ज्या प्रकारचें होणें शक्य आहे त्याचा थोडा तपशील तुला सांगतों.

हें ज्ञान केवळ तात्त्विकच नाहीं तर त्यांत शास्त्रीय ज्ञानाचाहि अन्तर्भाव होतो व त्यामुळेंच त्याला पूर्णता येते. ४२६-४२७

ऋषिभिर्बहुधा गीतं छंदोभिर्विविधैः पृथक् ।
ब्रह्मसूत्रपदैश्चैव हेतुमद्भिर्विनिश्चितैः ॥ १३-४ । ४२८

हा विषय अनेक ऋषींनीं, त्याचें विवेचन तर्कशुद्ध करण्याकरतां हेतुपुरःसर वेंचक पदें वापरून, ब्रह्मसूत्रांच्या रूपांत, निरनिराळ्या छंदांत गायिलेला आहे. ४२८

इदं शरीरं कौंतेय क्षेत्रमित्यभिधीयते ।
एतद्यो वेत्ति तं प्राहुः क्षेत्रज्ञ इति तद्विदः ॥ १३-१ । ४२९

या देहाला क्षेत्र हें नांव आहे; आणि जो याचा ज्ञाता अगर मालक आहे त्या नाना वैयक्तिक देहांमधून आविर्भूत होणाऱ्या एकाच आत्म्याला क्षेत्रज्ञ हें नांव आहे. ४२९

तत्क्षेत्रं यच्च यादृक् च तद्विकारि यतश्च यत् ।
स च यो यत्प्रभावश्च तत्समासेन मे शृणु ॥ १३-३ । ४३०

हा क्षेत्रज्ञ म्हणजे कोण ? त्याचा प्रभाव काय ? तसेंच क्षेत्र म्हणजे काय ? तें कशा प्रकारचें आहे ? त्याचे विकार कोणते ? तें कशापासून होतें ? हें विज्ञानयुक्त ज्ञान मी तुला सांगतों. ४३०

सर्वभूतानि कौंतेय प्रकृतिं यांति मामिकाम् ।
कल्पक्षये पुनस्तानि कल्पादौ विसृजाम्यहम् ॥ ९-७ । ४३१

प्रथम क्षेत्राचा विचार घेऊं. अर्जुना, कल्पारंभीं हें विश्व मीच माझ्यामधून उत्पन्न केलेल्या माझ्या प्रकृतीचा साधन या दृष्टीनें उपयोग करून उत्पन्न करतों. ४३१

दैवी ह्येषा गुणमयी मम माया दुरत्यया ।
मामेव ये प्रपद्यंते मायामेतां तरंति ते ॥ ७-१४ । ४३२

ही माझी प्रकृति उद्भवदृष्ट्या दैवी म्हणजे माझ्यापासून उत्पन्न झालेली आहे आणि ती स्वतः पुढें त्रिगुणात्मक बनूं शकते. माझ्या मूळच्या अव्यक्त

अवस्थेमधून व्यक्त, त्रिगुणयुक्त, जड, प्राकृतिक अवस्थेप्रत माझ्या येण्याचा जो हा प्रकार त्याला माया म्हणतात. हें या मायेचें स्वरूप समजण्यास कठिण आहे. ज्याला या केवळ मायामय विश्वांतच गुरफटून जावयाचें नसेल त्यानें माझा आश्रय केला पाहिजे. केवळ मायामय जगाच्या ज्ञानानें त्याला संपूर्ण ज्ञान व माझें ज्ञान होईल असा संभवच नाहीं. ४३२

ये चैव सात्त्विका भावा राजसास्तामसाश्च ये ।
मत्त एवेति तान्विद्धि न त्वहं तेषु ते मयि ॥ ७-१२ । ४३३
त्रिभिर्गुणमयैर्भावैरेभिः सर्वमिदं जगत् ।
मोहितं नाभिजानाति मामेभ्यः परमव्ययम् ॥ ७-१३ । ४३४

ही माया सत्त्व, रज व तम अशा तीन गुणांचा स्वतःमध्यें क्षोभ अगर आविर्भाव करूं शकते. परंतु या क्षोभाचें कारण मात्र मीच. या त्रिगुणात्मक आविर्भावाचें व्यापन व नियमन मीच करतों. माझें व्यापन अगर नियमन ही त्रिगुणात्मक माया करूं शकत नाहीं. अर्जुना, हें सर्व विश्व या तीन गुणांमुळें उद्भवणाऱ्यांना चित्रविचित्र दृश्यांनीं माहित होऊन गेल्यामुळें त्यांना व्यापून असलेल्या उच्च अशा माझ्या रूपाकडे त्यांची दृष्टिच जात नाहीं. ४३३-४३४

मत्तः परतरं नान्यत्किंचिदस्ति धनंजय ।
मयि सर्वमिदं प्रोतं सूत्रे मणिगणा इव ॥ ७-७ । ४३५

परंतु वस्तुस्थिति अशी आहे कीं, या अखिल विश्वांत तत्त्वतः माझ्याशिवाय अन्य कांहीं नाहीं. सर्व कांहीं मीच आहें. आणि मणिमालेंतील दोरा ज्याप्रमाणें मण्यांनीं[1] व्यापिलेला असतो, त्याप्रमाणें मीं हें विश्व व्यापिलेलें आहे. ४३५

---

१. या ठिकाणचा हा दृष्टान्त एकाकी आणि दिसतो तसाच घेतल्यास गैरसमज उत्पन्न होण्याचा संभव आहे. वरिष्ठ सत्ता ही कनिष्ठ सत्तेला अन्तर्बाह्य व्यापून असल्याचें तत्त्व गीतेंत अनेक ठिकाणीं प्रतिपादिलेलें आहे व त्याच अर्थानें हा मणिसूत्राचा दृष्टान्त घेतला पाहिजे. ईश्वर फक्त सूत्रात्मक मानल्यानें त्याच्या ठिकाणीं फारतर कांहींसें धारकत्व येतें, पण अन्तर्बाह्यव्यापकत्व येत नाहीं. पण अन्तर्बाह्य व्यापकत्व

रसोऽहमप्सु कौंतेय प्रभास्मि शशिसूर्ययोः ।
प्रणवः सर्ववेदेषु शब्दः खे पौरुषं नृषु ॥ ७-८ । ४३६
पुण्यो गंधः पृथिव्यां च तेजश्चास्मि विभावसौ ।
जीवनं सर्वभूतेषु तपश्चास्मि तपस्विषु ॥ ७-९ । ४३७

हें माझें व्यापकत्व दृष्टान्तांनीं स्पष्ट करावयाचें तर असें म्हणतां येईल कीं, पाण्यामध्यें ज्याप्रमाणें रस त्याप्रमाणें मी विश्वांत भरलों आहें. अग्नि, चंद्र, सूर्यादि तेजोगोलांचें जें प्रकाशमत्व[२] तो माझाच भाव होय. वेदांतील ॐकाराप्रमाणें, आकाशांतील शब्दगुणाप्रमाणें, पुरुषांतील वीर्याप्रमाणें, पृथ्वीच्या अंगच्या वासाप्रमाणें, भूतांतील जीवनशक्तीप्रमाणें आणि तपस्व्यांमधील तपःसामर्थ्याप्रमाणें मी सर्व विश्वांत भरून राहिलों आहें. ४३६-४३७

बीजं मां सर्वभूतानां विद्धि पार्थ सनातनम् ।
बुद्धिर्बुद्धिमतामस्मि तेजस्तेजस्विनामहम् ॥ ७-१० । ४३८
बलं बलवतामस्मि कामरागविवर्जितम् ।
धर्माविरुद्धो भूतेषु कामोऽस्मि भरतर्षभ ॥ ७-११ । ४३९

बुद्धिमानांत जशी बुद्धि, पराक्रमी वीरांत जसा पराक्रम, शक्तिवानांत जशी शक्ति, जिवंत प्राण्यांत जशी प्रजोत्पादनेच्छा व सर्व प्राण्यांत जसें त्यांचें बीज तसा मी सर्व विश्वांत भरून राहिलों आहें. ४३८-४३९

अव्यक्तं व्यक्तिमापन्नं मन्यंते मामबुद्धयः ।
परं भावमजानंतो ममाव्ययमनुत्तमम् ॥ ७-२४ । ४४०

---

हाच धर्म अत्यंत महत्त्वाचा आहे; आणि जगत् व जगदीश्वर यांच्या परस्परसंबंधाला कोणताहि दृष्टान्त देतांना या धर्माकडे दुर्लक्ष होणें इष्ट नाहीं. या दृष्टीनें प्रस्तुत श्लोकाच्या उत्तरार्धाचें रूपांतर करावयाचें म्हटलें तर तें " मयि सर्वमिदं प्रोतं सूत्रे मणिगणे यथा" असें करतां येईल. तथापि तें व्हावें तितकें समर्पक नाहीं हें उघड आहे.

२. श्रीमद्भगवद्गीतेचे आधुनिक शास्त्रज्ञ वाचक भगवान् श्रीकृष्णाला Electro-Magnetism ही आधुनिक संज्ञा माहीत नसल्याबद्दल त्याच्यावर रुष्ट होणार नाहींत अशी आशा आहे.

खरोखर मी अव्यक्त रूपांत असतांहि अज्ञानी लोक मला फक्त जाड्या-भरडया व्यक्त रूपांतच ओळखतात. त्यांना माझ्या उच्च रूपाची कल्पनाच येत नाहीं. ४४०

नाहं प्रकाशः सर्वस्य योगमायासमावृतः ।
मूढोऽयं नाभिजानाति लोको मामजमव्ययम् ॥ ७-५१ । ४४१

मी आपल्या योगमायेनें आच्छादित असल्यामुळें सर्वांच्या प्रत्ययास येत नाहीं. आणि लौकिक व्यवहारापुरतेंच पाहणारे लोक अज व अव्यय अशा मला ओळखीत देखील नाहींत. ४४१

वेदाहं समतीतानि वर्तमानानि चार्जुन ।
भविष्याणि च भूतानि मां तु वेद न कश्चन ॥ ७-२५ । ४४२

अर्जुना, मी भूत, भविष्य, वर्तमान हें सर्व जाणणारा म्हणजे त्रिकालातीत आहें, पण मला मात्र कोणी पूर्णपणें जाणूं शकत नाहीं. ४४२

इच्छाद्वेषसमुत्थेन द्वंद्वमोहेन भारत ।
सर्वभूतानि संमोहं सर्गे यांति परंतप ॥ ७-२७ । ४४३
येषां त्वंतगतं पापं जनानां पुण्यकर्मणाम् ।
ते द्वंद्वमोहनिर्मुक्ता भजंते मां दृढव्रताः ॥ ७-२८ । ४४४

कारण प्रत्येकजण आपल्या आवडीनावडींप्रमाणें सुख प्राप्त करून घेण्याच्या व दुःख टाळण्याच्या नादांत गुंग झालेला आहे व याप्रमाणें विश्वाचें रहाटगाडगें चाललेंच आहे. फक्त ज्या पुण्यवंतांचें पाप क्षयाला गेलें असतें तेच या सुखदुःखद्वंद्वांतून सुटतात व मला भजूं लागतात. ४४३-४४

जरामरणमोक्षाय मामाश्रित्य यतंति ये ।
ते ब्रह्म तद्विदुः कृत्स्नमध्यात्मं कर्म चाखिलम् ॥ ७-२९ । ४४५
साधिभूताधिदैवं मां साधियज्ञं च ये विदुः ।
प्रणायकालेऽपि च मां ते विदुर्युक्तचेतसः ॥ ७-३० । ४४६

अशा प्रकारें जरामृत्यूच्या दुःखांतून आपण सुटावें असें ज्यांना वाटतें ते मात्र प्रयत्नानें माझी भक्ति करतात व त्यांनाच, ब्रह्म म्हणजे काय? अध्यात्म

म्हणजे काय! अधिदैवत म्हणजे काय? अधिभूत म्हणजे काय? कर्म म्हणजे काय? व यज्ञ म्हणजे काय? हें सर्व पूर्णपणें समजतें. आणि हें सर्व ज्ञान झाल्यानंतरच ते योग्य प्रकारें वागतात आणि मग त्यांना अन्तःकालीं माझें स्मरण होऊन ते मोक्षाला जातात. ४४५-४४६

हरिः ॐ तत्सत्

इति रचनान्तरीकृतश्रीमद्भगवद्गीसूपनिषत्सु० विज्ञानयोगो नाम एकादशोऽध्यायः ॥ ११ ॥

---

## द्वादशाध्याय

# अधिभूतयोग

यापूर्वीच्या विज्ञानयोग नामक अध्यायांत अक्षर व क्षेत्रज्ञ जो आत्मा त्याचा विश्वांतील क्षरभावाचा उत्पन्नकर्ता व क्षेत्राचा ज्ञाता या दृष्टीनें विचार झाला. त्यानंतरच्या या अध्यायांत विश्वांतील क्षरभाव म्हणजे जी प्रकृति व तिचा त्रिगुणात्मक पसारा किंवा ब्रह्मांड त्याचप्रमाणें त्याच नमुन्याचें क्षेत्र म्हणजे पिंडघटना अगर देह यांचा विचार प्रामुख्यानें आलेला आहे. प्रकृत्युद्भव त्रिगुणांचें सामान्य लक्षणहि या अध्यायांत आलें असून या त्रिगुणांच्या न्यूनाधिक्यानें शरीरांत नाना भाव कसे उत्पन्न होतात तें दाखविलें आहे. शेवटीं देहभावावर असतांना उत्पन्न होणारीं नाना दुःखें हीं खरोखर त्रिगुणांचींच कार्यें होत हें स्पष्ट केलें असून अर्जुनाच्या विनंतीवरून या त्रिगुणांच्या तडाक्यांतून सुटून पार जाण्याकरितां अगर त्रिगुणातीत होण्याकरतां कोणतीं लक्षणें प्रत्येकानें संग्रहीं ठेवलीं पाहिजेत, त्याची यादी देऊन हा अध्याय पुरा केला आहे.

---

॥ श्रीभगवानुवाच ॥

परं भूयः प्रवक्ष्यामि ज्ञानानां ज्ञानमुत्तमम् ।
यज्ज्ञात्वा मुनयः सर्वे परां सिद्धिमितो गताः ॥ १४-१ । ४४७

श्रीभगवान् पुढें बोलतात—अर्जुना, पुन्हां तुला ज्या ज्ञानाच्या योगानें

सर्व मुनी उच्च व चिरस्थायी सिद्धि मिळवते झाले आहेत तें उत्तम ज्ञान सांगतों. ४४७

इदं ज्ञानमुपाश्रित्य मम साधर्म्यमागताः ।
सर्गेऽपि नोपजायंते प्रलये न व्यथंति च ।। १४-२ । ४४८

उर्ध्वमूलमधःशाखमश्वत्थं प्राहुरव्ययम् ।
छंदांसि यस्य पर्णानि यस्तं वेद स वेदवित् ।। १५-१ । ४४९

या दृश्य विश्वाला एका विचित्ररूप वडाच्या झाडाची उपमा दिली जाते. म्हणजे याचीं मुळें वर व डाहळ्या खालीं आहेत असें म्हणतात. हा अक्षय टिकाऊ आहे व वेद हे याच्या पानांच्या ठिकाणीं आहेत. ४४८-४४९

अधश्चोर्ध्वं प्रसृतास्तस्य शाखा गुणप्रवृद्धा विषयप्रवालाः ।
अधश्च मूलान्यनुसंततानि कर्मानुबंधीनि मनुष्यलोके ।।
१५-२ । ४५०

याच्या फांद्या खालीं, त्याचप्रमाणें वरहि पसरल्या आहेत आणि याला विषयांचे अंकुर फुटलेले आहेत. शिवाय याच्या कांहीं मुळ्या थेट खालीं कर्मलोकापर्यंत पोहोंचल्या आहेत.[1] ४५०

---

१. या तुलनेचीं कांहीं अंगें पुढें दिल्याप्रमाणें स्पष्ट करितां येतीलः—खालच्या अदृश्य पण पोषक व धारक मुळ्या म्हणजे ब्रह्म, वरच्या खालच्या दृश्य त्रिगुणयुक्त फांद्या म्हणजे जड सृष्टि, व वेदांतील ऋचांनीं ब्रह्माण्डवृक्षाची शोभा वर्णिली असल्यामुळें ते या वडवृक्षाच्या पानाच्या ठिकाणीं होत. याचा विस्तार पृथ्वीच्या आंत, वर पाण्यांत, व आकाशांतहि, त्याच्या खालीं व वर पसरणाऱ्या फांद्यांच्या रूपानें दिसतो. शिवाय वडाच्या झाडाप्रमाणें त्याला हवेंतून अन्नशोषण करून घेणारीं व वरून खालीं लोंबणारीं जीं मुळ आहेत तीं म्हणजे या कर्मभूमींत जें कर्म होतें त्यांचीं फळें होत. कर्मभूमींत होणाऱ्या कर्माच्या आधारावर हा वृक्ष अंशतः तरी जगत आहे, ही गोष्ट येथें स्पष्ट केली आहे; आणि एवढ्याचकरितां पुढें यज्ञादि कर्मे करीत राहण्याबद्दल आग्रह धरला आहे. यांतील नमुन्याचें एक वाक्य म्हणजे “ सह यज्ञा प्रजाः सृष्ट्वा ” हें होय. अर्थातच उपमा ही कधींहि परिपूर्ण असत नाहीं हें या ठिकाणीं वाचकांनीं लक्षांत ठेवलें पाहिजे.

न रूपमस्येह तथोपलभ्यते नान्तो न चादिर्न च संप्रतिष्ठा ।
अश्वत्थमेनं सुविरूढमूलमसंगशस्त्रेण दृढेन छित्वा ॥

१५-३ । ४५१

ततः पदं तत्परिमार्गितव्यं यस्मिन्गता न निवर्तन्ति भूयः ।
तमेव चाद्यं पुरुषं प्रपद्ये यतः प्रवृत्तिः प्रसृता पुराणी ॥

१५-४ । ४५२

या अश्वत्थाचें अनाद्यनन्त रूप प्रत्ययास येणें शक्य नाहीं. मात्र जेव्हां याच्या बाह्य देखाव्यानें भुलून न जाण्याचा निश्चय करावा व याच्या विस्ताराच्या जाळ्याचा निसंगपणें उच्छेद करावा त्या वेळसच कोठें, ज्या ठिकाणीं गेलें असतां पुन्हा परत येण्याची भीति नाहीं त्या याच्या मूल स्थानाकडे जाण्याचा रस्ता मिळतो. ४५१-४५२

यानंतर, अर्जुना, हा ब्रह्मांडवट कसा उत्पन्न झाला हें तुला सांगतों.

मम योनिर्महद्ब्रह्म तस्मिन् गर्भं दधाम्यहम् ।
संभवः सर्वभूतानां ततो भवति भारत ॥ १४-३ । ४५३

सर्वयोनिषु कौंतेय मूर्तयः संभवंति याः ।
तासां ब्रह्म महद्योनिरहं बीजप्रदः पिता ॥ १४-४ । ४५४

माझ्या प्राकृतिक आविर्भावाचा जेव्हां मी विकास करूं लागतों तेव्हां हा ब्रह्मांडवट व तदंतर्गत सर्व चराचर भूतें निर्माण होण्याच्या मार्गाला लागतात. ( आतां यानंतर क्षेत्र म्हणजे काय हें तुला सांगतोंः— ) ४५३-४५४

महाभूतान्यहंकारो बुद्धिरव्यक्तमेव च ।
इंद्रियाणि दशैकं च पंच चेंद्रियगोचराः ॥ १३-५ । ४५५

इच्छा द्वेषः सुखं दुःखं संघातश्चेतना धृतिः ।
एतत्क्षेत्रं समासेन सविकारमुदाहृतम् ॥ १३-६ । ४५६

पंचस्थूलमहाभूतें, अहंकार, बुद्धि आणि अव्यक्तप्रकृति, तसेंच दहा सूक्ष्म इंद्रियें, एक मन, पांच इंद्रियांचे पांच शब्दस्पर्शादि विषय, इच्छा, द्वेष, सुख-

दु:ख, संघात, चेतना व धैर्य या एकतीस तत्त्वांच्या समुदायाचें क्षेत्र बनलेलें असतें. ४५५–४५६

सत्त्वं रजस्तम इति गुणाः प्रकृतिसंभवाः ।
निबध्नंति महाबाहो देहे देहिनमव्ययम् ॥ १४-५ । ४५७

सत्त्व, रज आणि तम हे प्रकृतीचे तीन गुण देहव्यापि आत्म्याचा देहांमधून आविर्भाव होण्यास एक प्रकारें अडथळाच करतात. ४५७

तत्र सत्त्वं निर्मलत्वात्प्रकाशकमनामयम् ।
सुखसंगेन बध्नाति ज्ञानसंगेन चानघ ॥ १४-६ । ४५८
रजो रागात्मकं विद्धि तृष्णासंगसमुद्भवम् ।
तन्निबध्नाति कौंतेय कर्मसंगेन देहिनम् ॥ १४-७ । ४५९

सत्त्वगुणाच्या योगानें आत्म्यास सुख व ज्ञान हीं होतात. रजोगुणापासून तृष्णा व आसक्ति यांचा आविर्भाव होतो. ४५८-४५९

तमस्त्वज्ञानजं विद्धि मोहनं सर्वदेहिनाम् ।
प्रमादालस्यनिद्राभिस्तन्निबध्नाति भारत ॥ १४-८ । ४६०

तमोगुणापासून मोह व अज्ञान हे भाव प्रगट होतात. ४६०

सत्त्वात्संजायते ज्ञानं रजसो लोभ एव च ।
प्रमादमोहौ तमसो भवतोऽज्ञानमेव च ॥ १४-१७ । ४६१
सत्त्वं सुखे संजयति रजः कर्मणि भारत ।
ज्ञानमावृत्य तु तमः प्रमादे संजयत्युत ॥ १४-९ । ४६२

सत्त्वगुणामुळें सुखाची, रजोगुणामुळें कर्माची आणि तमोगुणामुळें कर्तव्यस्खलनाची स्थिति येते. ४६१–४६२

कर्मणः सुकृतस्याहुः सात्त्विकं निर्मलं फलम् ।
रजसस्तु फलं दुःखमज्ञानं तमसः फलम् ॥ १४-१६ । ४६३

सात्त्विक कर्माचें फळ सुख, राजस कर्माचें फळ दु:ख व तामस कर्माचें फळ अज्ञान हें होय. ४६३

रजस्तमश्चाभिभूय सत्त्वं भवति भारत।
रजः सत्त्वं तमश्चैव तमः सत्त्वं रजस्तथा ॥ १४-१० । ४६४

या तीन गुणांपैकीं बहुधा कोणत्याना कोणत्या एका गुणाचें प्राबल्य व त्या वेळीं इतर दोन गुणांचा कमजोरपणा असतो. ४६४

सर्वद्वारेषु देहेऽस्मिन्प्रकाश उपजायते।
ज्ञानं यदा तदा विद्याद्विवृद्धं सत्त्वमित्युत ॥ १४-११ । ४६५

सत्त्व गुणाचें वर्चस्व असतांना ज्ञानेंद्रियांना सम्यग्ज्ञान होतें व कर्मेंद्रियें यथोचित व्यापार करतात. ४६५

लोभः प्रवृत्तिरारंभः कर्मणामशमः स्पृहा।
रजस्येतानि जायंते विवृद्धे भरतर्षभ ॥ १४-१२ । ४६६
अप्रकाशोऽप्रवृत्तिश्च प्रमादो मोह एव च।
तमस्येतानि जायंते विवृद्धे कुरुनंदन ॥ १४-१३ । ४६७

रजोगुणाचें प्राबल्य असतांना अनिवार कर्मप्रवृत्ति असते, व तमोगुणाचें प्राबल्य असतांना किंकर्तव्यता, कर्तव्यच्युति इत्यादि प्रकार वाढतात. ४६६–४६७

यदा सत्त्वे प्रवृद्धे तु प्रलयं याति देहभृत्।
तदोत्तमविदां लोकानमलान्प्रतिपद्यते ॥ १४-१४ । ४६८
रजसि प्रलयं गत्वा कर्मसंगिषु जायते।
तथा प्रलीनस्तमसि मूढयोनिषु जायते ॥ १४-१५ । ४६९

सत्त्वगुण बलिष्ठ असतांना मृत्यु आला असतां प्राणी उत्तम कुलांत जन्मास जातो, रजोगुण बलिष्ठ असतांना मृत्यु येईल तर कर्मांत आसक्त असलेल्या लोकांत म्हणजे सामान्य कुलांत जन्म येतो व तमोगुणाचें प्राबल्य असतांना मृत्यु येईल तर अज्ञानी, निरक्षर अगर अशिक्षेय कुलांत जन्म येतो. ४६८–४६९

ऊर्ध्वं गच्छंति सत्त्वस्था मध्ये तिष्ठंति राजसाः।
जघन्यगुणवृत्तिस्था अधो गच्छंति तामसाः ॥ १४-१८ । ४७०

सत्त्वगुणसंपन्न लोकांची उन्नति होते. रजोगुणसंपन्नांची आहे तीच स्थिति राहते व तमोगुणामुळें अवनति होते. ४७०

नान्यं गुणेभ्यः कर्तारं यदा द्रष्टानुपश्यति ।
गुणेभ्यश्च परं वेत्ति मद्भावं सोऽधिगच्छति ॥ १४-१९ । ४७१
गुणानेतानतीत्य त्रीन्देही देहसमुद्भवान् ।
जन्ममृत्युजरादुःखैर्विमुक्तोऽमृतमश्नुते ॥ १४-२० । ४७२

मात्र, हीं सर्व अवस्थांतरें त्रिगुणयुक्त प्रकृतीच्या मर्यादेंतील त्रैगुण्यांमुळें उद्भवणारीं व त्रिगुणात्मक प्रकृतीलाच भोगावीं लागणारीं आहेत व आपणांशीं त्यांचा कसलाच संबंध नाहीं असें जेव्हां द्रष्टा ओळखतो तेव्हां तो माझ्या स्वरूपाला येऊन पोहोंचतो. ४७१-४७२

॥ अर्जुन उवाच ॥

कैर्लिंगैस्त्रीन्गुणानेतानतीतो भवति प्रभो ।
किमाचारः कथं चैतांस्त्रीन्गुणानतिवर्तते ॥ १४-२१ । ४७३

यावर अर्जुन विचारतो--भगवन्, या प्रकारें त्रिगुणात्मक प्रकृतीच्या आटोक्याबाहेर गेलेल्या पुरुषाचीं लक्षणें काय असतात हें मला सांगा. ४७३

॥ श्रीभगवानुवाच ॥

प्रकाशं च प्रवृत्तिं च मोहमेव च पांडव ।
न द्वेष्टि संप्रवृत्तानि न निवृत्तानि कांक्षति ॥ १४-२२ । ४७४
उदासीनवदासीनो गुणैर्यो न विचाल्यते ।
गुणा वर्तंत इत्येव योऽवतिष्ठति नेंगते ॥ १४-२३ । ४७५

सत्त्वरजतम या त्रिगुणांमुळें अनुक्रमें सम्यग्ज्ञान, अविरतकर्मप्रवृत्ति, व कर्तव्यग्लानी या अवस्था प्राप्त झाल्या असल्या तरी जो तटस्थ असतो, विशिष्ट अवस्थेबद्दल आवड अगर द्वेष ज्याच्या मनांत असत नाहीं व हा सारा गुणांचा खळबळाट आहे असें मानून जो वृत्तीनें स्वस्थ असतो तो गुणातीत मनुष्य होय. हें मुख्य लक्षण होय. याच्याच अनुषंगानें असणारीं अन्य लक्षणें म्हणजेः—४७४-४७५

समदुःखसुखः स्वस्थः समलोष्टाश्मकांचनः ।
तुल्यप्रियाप्रियो धीरस्तुल्यनिंदात्मसंस्तुतिः ।। १४-२४ । ४७६
मानापमानयोस्तुल्यस्तुल्यो मित्रारिपक्षयोः ।
सर्वारंभपरित्यागी गुणातीतः स उच्यते ।। १४-२५ । ४७७

नानाद्वंद्वांबद्दल समभाव, स्वस्थपणा व काम्यकर्मारंभाबाबत अनासक्ति, हीं होत. ४७६, ४७७

मां च योऽव्यभिचारेण भक्तियोगेन सेवते ।
स गुणान्समतीत्यैतान् ब्रह्मभूयाय कल्पते ।। १४-२६ । ४७८

हा गुणातीतपणा प्राप्त होण्याचें एक साधन म्हणजे मात्र माझी अनन्य भक्तीच होय व तिनें मोक्षप्राप्ति शक्य आहे. ४७८

ब्रह्मणो हि प्रतिष्ठाहममृतस्याव्ययस्य च ।
शाश्वतस्य च धर्मस्य सुखस्यैकांतिकस्य च ।। १४-२७ । ४७९

मीच अमृत व अव्यय अशा ब्रह्माचें शाश्वत धर्माचें व परमावधीच्या सुखाचें अखेरचें स्थान आहें. ४७९

इति क्षेत्रं तथा ज्ञानं ज्ञेयं चोक्तं समासतः ।
मद्भक्त एतद्विज्ञाय मद्भावायोपपद्यते ।। १३-१८ । ४८०

याप्रमाणें पूर्वीच्या अनेक अध्यायांतून तुला ज्ञेयज्ञान व क्षेत्रक्षेत्रज्ञ क्षरअक्षर इत्यादिकांचा विचार सांगितला. या ज्ञानाच्या योग्य ग्रहणानें माझी प्राप्ति होणें शक्य आहे. ४८०

हरिः ॐतत्सत्

इति रचनान्तरीकृतश्रीमद्भगवद्गीतासूपनिषत्सु० अधिभूतयोगो नाम द्वादशोऽध्यायः ॥ १२ ॥

# त्रयोदशाध्याय

# गुणत्रयविभाग

यापूर्वीच्या अध्यायांत दृश्य विश्वोद्भवाला साधनीभूत अशा प्रकृतीचें व तिच्या त्रिगुणांच्या सामान्य लक्षणांचें विवेचन आलें. परंतु मानवी व्यवहाराच्या दृष्टीनें विश्वघटनेचें ज्ञान यापेक्षां जास्त तपशीलवार असणें जरूर आहे. सबब, हे त्रिगुण ज्याप्रमाणें विश्वघटनेंत व व्यक्तिघटनेंत प्रत्ययास येतात व त्यांचीं जीं कार्ये प्रत्ययास येतात त्यांच्या वर्णनास हा अध्याय वाहिला आहे. या अध्यायाचें क्षेत्र अधिभौतिक विश्व हें होय, आणि हा अध्याय या अधिभौतिक विश्वाइतकाच विस्तीर्ण व विशेषतः वैविध्यपूर्ण आहे. या अध्यायाच्या वाचनाचा वाचकांस कंटाळा येणें असंभवनीय नाहीं; परंतु जडविश्वाच्या व्यवहारासहि मनुष्य प्राणी अखेर कंटाळून जाऊन विश्रांतीची अपेक्षा करीत नाहीं काय? मात्र, ही या विषयाची गौण बाजू होय. मुख्य बाजू वेगळी आहे. व्यवहारपाटव संपादन करण्याकरतां अनेक रूक्ष विषयांचा अभ्यास सांप्रत अनेक विश्वविद्यालयांमधून हजारों विद्यार्थी प्रतिवर्षी करीत नाहींत काय? अर्जुन हा प्रस्तुत अवस्थेंत एक विद्यार्थीच आहे आणि तो श्रीकृष्णासारख्या गुरूजवळ शिष्यभावानें युद्धभूमीवरच्या व्यावहारिक जगांत कसें वागावयाचें तें शिकत आहे. त्याकरितां त्याला या त्रिगुणात्मक विश्वाच्या तपशीलवार ज्ञानाची जरूरी आहे आणि म्हणून तो तें भगवंतापाशीं विचारून प्राप्त करून घेत आहे. या ज्ञानाचा अर्जुनाला जितका उपयोग आहे तितकाच सामान्य जनांनाहि आहे. शिवाय गीता हा केवळ पारमार्थिक ज्ञानाचा ग्रंथ होय, असें मानणारे गीतेचे वाचक सांप्रत जितके आहेत, त्यापेक्षां जास्त वाचक गीतेला प्रथम ऐहिक सुखाचा व नंतर पारलौकिक कल्याणाचा मार्ग दाखविणारा ग्रंथ मानणारे आहेत आणि त्यांना या अध्यायांतील ज्ञानाची महती भरपूर आहे.

॥ अर्जुन उवाच ॥

ये शास्त्रविधिमुत्सृज्य यजंते श्रद्धयान्विताः ।
तेषां निष्ठा तु का कृष्ण सत्त्वमाहो रजस्तमः ॥ १७-१ । ४८१

अर्जुन विचारतो–भगवन्, जे शास्त्रोक्त पद्धतीचा अवलंब न करतां केवळ श्रद्धेनेंच यत्न करतात त्यांची वृत्ति सात्त्विक, राजस कीं तामस समजावयाची हें मला सांगा. ४८१

॥ श्रीभगवानुवाच ॥

सत्त्वानुरूपा सर्वस्य श्रद्धा भवति भारत ।
श्रद्धामयोऽयं पुरुषो यो यच्छ्रद्धः स एव सः ॥ १७-३ । ४८२

श्रीभगवान उत्तर देतात–अर्जुना, प्रत्येकाची श्रद्धा त्याच्या प्राकृतघटनेनुरूप असते. मनुष्य हा ज्या प्राकृतिक घटनेचा आहे, त्याच श्रद्धामय घटनेचा आहे. प्रकृति व श्रद्धा यांचें इतकें परस्परावलंबन आहे. ४८२

त्रिविधा भवति श्रद्धा देहिनां सा स्वभावजा ।
सात्त्विकी राजसी चैव तामसी चेति तां शृणु॥ १७-२ । ४८३
आहारस्त्वपि सर्वस्य त्रिविधो भवति प्रियः ।
यज्ञस्तपस्तथा दानं तेषां भेदमिमं शृणु ॥ १७-७ । ४८४
आयुःसत्त्वबलारोग्यसुखप्रीतिविवर्धनाः ।
रस्याः स्निग्धाः स्थिराः हृद्या आहाराः सात्त्विकप्रियाः ॥
१७-८ । ४८५

ही मनुष्याची श्रद्धा प्रकृतीप्रमाणें त्रिविध असते; आणि प्रकृत्यनुरूप, त्याचे आहार, यज्ञ, तप, दान इत्यादिहि त्रिविध असतात. या अन्तस्थ प्राकृतिक भेदांचीं बाह्य लक्षणें मी तुला सांगतों. सात्त्विक वृत्तीच्या लोकांचा आहार, आयुष्य, जोम, बल, आरोग्य, सुख व परस्पर प्रेम वाढविणारा असा रसाळ, स्निग्ध व आल्हाददायक असतो. ४८३–४८५

कट्वम्ललवणात्युष्णतीक्ष्णरूक्षविदाहिनः ।
आहारा राजसस्येष्टा दुःखशोकामयप्रदाः ॥ १७-९ । ४८६

राजसी आहार कडू, आंबट, तिखट, जळजळीत व रूक्ष इत्यादि असा असतो व त्यायोगानें त्रास व व्याधीहि उत्पन्न होतात. ४८६

यातयामं गतरसं पूतिपर्युषितं च यत् ।
उच्छिष्टमपि चामेध्यं भोजनं तामसप्रियम् ॥ १७-१० । ४८७
यजंते सात्विकादेवान्यक्षरक्षांसि राजसाः ।
प्रेतान्भूतगणांश्चान्ये यजंते तामसा जनाः ॥ १७-४ । ४८८

शिळें, निरस, घाणेरडें, वगैरें अन्न तामसी लोकांना आवडतें. सात्त्विक लोक देवांकरतां, राजस लोक यक्षराक्षसांकरतां, व तामस लोक भूतप्रेतांकरतां यज्ञ करतात. ४८७-४८८

अशास्त्रविहितं घोरं तप्यंते ये तपो जनाः ।
दंभाहंकारसंयुक्ताः कामरागबलान्विताः ॥ १७-५ । ४८९
कर्षयंतः शरीरस्थं भूतग्राममचेतसः ।
मां चैवांतःशरीरस्थं तान्विद्ध्यासुरनिश्चयान् ॥ १७-६ । ४९०

असले तामस वृत्तीचे लोक अशास्त्रसंमत विधीनें घोर प्रकारचें जें यज्ञकर्म करतात त्यायोगानें ते त्यांच्या पाञ्चभौतिक शरीरास, त्याचप्रमाणें त्या शरीराशीं संबद्ध असलेल्या मलाहि शिणवतात.[१] ४८९–४९०

अफलाकांक्षिभिर्यज्ञो विधिदृष्टो य इज्यते ।
यष्टव्यमेवेति मनः समाधाय स सात्त्विकः ॥ १७-११ । ४९१

शास्त्रविधीस अनुसरून व फलाशा न ठेवतां केलेला यज्ञ तो सात्त्विक यज्ञ होय. ४९१

अभिसंधाय तु फलं दंभार्थमपि चैव यत् ।
इज्यते भरतश्रेष्ठ तं यज्ञं विद्धि राजसम् ॥ १७-१२ । ४९२

---

१. येथेंहि जीवात्मा ही संज्ञा लाविलेली नाहीं ही गोष्ट लक्षांत ठेवण्यासारखी आहे. दुसरी गोष्ट लक्षांत ठेवण्यासारखी म्हणजे पांच भौतिक देहाला होणाऱ्या बरोबरच अन्तर्गत आत्मतत्त्वालाहि दुःखाचा अनुभव थोडाफार येतोच.

विधिहीनमसृष्टान्नं मंत्रहीनमदक्षिणम् ।
श्रद्धाविरहितं यज्ञं तामसं परिचक्षते ॥ १७-१३ । ४९३

फलाशा ठेवून अगर केवळ डौल माजविण्याकरतां केलेला यज्ञ तो राजस, ज्या यज्ञांत पद्धति नाहींत, मंत्र नाहींत, अन्नदान नाहीं, दक्षिणा नाहीं, असल्या प्रकारचा यज्ञ तो तामस. ४९२–९३

यानंतर प्रथम तुला तपाचे भेद सांगतो.—

शारीर तपः—४९४

देवद्विजगुरुप्राज्ञपूजनं शौचमार्जवम् ।
ब्रह्मचर्यमहिंसा च शारीरं तप उच्यते ॥ १७-१४ । ४९४

वाङ्मय तपः—४९५

अनुद्वेगकरं वाक्यं सत्यं प्रियहितं च यत् ।
स्वाध्यायाभ्यसनं चैव वाङ्मयं तप उच्यते ॥ १७-१५ । ४९५

मानस तपः—४९६

मनःप्रसादः सौम्यत्वं मौनमात्मविनिग्रहः ।
भावसंशुद्धिरित्येतत्तपो मानसमुच्यते ॥ १७-१६ । ४९६

यानंतर या तपाचे त्रिगुणात्मक प्रकारः—

सात्त्विक तपः—४९७

श्रद्धया परया तप्तं तपस्तत्त्रिविधं नरैः ।
अफलाकांक्षिभिर्युक्तैः सात्त्विकं परिचक्षते ॥ १७-१७ । ४९७

राजस तपः—४९८

सत्कारमानपूजार्थं तपो दंभेन चैव यत् ।
क्रियते तदिह प्रोक्तं राजसं चलमध्रुवम् ॥ १७-१८ । ४९८

तामस तपः—४९९

मूढग्राहेणात्मनो यत्पीडया क्रियते तपः ।
परस्योत्सादनार्थं वा तत्तामसमुदाहृतम् ॥ १७-१९ । ४९९

यानंतर दानाचे प्रकार ऐक—

सात्त्विक ज्ञानः—५००

दातव्यमिति यद्दानं दीयतेऽनुपकारिणे ।
देशे काले च पात्रे च तद्दानं सात्त्विकं स्मृतम्॥१७-२० । ५००

राजस दानः—५०१

यत्तु प्रत्युपकारार्थं फलमुद्दिश्य वा पुनः ।
दीयते च परिक्लिष्टं तद्दानं राजसं स्मृतम् ॥ १७-२१ । ५०१

तामस दानः—५०२

अदेशकाले यद्दानमपात्रेभ्यश्च दीयते ।
असत्कृतमवज्ञातं तत्तामसमुदाहृतम् ॥ १७-२२ । ५०२
अश्रद्धया हुतं दत्तं तपस्तप्तं कृतं च यत् ।
असदित्युच्यते पार्थ न च तत्प्रेत्य नो इह ॥ १७-२८ । ५०३

थोडक्यांत अर्जुना, असें म्हणतां येईल कीं, श्रद्धाहीन अंतःकरणानें केलेले यज्ञ, ज्ञान, तप, कर्म, हीं सर्व व्यर्थ होत. ५०३

ज्ञानं ज्ञेयं परिज्ञाता त्रिविधा कर्मचोदना ।
करणं कर्म कर्तेति त्रिविधः कर्मसंग्रहः ॥ १८-१८ । ५०४
ज्ञानं कर्म च कर्ता च त्रिधैव गुणभेदतः ।
प्रोच्यते गुणसंख्याने यथावच्छृणु तान्यपि ॥ १८-१९ । ५०५

यानन्तर या त्रिगुणांपैकीं विशिष्ट गुणाच्या प्राबल्यानें ज्ञान, कर्म आणि कर्ता यांचे तीन तीन पोटविभाग पडतात ते ऐकः—५०४-५०५

सात्त्विक ज्ञानः— ५०६

सर्वभूतेषु येनैकं भावमव्ययमीक्षते ।
अविभक्तं विभक्तेषु तज्ज्ञानं विद्धि सात्त्विकम् ॥ १८-२० । ५०६

राजस ज्ञानः—५०७

पृथक्त्वेन तु यज्ज्ञानं नानाभावान्पृथग्विधान् ।
वेत्ति सर्वेषु भूतेषु तज्ज्ञानं विद्धि राजसम् ॥ १८-२१ । ५०७

तामस ज्ञानः—५०८

यत्तु कृत्स्नवदेकस्मिन् कार्ये सक्तमहैतुकम्।
अतत्त्वार्थवदल्पं च तत्तामसमुदाहृतम्।। १८-२२। ५०८

सात्त्विक कर्मः—५०९

नियतं संगरहितमरागद्वेषतः कृतम्।
अफलप्रेप्सुना कर्म यत्तत्सात्त्विकमुच्यते।। १८-२३। ५०९

राजस कर्मः—५१०

यत्तु कामेप्सुना कर्म साहंकारेण वा पुनः।
क्रियते बहुलायासं तद्राजसमुदाहृतम्।। १८-२४। ५१०

तामस कर्मः—५११

अनुबंधं क्षयं हिंसामनपेक्ष्य च पौरुषम्।
मोहादारभ्यते कर्म तत्तामसमुदाहृतम्।। १८-२५। ५११

सात्त्विक कर्ताः—५१२

मुक्तसंगोऽनहंवादी धृत्युत्साहसमन्वितः।
सिध्यासिद्ध्योर्निर्विकारः कर्ता सात्त्विक उच्यते।। १८-२६। ५१२

राजस कर्ताः—५१३

रागी कर्मफलप्रेप्सुर्लुब्धो हिंसात्मकोऽशुचिः।
हर्षशोकान्वितः कर्ता राजसः परिकीर्तितः।। १८-२७। ५१३

तामस कर्ताः—५१४

अयुक्तः प्राकृतः स्तब्धः शठोनैष्कृतिकोऽलसः।
विषादी दीर्घसूत्री च कर्ता तामस उच्यते।। १८-२८। ५१४

बुद्धेर्भेदं धृतेश्चैव गुणतस्त्रिविधं शृणु।
प्रोच्यमानमशेषेण पृथक्त्वेन धनंजय।। १८-२९। ५१५

त्याचप्रमाणें बुद्धीचे व धैर्याचे याच नमुन्याचे तीन तीन प्रकार ऐक.

५१५

सात्त्विक बुद्धिः—५१६

प्रवृत्तिं च निवृत्तिं च कार्याकार्ये भयाभये ।
बंधं मोक्षं च या वेत्ति बुद्धिः सा पार्थ सात्त्विकी ॥ १८-३० ।५१६

राजस बुद्धिः—५१७

यया धर्ममधर्मं च कार्यं चाकार्यमेव च ।
अयथावत्प्रजानाति बुद्धिः सा पार्थ राजसी ॥ १८-३१ ।५१७

तामस बुद्धिः—५१८

अधर्मं धर्ममिति या मन्यते तमसा वृता ।
सर्वार्थान् वपरीतांश्च बुद्धिः सा पार्थ तामसी १८-३२ ।५१८

सात्त्विक धैर्यः—५१९

धृत्या यथा धारयते मनः प्राणेंद्रियक्रियाः ।
योगेनाऽव्यभिचारिण्या धृतिः सा पार्थ सात्त्विकी ॥ १८-३३ ।५१९

राजस धैर्यः—५२०

यया तु धर्मकामार्थान्धृत्या धारयतेऽर्जुन ।
प्रसंगेन फलाकांक्षी धृतिः सा पार्थ राजसी ॥ १८-३४ ।५२०

तामस धैर्यः—५२१

यया स्वप्नं भयं शोकं विषादं मदमेव च ।
न विमुंचति दुर्मेधा धृतिः सा पार्थ तामसी ॥ १८-३५ ।५२१

यानंतर सुखाचेहि तीन प्रकार ऐक —५२२

सुखं त्विदानीं त्रिविधं शृणु मे भरतर्षभ ।
अभ्यासाद्रमते यत्र दुःखान्तं च निगच्छति ॥ १८-३६ ।५२२

सात्त्विक सुखः—५२३

यत्तदग्रे विषमिव परिणामेऽमृतोपमम् ।
तत्सुखं सात्त्विकं प्रोक्तमात्मबुद्धिप्रसादजम् ॥ १८-३७ ।५२३

राजस सुखः–५२४

विषयेंद्रियसंयोगाद्यत्तदग्रेऽमृतोपमम् ।
परिणामे विषमिव तत्सुखं राजसं स्मृतम् ॥ १८-३८ । ५२४

तामस सुखः–५२५

यदग्रे चानुबंधे च सुखं मोहनमात्मनः ।
निद्रालस्यप्रमादोत्थं तत्तामसमुदाहृतम् ॥ १८-३९ । ५२५
न तदस्ति पृथिव्यां वा दिवि देवेषु वा पुनः ।
सत्त्वं प्रकृतिजैर्मुक्तं यदेभिः स्यात्त्रिभिर्गुणैः ॥ १८-४० । ५२६

अर्जुना, प्रकृतीच्या या तीन गुणांपासून मुक्त अशी प्राकृतिक देहघटना या त्रैलोक्यांत कोणतीहि नाहीं. ५२६

हरिः ॐ तत्सत्

इति रचनान्तरीकृतश्रीमद्भगवद्गीतासूपनिषत्सु० गुणत्रयविभागयोगो नाम त्रयोदशोध्यायः ॥ १३ ॥

## चतुर्दशाध्याय

## दैवासुरसंपद्विभागयोग

प्रस्तुत अध्यायांतील विषयाचा उपन्यास श्रीभगवान् प्रतिपाद्य विषयाचें एक महत्त्वाचें अंग या दृष्टीनें, स्वयंस्फूर्तीनें, अर्जुनानें याबाबत कसलाच प्रश्न न विचारतां करीत आहेत. अध्यायाचा विषय दैवासुरसंपद्विभाग असा आहे. प्रतिपादनाचें क्षेत्र आकुंचित म्हणजे मानवसमाज मर्यादित आहे; आणि त्याचे, एक दैवी संपत्तीनें युक्त व एक आसुरी संपत्तीनें युक्त असे दोन परस्पर-विरोधी भाग पाडले आहेत. त्यांपैकीं एक दैवी संपत्तीनें युक्त असलेला भाग इष्ट व संरक्षणीय असा दाखविला असून अर्जुन या वर्गात मोडत असल्याचें त्याच्या नजरेस आणलें आहे; आणि दुसरा आसुरी संपत्तीनें युक्त असून तो अनिष्ट व संहारणीय आहे, इतकेंच नव्हे, तो बलिष्ठ होऊन इष्ट व संरक्षणीय संपत्तीचा नाश करील ही गोष्ट येथें अर्जुनाच्या स्पष्ट नजरेस आणली आहे.

पूर्वीच्या गुणत्रयविभागयोगांत विश्वघटना तीन प्रकारची जी सांगितली ती मांडणीच्या पूर्व( सांख्य )परंपरेस धरून योग्य असली तरी व्यवहाराच्या दृष्टीनें इतकी सोयीची नाहीं. व्यवहारांत—विशेषतः आणिबाणीच्या व्यवहारांत, स्व आणि पर, इष्ट आणि अनिष्ट, संरक्षणीय व संहारणीय, असे परस्परविरोधी स्पष्टगुणयुक्त दोनच भेद पाडल्याविना गत्यंतर नसतें, कार्यक्षमता येत नाहीं व प्राप्तकाल कार्य होत नाहीं. ही गोष्ट जाणून व्यवहारचतुर भगवान् अर्जुनास सर्व पूर्वाध्यायांतील अनेक गुंतागुंतीच्या विवरणांतून बाहेर काढून त्यास अखेर प्राप्त बिकट परिस्थितीच्या तोंडाशीं आणून उभा करून विचारीत आहेत कीं, "अर्जुना, तूं दैवी संपत्तीनें युक्त आहेस व अर्थात् तुझे शत्रु आसुरी संपत्तीनें युक्त आहेत. अशा प्रसंगीं तूं व्यक्तिदृष्ट्या धार्तराष्ट्रांकडून मारविला जाण्यास तयार आहेस याचा अर्थ, तुझ्या रूपानें, अगर तुझ्यापासून सुरुवात होऊं देऊन, तूं दैवी संपत्तीचा असुरी संपत्तीकडून संहार होऊं देण्यास तयार आहेस असाच काय? कदाचित् हा तुझा वैयक्तिक प्रश्न आहे असें तूं मानीत असशील तर तूं चुकत आहेस. कौरवपांडवांमधील लढा हा आसुरी संपत्ति व दैवी संपत्ति या दोन प्रकारच्या संपत्तींच्या दरम्यानचा लढा आहे. आणि व्यक्तिशः तुझी इच्छा कांहींहि असली तरी मला ही दैवी संपत्तीच्या नाशाची संभाव्यता रुचणें शक्यच नसल्यामुळें तूं युद्ध करण्याचें नाकारण्यांत काय करूं पहात आहेस, केवढी प्रचंड विपरीत घटना घडवून आणूं पहात आहेस हें तुझ्या नजरेस स्पष्टपणें आणणें माझें कर्तव्य आहे. अर्जुना, शास्त्र असें सांगत नाहीं, मी स्वतः असें करीत नाहीं व तूं करूं नकोस." याप्रमाणें या अध्यायांतील विवेचनाचें रहस्य दिसतें.

॥ श्रीभगवानुवाच ॥

अभयं सत्त्वसंशुद्धिर्ज्ञानयोगव्यवस्थितिः।
दानं दमश्च यज्ञश्च स्वाध्यायस्तप आर्जवम्॥ १६-१। ५२७
अहिंसा सत्यमक्रोधस्त्यागः शांतिरपैशुनम्।
दया भूतेष्वलोलुप्त्वं मार्दवं ह्रीरचापलम्॥ १६-२। ५२८
तेजः क्षमा धृतिः शौचमद्रोहो नातिमानिता।
भवंति संपदं दैवीमभिजातस्य भारत॥ १६-३। ५२९

श्रीभगवान् पुढें सांगतातः–अर्जुना, (अ) स्वतःकरतां[1] १ शारीरिक शुचिर्भूतपणा, २ मानसिक शुचिर्भूतपणा, ३ अति मान नसणें, ४ वाईट कर्मांची लाज असणें, ५ हावरेपणा नसणें, ६ निर्भयता, ७ धैर्य, ८ तेजस्वीपणा, ९ उगीच नसत्या उठाठेवी न करणें, १० न रागावणें, ११ शान्त वृत्ति, १२ ध्यासंगनिमग्नता, १३ इंद्रियदमन, १४ तपाचरण, १५ सत्यपालन, १६ कर्मफलाचा त्याग व १७ ज्ञान व कर्म यांचीं क्षेत्रें वेगवेगळीं राखून ज्याच्यात्याच्या क्षेत्रांत ज्यात्या भावाचा अवलंब करणें, आणि (आ) दुसऱ्यांशीं वागतांना[1] १ अहिंसा, २ द्रोह न करणें, ३ क्षमाशीलता, ४ सरळपणा, ५ मृदुपणा, ६ उदार बुद्धि, ७ दया, ८ दातृत्व आणि ९ यज्ञ किंवा आपल्यांतलें कमी करूनहि तें दुसऱ्यास देऊन त्यास खुप करणें, हीं दैवी संपत्तीचीं लक्षणें होत. ५२७–५२९

द्वौ भूतसर्गौ लोकेऽस्मिन्दैव आसुर एव च। १६-६–१।
दैवी संपद्विमोक्षाय निबंधायासुरी मता॥ १६-५–१। ५३०
मा शुचः संपदं दैवीमभिजातोऽसि पांडव। १६-५–२।
दैवो विस्तरशः प्रोक्त आसुरं पार्थ मे शृणु॥ १६-६–२। ५३१

जगांत दैवी संपत्तीनें युक्त व आसुरी संपत्तीनें युक्त अशीं दोन प्रकारचीं मनुष्यें आहेत. ५३०

दैवी संपत्तीची परिणति मोक्षांत व आसुरी संपत्तीची बंधनांत होते. अर्जुना, तूं दैवी संपत्तीनें युक्त दिसतोस. सबब तुला उद्विग्न असण्याचें कारण नाहीं. यानंतर तुला आतां मी आसुरी संपत्तीचीं लक्षणें सांगतों. ५३१

दंभो दर्पोऽभिमानश्च क्रोधः पारुष्यमेव च।
अज्ञानं चाभिजातस्य पार्थ संपदमासुरीम्॥ १६-४। ५३२

दंभ, दर्प, अभिमान, क्रोध व निष्ठुरपणा हीं असुरी संपत्तीचीं मुख्य लक्षणें होत. ५३२

---

१. हें वर्गीकरण कांहींसें स्थूलच आहे व त्यांतील वाढत्या उच्च दर्जाचा क्रमहि अद्याप सुधारतां येण्यासारखा आहे.

प्रवृत्तिं च निवृत्तिं च जना न विदुरासुराः।
न शौचं नापि चाचारो न सत्यं तेषु विद्यते ॥ १६-७। ५३३

कार्य, अकार्य, शुचिता, आचार व सत्य यांची त्यांना ओळख नसते. ५३३

असत्यमप्रतिष्ठं ते जगदाहुरनीश्वरम्।
अपरस्परसंभूतं किमन्यत्कामहेतुकम् ॥ १६-८। ५३४

हे लोक जगाला ब्रह्मवस्तूचा आधार आहे अगर त्याच्या ईश्वरी भावाचें जगावर नियमन आहे असें मानीत नाहींत. त्याचप्रमाणें जगाला पूर्वी अन्य कोणापासून उत्पत्तिपरंपरा आहे हेंहि त्यांना कबूल नसतें. अर्थात्‌च, त्यांच्या मतें, तें केवळ दिसतें एवढेंच आणि म्हणून फक्त चैन करून घेण्याच्या सोयीचें असें आहे. ५३४

एतां दृष्टिमवष्टभ्य नष्टात्मानोऽल्पबुद्धयः।
प्रभवंत्युग्रकर्माणः क्षयाय जगतोऽहिताः ॥ १६-९। ५३५

चिंतामपरिमेयां च प्रलयांतामुपाश्रिताः।
कामोपभोगपरमा एतावदिति निश्चिताः ॥ १६-११। ५३६

काममाश्रित्य दुष्पूरं दंभमानमदान्विताः।
मोहाद्गृहीत्वाऽसद्ग्राहान्प्रवर्तंतेऽशुचिव्रताः ॥ १६-१०। ५३७

आणि एकदां ही दृष्टि स्वीकारली म्हणजे मग कधींहि पूर्ण तृप्त न होणाऱ्या परमप्रिय विषयोपभोगाच्या नाना भलभलत्या कल्पना मनांत धरून आणि त्या भोगेच्छा कशा तृप्त होतील याच्या फारतर चिंतेनें आमरणान्त ग्रासले जाऊन हे निरात्मबुद्धीचे दुष्ट लोक स्वसुखाप्रीत्यर्थ वाटेल तीं क्रूर कर्में करण्यास व जगाची वाटेल ती हानी करण्यासहि प्रवृत्त होतात. ५३५–५३७

आशापाशशतैर्बद्धाः कामक्रोधपरायणाः।
ईहंते कामभोगार्थमन्यायेनार्थसंचयान् ॥ १६-१२। ५३८

इदमद्य मया लब्धमिमं प्राप्स्ये मनोरथ।
इदमस्तीदमपि मे भविष्यति पुनर्धनम् ॥ १६-१३। ५३९

असौ मया हतः शत्रुर्हनिष्ये चापरानपि।
ईश्वरोऽहमहं भोगी सिद्धोऽहं बलवान्सुखी ॥ १६-१४। ५४०

आढ्योभिजनवानस्मि कोऽन्योस्ति सदृशो मया ।
यक्ष्ये दास्यामि मोदिष्य इत्यज्ञानविमोहिताः ॥ १६-१५ । ५४१
अनेकचित्तविभ्रांता मोहजालसमावृताः ।
प्रसक्ताः कामभोगेषु पतंति नरकेऽशुचौ ॥ १६-१६ । ५४२
आत्मसंभाविताः स्तब्धा धनमानमदान्विताः ।
यजंते नाम यज्ञैस्ते दंभेनाविधिपूर्वकम् ॥ १६-१७ । ५४३

कारण, अनेक सुखाशांनीं बद्ध झाल्यानंतर त्यांच्या प्रीत्यर्थ द्रव्य हवें असतें, व तें संपादन करण्याकरतां त्यांना अन्यायाचा मार्गच जास्त सोयीचा वाटतो, आणि मग " आज हें गिळंकृत केलें, उद्यां तें पचवितों; " हा मंत्र सुरू होतो. तसेंच, आज या शत्रूला लोळवला, बाकीच्यांनाहि त्याच मार्गाला मी आतां लवकरच लावतों. ५३८–५४०

कारण मी पराक्रमी, वाटेल तें प्राप्त करून देणाऱ्या सिद्धि माझ्या ताब्यांत; मीच कदाचित् देव म्हणतात तो असेन, आणि सर्व सुख भोगण्याचा माझाच काय तो हक्क, मी दान देईन, यज्ञ करीन, कीर्ति मिळवीन, इत्यादि मोहांनी व भ्रमांनीं हे लोक ग्रासलेले असतात. त्यामुळें, परिणामीं त्यांचा अत्यन्त अधःपात होतो. असल्या आत्मश्लाघी, गर्विष्ठ लोकांनीं यज्ञ केले तरी ते फक्त नावाचे यज्ञ होत. त्यांत योग्य विधीचा देखील अवलंब केलेला नसतो. ५४१–५४३

अहंकारं बलं दर्पं कामं क्रोधं च संश्रिताः ।
मामात्मपरदेहेषु प्रद्विषंतोऽभ्यसूयकाः ॥ १६-१८ । ५४४
तानहं द्विषतः क्रूरान्संसारेषु नराधमान् ।
क्षिपाम्यजस्रमशुभानासुरीष्वेव योनिषु ॥ १६-१९ । ५४५
आसुरीं योनिमापन्ना मूढा जन्मनि जन्मनि ।
मामप्राप्यैव कौंतेय ततो यांत्यधमां गतीम् ॥ १६-२० । ५४६

अहंकार, बल, दर्प, काम व क्रोध यांनीं फुगून जाऊन अशुभ कर्में करणाऱ्या व सर्वव्यापी जो मी ईश्वर त्याची निंदा व द्वेष करणाऱ्या या क्रूर नराधमांना, त्यांचें समाजांतील उच्च स्थान हिरावून घेऊन ज्या स्थानापासून

त्यांना असलीं कर्मे करणें शक्य होणार नाहीं अशा अतिनीच व अति असहाय सामाजिक स्थितींत, केवळ पशुमय जीवित कंठण्याकरितां मी ढकलून देतों. कारण त्याशिवाय दैवी संपत्तीची भरभराट होणें शक्य नसतें. ५४४–५४५

त्रिविधं नरकस्येदं द्वारं नाशनमात्मनः ।
कामः क्रोधस्तथा लोभस्तस्मादेतत्त्रयं त्यजेत् ॥ १६-२१ । ५४७
एतैर्विमुक्तः कौंतेय तमोद्वारैस्त्रिभिर्नरः ।
आचरत्यात्मनः श्रेयस्ततो याति परां गतिम् ॥ १६-२२ । ५४८

काम, क्रोध व लोभ ही तीन नरकाचीं साधनें होत, म्हणून या तिहींचाहि त्याग करावा. या तीन मोहद्वारांमधून सुटेल तरच मनुष्य कल्याण-कारक मार्गाला लागेल व उत्तम गतीला जाईल. ५४७-५४८

यः शास्त्रविधिमुत्सृज्य वर्तते कामकारतः ।
न स सिद्धिमवाप्नोति न सुखं न परां गतिम् ॥ १६-२३ । ५४९
तस्माच्छास्त्रं प्रमाणं ते कार्याकार्यव्यवस्थितौ ।
ज्ञात्वा शास्त्रविधानोक्तं कर्म कर्तुमिहार्हसि ॥ १६-२४ । ५५०

सबब अर्जुना, तूं हें लक्ष्यांत ठेव कीं, जो शास्त्रोपदिष्टविधि सोडून मनास वाटेल तें स्वतःला आवडतें म्हणून करूं लागला त्याला त्यांत सिद्धि, सुख व गति मिळणार नाहीं. त्याकरतां कार्य कोणतें व अकार्य कोणतें असा संदेह उत्पन्न झाला असतां त्यांच्या निरसनार्थ तुला शास्त्रवचनांचाच अवलंब केला पाहिजे; आणि हें शास्त्र जर तूं पाहूं जाशील तर सांप्रत येथें रणक्षेत्रावर युद्ध करणें हेंच तुझें कर्तव्य आहे हें तुला दिसून येईल. ५४९-५५०

हरिः ॐ तत्सत्

इति रचनान्तरीकृतश्रीमद्भगवद्गीतासूपनिषत्सु० दैवासुरसंपद्विभगयोगो नाम चतुर्दशोऽध्यायः ॥ १४ ॥

# पंचदशाध्याय
## कर्मयोग

तृतीयाध्यायांत अर्जुनानें विचारलेल्या सात प्रश्नांपैकीं पांच प्रश्नांचीं उत्तरें श्रीभगवंतानीं तीन ते चवदा अध्यायांपर्यंत दिलीं; आणि चवदाव्या अध्यायाच्या शेवटीं त्रिगुणांच्या नाना संयोगानुरूप व्यवहारांत ज्यांना दैवी व आसुरी संपत्ती म्हणतां येतील त्या दोन प्रकारच्या घटना उत्पन्न होत असल्यामुळें दैवी संपत्तीच्या रक्षणासाठीं आणि आसुरी संपत्तीच्या उच्छेदासाठीं कर्म करणेंच जरूर असतें. सबब तू रणांगणावर युद्धकर्म कर, असा उपदेश श्रीभगवान् अर्जुनास देत आहेत. अर्थातच चवदाव्या अध्यायांतील कर्मोपदेश त्यापूर्वींच्या अनेक अध्यायांतील ज्ञानी होण्याचा, पातंजलयोगी होण्याचा, भक्त होण्याचा, त्रिगुणातीत होण्याचा वगैरे जो उपदेश केला गेला त्यापेक्षां अर्जुनास वेगळ्या नमुन्याचा वाटणें शक्य आहे. सबब, हें उपदेशान्तर कां? व अनेक उपदेशांपैकीं निश्चित उपदेश कोणता? असा प्रश्न अर्जुन श्रीभगवंतास या अध्यायाच्या सुरुवातीस करीत आहे.

उत्तर देतांना श्रीभगवान् हा उपदेश स्पष्टपणें देतात. "कर्माचें तात्त्विक स्वरूप म्हणजे केवळ प्राकृतिक गुणांचें कार्य होय, तें थांबवितां येत नाहीं, त्याशिवाय व्यक्तीचें व विश्वाचें चालणार नाहीं, स्वतःकरितां जरूर नाहींसें वाटणारें कर्महि लोकसंग्रहाकरतां करावें लागतें, या कर्माचा पापरूपी अनुषंग टाळण्याकरतां तो अनुषंग ज्या कामक्रोधांमुळें उत्पन्न होतो ते कामक्रोध वर्ज्य करून—आणि वरिष्ठ आत्मशक्तीच्या बलानें ही गोष्ट शक्य आहे—कर्म केलें असतां परमपदाची प्राप्ती होते." या मतलबाचें विवरण होऊन व कर्माच्या इष्टतेचा पुनरुच्चार होऊन हा अध्याय पुरा होतो. या अध्यायांत अर्जुनाच्या सात प्रश्नांपैकीं कर्म म्हणजे काय या प्रश्नाचें उत्तर सविस्तर दिलें गेलें आहे.

---

॥ अर्जुन उवाच ॥

**ज्यायसी चेत्कर्मणस्ते मता बुद्धिर्जनार्दन ।**
**तत्किं कर्मणि घोरे मां नियोजयसि केशव ॥** ३-१ । ५५१

व्यामिश्रेणेव वाक्येन बुद्धिं मोहयसीव मे ।
तदेकं वद निश्चित्य येन श्रेयोऽहमाप्नुयाम् ॥ ३-२ । ५५२

अर्जुन विचारतो—भगवन्, आपण जर यापूर्वी कर्मापेक्षां ज्ञानाची महती गात होतां तर आतां मला कर्म करण्याचाच कां आग्रह करतां ? या आपल्या दुटप्पी बोलण्यानें मी जास्तच गोंधळांत पडत आहें. तर असें न करतां जो खरोखर कल्याणकर आहे असा एकच मार्ग मला सांगा.

॥ श्रीभगवानुवाच ॥

नियतं कुरु कर्म त्वं कर्म ज्यायो ह्यकर्मणः ।
शरीरयात्रापि च ते न प्रसिद्ध्येदकर्मणः ॥ ३-८ । ५५३

श्रीभगवान् उत्तर देतात—अर्जुना, तूं तुला तुझ्या वर्णाश्रमधर्माप्रमाणें नेमून दिलेलें कर्म कर. कर्म न करण्यापेक्षां कर्म करणें चांगलें. कर्म न करशील तर जगणेंहि शक्य नाहीं.

किं कर्म किमकर्मेति कवयोऽप्यत्र मोहिताः ।
तत्ते कर्म प्रवक्ष्यामि यज्ज्ञात्वा मोक्ष्यसेऽशुभात् ॥ ४-१६ । ५५४
कर्मणो ह्यपि बोद्धव्यं बोद्धव्यं च विकर्मणः ।
अकर्मणश्च बोधव्यं गहना कर्मणो गतिः ॥ ४-१७ । ५५५

कर्म म्हणजे काय व अकर्म म्हणजे काय या प्रश्नाचा निर्णय करतांना त्यांना देखील मोह पडतो. कर्माचें हें कोडें फार मोठें व बिकट आहे. सबब या कोड्याचा मी तुला उलगडा करून सांगतों. तो तुला कळला म्हणजे कर्म कोणतें, अकर्म कोणतें व विपरीत कर्म कोणतें हें तुला कळून तुझ्या मुक्तीचा मार्ग सुलभ होईल.

कर्म ब्रह्मोद्भवं विद्धि ब्रह्माक्षरसमुद्भवम् ।
तस्मात्सर्वगतं ब्रह्म नित्यं यज्ञे प्रतिष्ठितम् ॥ ३-१५ । ५५६
अन्नाद्भवंति भूतानि पर्जन्यादन्नसंभवः ।
यज्ञाद्भवति पर्जन्यो यज्ञः कर्मसमुद्भवः ॥ ३-१४ । ५५७

एवं प्रवर्तितं चक्रं नानुवर्तयतीह यः ।
अघायुरिंद्रियारामो मोघं पार्थ स जीवति ॥ ३-१६ । ५५८

कर्म म्हणजे ब्रह्मशक्तीचा संचलनात्मक अगर क्रियात्मक व्यापार होय व याप्रमाणें कर्म हें थेट अक्षरब्रह्मशक्तीपासून उद्भवलें आहे. यज्ञ संस्था ही कर्मापासून उत्पन्न झालेली आहे. यज्ञापासून पर्जन्यवृष्टि[1] होते. पर्जन्यवृष्टीपासून अन्नवृद्धि होते व अन्नवृद्धीपासून प्राणिमात्राचें जीवन शक्य होतें; आणि अखेर प्राणिमात्रांच्या जीवनव्यापारांत कर्म हें अनुस्यूत आहेच. एवढ्यामुळेंच सर्वव्यापी ब्रह्मशक्ति ही यज्ञक्रियेंत मुख्य उपास्य मानली आहे. एवंच कर्म-यज्ञ-पर्जन्य-अन्न-भूत-कर्म हें एक प्रकारचें परस्परानुगामी रहाटगाडगें आहे; व जो स्वतःच्या हिश्शाच्या कर्माचा हात तें रहाटगाडगें चालू राखण्यास न लावील तो व्यर्थ जन्मास आलेला पापात्मा होय.

---

१. जोतिष्टोमादि यज्ञ आणि पर्जन्यवृष्टि यांच्या परस्परसंबंधाचें रहस्य काय हें अद्यापि प्राच्यविद्यासंशोधकांनीं निश्चित करावयाचें आहे. केवळ तीळ, तांदूळ, तूप हीं अग्नींत जाळल्यानें त्यांपासून होणाऱ्या धुरानें अगर अग्नीच्या ज्वलांनीं होणाऱ्या उष्णतेनें वातावरणांत योग्य ती हालचाल होऊन तीपासून पर्जन्यवृष्टि शक्य होत असावी असेंच म्हणणें कदाचित् टिकून राहणार नाहीं. दुसरी गोष्ट, यज्ञसंस्था फार नवीन आहे व पर्जन्य त्या मानानें फार पुरातन कालचा आहे. अर्थात् जेव्हां केव्हां भूतलावर पर्जन्यवृष्टि सुरू झाली त्या काळीं यज्ञतुल्य एकादि नैसर्गिक क्रिया होत असल्याची पर्जन्याकरितां यज्ञ सुरू करणारांची धारणा असून, त्या यज्ञाचें केवळ अल्पस्वल्प प्रतीक म्हणून हे पर्जन्यार्थ यज्ञ सुरू करण्यांत आले असल्यास न कळे. निदान कर्माचा उद्भव ब्रह्मशक्तीपाशीं लावण्यांत व यज्ञाला त्यानंतरचें स्थान देण्यांत अशा प्रकारची कल्पना गर्भित नसेलच असें वाटत नाहीं. शिवाय ‘ब्रह्माग्नावपरज्ञेयं यज्ञेनैवोपजुह्वति’ किंवा ‘अपाने जुह्वति प्राणं प्राणेऽपानं तथा परे’ इत्यादि वाक्यांवरून निरनिराळ्या उष्णमानांच्या वाऱ्याचा यज्ञसंयोग पर्जन्यवृष्टीस कारणीभूत होत असल्याची कल्पना नसेल व तीच प्रक्रिया सामान्य यज्ञांमध्यें अल्पस्वल्प प्रमाणांत घडवून आणल्यानें पर्जन्यप्रवृत्ति वाढतां वाढतां पुरेसा पाऊस अखेर पडत नसेल असें कशावरून ? पण हें कसेंहि असलें तरी येथें कांहींतरी अज्ञात गूढरहस्यप्रक्रियेचा उल्लेख आहे असें म्हणणें अस्थानीं होणार नाहीं.

न कर्मणामनारंभान्नैष्कर्म्यं पुरुषोऽश्नुते ।
न च संन्यसनादेव सिद्धिं समधिगच्छति ॥ ३-४ । ५५९

कर्माला सुरुवातच न केल्यानें कर्मशून्यतेचें श्रेय पदरांत पडत नाहीं आणि कर्मे सोडून देण्याच्या प्रयत्नांत यश येतेंच असें नाहीं.

न हि कश्चित्क्षणमपि जातु तिष्ठत्यकर्मकृत् ।
कार्यते ह्यवशः कर्म सर्वः प्रकृतिजैर्गुणैः ॥ ३-५ । ५६०

कारण, कोणीहि झाला तरी कांहींना कांहीं कार्य केल्यावांचून क्षणभर देखील राहत नाहीं. प्रकृतीचे गुण त्याला त्याची इच्छा नसतांहि कर्मे करणें भाग पाडतात.

प्रकृतेः क्रियमाणानि गुणैः कर्माणि सर्वशः ।
अहंकारविमूढात्मा कर्ताहमिति मन्यते ॥ ३-२७ । ५६१

मनुष्याच्या हातून जीवितावधींत जीं कर्मे होतात तीं सर्व प्राकृतिक त्रिगुणांचे परिणाम होत व तीं घडावयाचींच. केवळ मिथ्याहंकारामुळें कर्ता त्याचें कर्तृत्व स्वतःवर ओढून घेतो.

सदृशं चेष्टते स्वस्याः प्रकृतेर्ज्ञानवानपि ।
प्रकृतिं यांति भूतानि निग्रहः किं करिष्यति ॥ ३-३३ । ५६२

ज्ञानी मनुष्यांना देखील जीवितावधींत स्वतःच्या प्राकृतिक घटनेनुसार वागावें लागतें. सर्व प्राणीमात्र तसेंच वागतात; आणि जबरदस्तीनें स्वतःस वेगळ्या रीतीनें वागावयास लावणें तितकें जमत नाहीं. ५६२

[1]श्रेयान् स्वधर्मो विगुणः परधर्मात्स्वनुष्ठितात् ।
स्वधर्मे निधनं श्रेयः परधर्मो भयावहः ॥ ३-३५ । ५६३

---

१. या ठिकाणीं धर्म शब्दाचा अर्थ हिंदु-मुसलमान-ख्रिश्चन इत्यादि नाना प्रचलित मतपंथरूप धर्म असा करतांच येणार नाहीं. कारण या धर्मांना प्राकृतिक घटनेचा आधार नसून ते केवळ वरवरचे राजकीय व कांहींसे सामाजिक स्वरूपाचे धर्म होत; आणि, सबब, उलट असलेल्या धर्मांतरांतील फायद्याचीच भाषा सांप्रत प्रचलित झालेली आहे. या ठिकाणचा उद्दिष्ट धर्म तो कीं, जो पिढ्यानुपिढ्या चालू असून शुद्ध

सबब स्वतःचा जो प्रकृतिधर्म असेल त्याप्रमाणें वागणें हें बरें; किंबहुना त्याप्रमाणें वागत असतां मृत्यु आला तरी परवडतो. परंतु स्वतःच्या प्रकृतिधर्माप्रमाणें वागावयाचें सोडून वेगळ्याच प्रकृतिधर्मानुरूप वागण्याचा प्रसंग येईल तर मृत्यूपेक्षांहि जास्त हाल त्या जीवितावधींत होतात. ५६३

**यस्त्वात्मरतिरेव स्यादात्मतृप्तश्च मानवः ।**
**आत्मन्येव च संतुष्टस्तस्य कार्यं न विद्यते ॥** ३-१७ । ५६४
**नैव तस्य कृतेनार्थो नाकृतेनेह कश्चन ।**
**न चास्य सर्वभूतेषु कश्चिदर्थव्यपाश्रयः ॥** ३-१८ । ५६५

आतां ही गोष्ट खरी कीं, जो मनुष्य आत्मज्ञानप्राप्ति झाल्यामुळें स्वतःच्या ठिकाणींच तत्पर आणि संतुष्ट झाला, त्याला स्वतःकरतां म्हणून कांहीं करावयाचें उरत नाही. सबब त्यानें जगांत कर्म न केल्यानें त्याचा त्यांत वैयक्तिक नफातोटा कांहीं नसतो व त्याचें इतरांजवळ कांहीं गुंतून राहिलें नसतें असेंहि मानलें जातें. ५६४—५६५

**यद्यदाचरति श्रेष्ठस्तत्तदेवेतरो जनः ।**
**स यत्प्रमाणं कुरुते लोकस्तदनुवर्तते ॥** ३-२१ । ५६६

---

वंशसंभवद्वारा प्राकृतिक घटनेंत उतरला आहे आणि शिक्षणातांत असून व्यक्तीच्या वयोमध्यापर्यंत अव्याहत पाळला गेला आहे. अशा स्थितींत त्या धर्माचा त्याग करून त्यापेक्षां वेगळ्या धर्माचा स्वीकार करावयाचा म्हटल्यास खरोखर मरणान्त दुःख होईल. कारण मरण हें कांहींहि झालें तरी एक नैसर्गिक प्रक्रिया आहे व तें दुःखरूप असलेंच पाहिजे असें नाहीं. परंतु जन्मभर आंगवळणीं न पडलेल्या संवयीविरुद्ध विशिष्ट वयोवस्थेनंतर झगडावें लागणें हें मरणापेक्षां खरोखर जास्त यातना भोगविणारें आहे. याचीं अनेक उदाहरणें देतां येतील. स्वातंत्र्याला सवकलेले पूर्ण वाढीचे पशुपक्षी पकडून बंदींत टाकले व नंतर त्यांची कितीहि योग्य बरदास्त राखली तरी ते प्राणी अन्नत्यागानें प्राणत्याग करतात. अनेक रजपूत वीरांनीं पारतंत्र्याऐवजीं प्राणत्याग पत्करला व रजपूत स्त्रियांनीं पातिव्रत्यभंगाऐवजीं जोहार स्वीकारला. जपानी योद्धे लष्करीस्थानभ्रष्टतेपेक्षां शस्त्रमृत्यु पत्करतात.

सक्ताः कर्मण्यविद्वांसो यथा कुर्वंति भारत।
कुर्याद्विद्वांस्तथासक्तश्चिकीर्षुर्लोकसंग्रहम् ।। ३-२५ । ५६७
न बुद्धिभेदं जनयेदज्ञानां कर्मसंगिनाम्।
जोषयेत्सर्वकर्माणि विद्वान्युक्तः समाचरन ।। ३-२६ । ५६८
प्रकृतेर्गुणसंमूढाः सज्जंते गुणकर्मसु।
तानकृत्स्नविदो मंदान् कृत्स्नविन्न विचालयेत् ।। ३-२९ । ५६९

तथापि लोकव्यवहार असा आहे कीं, ज्ञाते थोर पुरुष ज्याप्रमाणें वागतात त्याचप्रमाणें अनुकरणप्रिय इतर लोकहि यथाशक्य वागूं पाहतात. व ज्ञानी पुरुष कार्यविन्मुख असतील तर त्यांच्याजवळ अंधानुकरणामुळें, पुष्कळ वेळां ते इतर लोक आत्मज्ञानी न होतांच कार्यविन्मुख मात्र होऊं पाहतात व असें झाल्यानें अनवस्थाप्रसंग उत्पन्न होतो. सबब ही आपत्ति टाळण्याकरतां ज्ञानी पुरुषानें देखील कर्मांत आसक्त असलेले सामान्य लोक ज्याप्रमाणें वागतात त्याचप्रमाणें वागावें, कर्मप्रवृत्ति कायम ठेवावी व सामान्य लोकांच्या बुद्धींत द्विधाभाव उत्पन्न करूं नये. कारण ते स्वतःच्या प्राकृतिक घटनेनुसार वागत असतात. मात्र ज्ञात्यानें जें कर्म करावयाचें तें आसक्तिरहितरीत्या केलें म्हणजे झालें. ५६६–५६९

कर्मणैव हि संसिद्धिमास्थिता जनकादयः।
लोकसंग्रहमेवापि संपश्यन्कर्तुमर्हसि ॥ ३ २० । ५७०

अशा प्रकारें ज्ञानी असून प्राकृत जनांप्रमाणें वागणाऱ्यांचीं उदाहरणें द्यावयाचीं तर तीं जनकादिकांचीं देतां येतील; आणि त्यांनी ज्याप्रमाणें लोकसंग्रहाकरतां कर्मे केलीं, त्याचप्रमाणें तूहि करणें इष्ट आहे. ५७०

न मे पार्थास्ति कर्तव्यं त्रिषु लोकेषु किंचन।
नानवाप्तमवाप्तव्यं वर्त एव च कर्मणि ।। ३-२२ । ५७१

अर्जुना, प्रत्यक्ष माझीच गोष्ट घे ना! मला कशाचीहि जरूरी नसतांना मीहि सामान्य मनुष्यांप्रमाणें कर्म करीत आहें. ५७१

यदि ह्ययं न वर्तेयं जातु कर्मण्यतंद्रितः।
मम वर्त्मानुवर्तंते मनुष्याः पार्थ सर्वशः ।। ३-२३ । ५७२

उत्सीदेयुरिमे लोका न कुर्यां कर्म चेदहम् ।
संकरस्य च कर्ता स्यामुपहन्यामिमाः प्रजाः ।। ३-२४ । ५७३

जर मी चिकाटीनें कर्में करीत न राहीन तर सर्व लोकहि तसेंच वागूं लागतील. त्यामुळें समाजाची हानि होईल व तुला ज्याची विशेष भीति वाटते तीच संकरप्रवृत्ति वाढून अखेर त्यांच्या नाशास मी अप्रत्यक्ष रीत्या कारण होईन. ५७२–५७३

ये मे मतमिदं नित्यमनुतिष्ठंति मानवाः ।
श्रद्धावंतोऽनसूयंतो मुच्यंते तेऽपि कर्मभिः ।। ३-३१ । ५७४
ये त्वेतदभ्यसूयंतो नानुतिष्ठंति मे मतम् ।
सर्वज्ञानविमूढांस्तान्विद्धि नष्टानचेतसः ।। ३-३२ । ५७५

अर्जुना, कर्म करण्या न करण्याच्या प्रश्नावर हें माझें अगदीं निश्चित व पूर्ण विचारांतीं बनलेलें व दिलेलें मत होय व या मताचें आचरण करणारास कर्मफलबंधनाची भीति बिलकूल नाहीं. उलट हें माझें मत जे मान्य करणार नाहींत ते, थोडक्यांत, पक्के मूर्ख व नाशाभिमुख झालेले आहेत हें तूं समजून घे. ५७४–५७५

॥ अर्जुन उवाच ॥

अथ केन प्रयुक्तोऽयं पापं चरति पूरुषः ।
अनिच्छन्नपि वार्ष्णेय बलादिव नियोजितः ।। ३-३६ । ५७६

अर्जुन यावर शंका विचारतो—भगवन्, असें जर आहे तर कर्म करीत असतां ज्या पापाचा कर्माशीं संबंध लावला जातो तें पाप घडण्यास कारणीभूत कोण होतो ? ५७६

॥ श्रीभगवानुवाच ॥

काम एष क्रोध एष रजोगुणसमुद्भवः ।
महाशनो महापाप्मा विद्ध्येनमिह वैरिणम् ।। ३-३७ । ५७७

श्रीभगवान् शंकासमाधान करतातः—अर्जुना, कर्मांच्या अनुषंगानें पापाचा उद्भव करणारी ही जोडी रजोगुणसंभव काम व क्रोध यांची होय.

रागलोभांच्या दंगलींत असतांना हातून घडणारें कर्म हें पापरूपच असणें संभवतें. ५७७

धूमेनाव्रियते वह्निर्यथाऽऽदर्शो मलेन च ।
यथोल्बेनावृतो गर्भस्तथा तेनेदमावृतम् ॥ ३-३८ । ५७८
आवृतं ज्ञानमेतेन ज्ञानिनो नित्यवैरिणा ।
कामरूपेण कौंतेय दुष्पूरेणानलेन च ॥ ३-३९ । ५७९

अग्नि ज्याप्रमाणें धुरानें किंवा आरसा धुळीनें मलीन होतो, त्याप्रमाणें प्रसंगविशेषीं ज्ञानाचें ज्ञानहि या कामक्रोधांनीं मलीन होतें. ५७८-५७९

इंद्रियाणि मनोबुद्धिरस्याधिष्ठानमुच्यते ।
एतैर्विमोहयत्येष ज्ञानमावृत्य देहिनम् ॥ ३-४० । ५८०

इंद्रियें, मन व बुद्धि हीं या कामक्रोधांच्या दंगलीचीं साधनें होत व या साधनांनीं हे ज्ञान्याच्या ज्ञानावर पटल आणून त्याला मोहांत पाडून फसवितात. ५८०

तस्मात्त्वमिंद्रियाण्यादौ नियम्य भरतर्षभ ।
पाप्मानं प्रजहि ह्येनं ज्ञानविज्ञाननाशनम् ॥ ३-४१ । ५८१

सबब, अर्जुना, तूं आधीं या इंद्रियांचें नियमन नीट कर, म्हणजे मग कामक्रोधांचें फारसें कांहीं चालणार नाहीं व क्रमानें त्यांचा उच्छेद होईल. ५८१

इंद्रियाणि पराण्याहुरिंद्रियेभ्यः परं मनः ।
मनसस्तु परा बुद्धिर्यो बुद्धेः परतस्तु सः ॥ ३-४२ । ५८२
एवं बुद्धेः परं बुद्ध्वा संस्तभ्यात्मानमात्मना ।
जहि शत्रुं महाबाहो कामरूपं दुरासदम् ॥ ३-४३ । ५८३

आणि ही गोष्ट करणें शक्य आहे. कारण, इंद्रियांवर मनाचा ताबा असतो, मनावर बुद्धीचा ताबा असतो व बुद्धीवर आत्म्याचा ताबा असतो. सर्वांत वरिष्ठ, व्यापक व नियामक सत्ता आत्म्याची आहे व आत्म्याच्या ठिकाणीं मनुष्यानें स्वतःचा भाव स्थिर केला म्हणजे त्या योगानें त्याला त्याखालच्या सर्व कनिष्ठ सात्तांवर अम्मल गाजविणें शक्य होतें. ५८२–५८३

**कर्मेन्द्रियाणि संयम्य य आस्ते मनसा स्मरन् ।**
**इंद्रियार्थान्विमूढात्मा मिथ्याचारः स उच्यते ॥** ३-६ । ५८४

परंतु जें काय करणें इष्ट नाहीं तें म्हणजे इंद्रियांचें बाह्यतः मात्र नियमन व मनांतून तर इकडे विषयांचें ध्यान. असल्या आचाराला शुद्ध ढोंग म्हणतात. ५८४

**इंद्रियस्येंद्रियस्यार्थे रागद्वेषौ व्यवस्थितौ ।**
**तयोर्न वशमागच्छेत्तौ ह्यस्य परिपंथिनौ ॥** ३-३४ । ५८५

इंद्रियांना त्यांच्या त्यांच्या विषयांच्या नाना रूपांपैकीं कांहींबद्दल प्रेम तर कांहींबद्दल द्वेष हे प्रकार मूळचेच ठरलेले आहेत. पण ज्ञान्यानें[1] राग-द्वेषांच्या तावडींत सांपडून विषयांबरोबर वाहात जाऊं नये, कारण त्या योगानें शत्रूप्रमाणें ते घात करतील. ५८५

**तत्त्ववित्तु महाबाहो गुणकर्मविभागयोः ।**
**गुणा गुणेषु वर्तंत इति मत्वा न सज्जते ॥** ३-२८ । ५८६

तत्त्व व त्यानें प्रकृतीचे गुण व तदनुसार होणारीं कर्में यांचें मर्म ओळखून इंद्रियांना त्यांचे खेळ खेळूं द्यावेत, मात्र आपण त्यांत गर्क होऊन जाऊं नये. ५८६

**यस्त्विंद्रियाणि मनसा नियम्यारभतेऽर्जुन ।**
**कर्मेंद्रियैः कर्मयोगमसक्तः स विशिष्यते ॥** ३-७ । ५८७

तर मनानें या इंद्रियांच्या व्यापारास आळा घालून तीं योग्य मर्यादेंत ठेवून त्या मर्यादेंत इंद्रियांना त्यांचे व्यापार-व्यवहार खुशाल करूं द्यावेत. अशा प्रकारें वागणें याचेंच नांव खरी अनासक्ति. ५८७

**तस्मादसक्तः सततं कार्यं कर्म समाचर ।**
**असक्तो ह्याचरन् कर्म परमाप्नोति पूरुषः ॥** ३-१९ । ५८८

---

१. उ. जिव्हेला गोड पदार्थांचें प्रेम व कडू पदार्थांचा द्वेष इत्यादि. मात्र या विधानाचा अर्थ विशिष्ट मर्यादेच्या आंतच ग्राह्य होय. कडू विषहि ज्ञानानें भक्षण करावें अगर औषधाकरतांहि तें घेऊं नये असा याचा अर्थ नव्हे, तर "गोड फार खाऊं नये," एवढाच.

सबब अर्जुना, तूंहि केवळ इंद्रियनियमनाचें ढोंग न करतां व त्याच-प्रमाणें त्यांच्या व्यापारांत आसक्ति न ठेवतां तुझ्या वर्णाश्रमधर्मानुरूप करावयाचें तें युद्धकार्य कर. या प्रकारें अनासक्त बुद्धीनें वागणारा पुरुष हा मोक्षाचा अधिकारीच होय. ५८८

तपस्विभ्योऽधिको योगी ज्ञानिभ्योऽपि मतोऽधिकः ।
कर्मिभ्यश्चाधिको योगी तस्माद्योगी भवार्जुन ।। ६-४६ । ५८९

कर्मकाण्डांत सांगितल्याप्रमाणें कर्ममार्ग आचरणाऱ्यांपेक्षां, पातंजल पद्धतीनें तप करणाऱ्यांपेक्षां व सांख्यतत्त्वज्ञान जाणणाऱ्यांपेक्षांहि कर्मयोगी मी अधिक श्रेष्ठ मानतों. सबब, अर्जुना, तूं या प्रकारचा कर्मयोगी हो. ५८९

हरिः ॐ तत्सत्

इति रचनान्तरीकृतश्रीमद्भगवद्गीतासूपनिषत्सु० कर्मयोगो नाम पंचदशोऽध्यायः ॥ १५ ॥

---

## षोडशाध्याय

# कर्मब्रह्मार्पणयोग

पूर्वाध्यायांत कर्माचें तात्त्विक स्वरूप व तदनुसार व्यावहारिक इष्टताहि प्रतिपादिली गेली. त्यानंतरच्या या अध्यायांत कर्मानुषंगिक पापोद्भवाचा प्रश्न प्रामुख्यानें विचारांत घेण्यांत आला असून यज्ञार्थ कर्म केलें असतां त्यापासून पापोद्भव होत नाहीं, असा सिद्धान्त प्रस्थापित केलेला आहे. गीतेंतील यज्ञ या संज्ञेचा अगर त्यानें उद्दिष्ट असलेल्या क्रियेचा अर्थ समजावून घेण्यासारखा आहे. या संज्ञेनें सामान्यतः पूर्वापर सहकार्य व परस्पर सहकार्य शक्य करण्याकरितां प्रत्येकानें स्वतःच्या श्रमापैकीं अगर मालकीच्या वस्तूंपैकीं कांहीं भाग अन्य कोणास तरी अर्पण करणें ही क्रिया ध्वनित होय. वैयक्तिक जीवित शक्य होण्यास अनेकांच्या कर्मांची व सहकार्यांची जरूरी असते, हा मुद्दा विशेष उलगडून सांगितला पाहिजे असें नाहीं. मात्र दुर्दैवानें त्याची जाणीव व तदनुसार वर्तन जितकें सार्वत्रिक

असावें तितकें असत नाहीं. तर केवळ वैयक्तिक स्वार्थमूलक वर्तनच मनुष्य-प्राण्यांत व त्यांतल्या त्यांतहि एकीकडे आसुरी वृत्तीच्या लोकांत तर दुसरीकडे संन्यस्त वृत्तीच्या लोकांतहि दिसून येतें. आपण खात असलेल्या आंब्याचीं झाडें जर आपणच लावलीं नव्हतीं तर ज्यांचे आंबे आपण खाणें शक्य नाहीं तीं झाडेंदेखील आपण लावलीं पाहिजेत हें या यज्ञाचें अगदीं साधें, नमुन्याचें, उदाहरण देतां येईल, व अशा तऱ्हेचें वर्तन अगदीं कर्तव्यरूप होय. ही विचारसरणी पटण्यास फार विलंब लागावा असें नाहीं. तथापि "कसलेंहि कर्म म्हटलें कीं, त्याचें पापपुण्य व तदनुसार फलभोग व त्यांच्या सिद्धीकरतां पुनर्जन्ममरणरूपी दुःखपरंपरा, सबब कर्म नको." असल्या विश्वघातकी विचारसरणीचें थैमान भगवंताच्या काळीं चालत असल्यामुळें व त्याचा पगडा अर्जुनाच्या मनावरहि जबरदस्तच असल्यामुळें या भ्रामक कल्पनेचा समूळ उच्छेद करणें श्रीभगवंतास भाग पडलें आहे व तो करण्यांत गीतेचे कित्येक श्लोक अगदीं हेतुपुरःसर व प्रतिपाद्य विषयाचा मुख्य भाग म्हणून श्रीभगवंतानीं योजले आहेत.

या यज्ञसंस्थेचें विस्तृत स्वरूप म्हणजेच कर्में ईश्वरार्पणबुद्धीनें करणें हें होय. व्यक्ति ही जडभावाप्रत पावलेली ब्रह्मघटनाच होय व पूर्वाध्यायांत सांगितल्याप्रमाणें कर्म हें ब्रह्मोद्भव आहे; आणि म्हणून तें व्यक्तीच्या ठिकाणीं संभवतें. परंतु व्यक्ति ही भ्रमानें कर्माचें स्वरूप वैयक्तिक मानते व तदनुरूप वैयक्तिक पापपुण्यांचा व फलभोगाचा नसता बागुलबुवा स्वतःच्यापुढें उत्पन्न करून अकर्मप्रवृत्ति वाढवितें. त्यावरचा सरळ उपाय म्हणजे आपण केवळ एक ब्रह्मघटना होत व आपल्या हातून होणारें कर्म केवळ वैश्वकर्माचा भाग होय; सबब हें आपल्या हातून होणारें कर्म व्यक्तिबद्ध रूपांत न राहतां वैश्व-कर्मांत सामील होवो अशा भावनेनें कर्में करणें म्हणजेच ब्रह्मार्पणबुद्धीनें कर्में करणें होय, व अशा प्रकारें होणाऱ्या वैश्वकर्माचा परिणाम पापांत अगर वैयक्तिक फलभोगांत होणार नाहीं हें उघड आहे.

या अध्यायांत अर्जुनाच्या यज्ञाचा अधिष्ठाता कोण या प्रश्नाचेंहि उत्तर आहे.

---

॥ श्रीभगवानुवाच ॥

इमं विवस्वते योगं प्रोक्तवानहमव्ययम् ।
विवस्वान्मनवे प्राह मनुरिक्ष्वाकवेऽब्रवीत् ॥ ४-१ । ५९०
एवं परंपराप्राप्तमिमं राजर्षयो विदुः ।
स कालेनेह महता योगो नष्टः परंतप ॥ ४-२ । ५९१
स एवायं मया तेऽद्य योगः प्रोक्तः पुरातनः ।
भक्तोऽसि मे सखा चेति रहस्यं ह्येतदुत्तमम् ॥ ४-३ । ५९२

कर्मयोगाचा हा उपदेश केवळ आपल्यासच कांहींतरी करून कर्मप्रवृत्त करण्याकरितां भगवान् करीत आहेत, अशी कदाचित् अर्जुनास शंका येत असल्यास तिचें निरसन करण्याकरतां श्रीभगवान् हा योग फार जुना असल्याचें सांगतात. ५९०–५९२

॥ अर्जुन उवाच ॥

अपरं भवतो जन्म परं जन्म विवस्वतः ।
कथमेतद्विजानीयां त्वमादौ प्रोक्तवानिति ॥ ४-४ । ५९३

पण यावर अर्जुन शंका विचारतो—भगवन्, हें कसें काय? ५९३

॥ श्रीभगवानुवाच ॥

बहूनि मे व्यतीतानि जन्मानि तव चार्जुन ।
तान्यहं वेद सर्वाणि न त्वं वेत्थ परंतप ॥ ४-५ । ५९४

श्रीभगवान् शंकासमाधान करतात—अर्जुना, या योगाचा ऊहापोह करणारे तूं व मी प्रथमचेच असें तूं मानीत असलास तर चुकत आहेस. अरे, असले प्रसंग वारंवार येतात.[१] ५९४

यदा यदा हि धर्मस्य ग्लानिर्भवति भारत ।
अभ्युत्थानमधर्मस्य तदात्मानं सृजाम्यहम् ॥ ४-७ । ५९५

शिवाय विशेषतः ज्या ज्या वेळीं धर्मग्लानी होते व अधर्मप्रवृत्ति वाढते त्या त्या वेळीं मी अवतार गृहण करतोंच. ५९५

---

१. केवळ राजकीय इतिहासाचीच पुनरावृत्ति होते असें नाहीं तर अध्यात्मिक इतिहासाचीहि पुनरावृत्ति होणें असंभवनीय नाहीं.

परित्राणाय साधूनां विनाशाय च दुष्कृताम् ।
धर्मसंस्थापनार्थाय संभवामि युगे युगे ॥ ४-८ । ५९६

वास्तविक पाहतां प्रत्येक युगाच्या अवधींत या प्रकारचें सद्वृत्तांचें रक्षण, दुर्वृत्तांचें निर्दालन करण्याकरतां, व धर्मसंस्थापना करण्याकरतां मला अवतार धारण करावे लागतात. ५९६

चातुर्वर्ण्यं मया सृष्टं गुणकर्मविभागशः ।
तस्य कर्तारमपि मां विद्ध्यकर्तारमव्ययम् ॥ ४-१३ । ५९७

या धर्मसंस्थापनेचा एक भाग म्हणजेच जी गुणानुरूप कर्मविभागमय चातुर्वर्ण्याश्रमपद्धति ती अमलांत येईल अशी योजना मीं केली आहे. ५९७

मां कर्माणि लिंपंति न मे कर्मफले स्पृहा ।
इति मां योऽभिजानाति कर्मभिर्न स बद्ध्यते ॥ ४-१४ । ५९८

मी ( ईश्वर ) या प्रकारच्या नाना योजना घडवून आणीत असतांहि त्यापासून मला कांहीं साधावयाचें नसतें व सबब त्या क्रियेच्या फलाचें बंधनहि मजवर नसतें, ही गोष्ट ज्याला नीट समजली त्याला कर्म आणि फलभोग यांचे परस्परसंबंध केव्हां व कसे उत्पन्न होतात हें समजेल, आणि मग त्याला कर्मफलभोगाची भीति उरणार नाहीं. ५९८

जन्मकर्म च मे दिव्यमेवं यो वेत्ति तत्त्वतः ।
त्यक्त्वा देहं पुनर्जन्म नैति मामेति सोऽर्जुन ॥ ४-९ । ५९९
एवं ज्ञात्वा कृतं कर्म पूर्वैरपि मुमुक्षुभिः ।
कुरु कर्मैव तस्मात्त्वं पूर्वैः पूर्वतरं कृतम् ॥ ४-१५ । ६००

---

१. हें भगवद्वाक्य ज्या सामाजिक क्षेत्रमर्यादेंत व समाजाच्या ज्या अवस्थेंत लागू पडणें शक्य आहे, त्यांचा ऊहापोह हा एक अत्यंत विस्तीर्ण वादग्रस्त विषय आहे. आधुनिक सुप्रजाजननशास्त्रांतच त्याचा ऊहापोह Aristocratic Society or Democratic Society or Organic Society या सदरांखालीं केला जातो. या विषयावर ज्यांना जास्त वाचन करावयाचें असेल त्यांनीं जननशास्त्रावरील ग्रंथ, विशेषतः *Heredity and Eugenics* by R. Ruggles Gates हा ग्रंथ वाचावा असें सुचवितां येईल.

आणि ईश्वराचे अवतार व त्यांचें कार्य यांचें या प्रकारचें तात्त्विक ज्ञान ज्यांना झालें त्यांची पुनर्जन्मावरची श्रद्धा व भीति हीं दोन्ही नाहींशीं होतात. हें ज्ञान झाल्यामुळेंच गतकालच्या अनेक मुमुक्षूंना पुनर्जन्माच्या भीतीला भीक न घालतां कर्मे करण्याचें धाडस करतां आलें. आणि त्यांच्या पुरोगामित्वाचा आधार घेऊन तूंहि यथास्थित कर्म कर.

५९९–६००

ये यथा मां प्रपद्यंते तांस्तथैव भजाम्यहम् ।
मम वर्त्मानुवर्तंते मनुष्याः पार्थ सर्वशः ॥ ४-११ । ६०१

कारण अर्जुना, मला जे जसा मानतात तसा त्यांच्या करतां व त्यांच्यापुरता मी त्यांच्या प्रत्यायास येतों. आणि सामान्य व्यवहारांत तरी काय ! अगदीं हाच प्रकार चालू आहे. ६०१

वीतरागभयक्रोधा मन्मया मामुपाश्रिताः ।
बहवो ज्ञानतपसा पूता मद्भावमागताः ॥ ४-१० । ६०२

उदाहरणार्थ, आवड, भय व क्रोध यांच्या तडाख्यांतून सुटलेले व ज्ञानयुक्त आचरणानें पवित्र झालेले अनेक लोक माझ्याशीं वृत्तिद्वारां तन्मय झाल्यामुळें मला येऊन मिळाले आहेत. ६०२

कांक्षंतः कर्मणां सिद्धिं यजंत इह देवताः ।
क्षिप्रं हि मानुषे लोके सिद्धिर्भवति कर्मजा ॥ ४-१२ । ६०३

उलट, ज्यांना आपल्या कर्मांच्या फलभोगाची हौस असते ते त्याकरतां ल्हानसहान देवतांचें यजन करतात व मौज अशी आहे कीं, या कर्मभूमींत कर्मांचें फलहि लवकर मिळतें. ६०३

सहयज्ञाः प्रजाः सृष्ट्वा पुरोवाच प्रजापतिः ।
अनेन प्रसविष्यध्वमेष वोऽस्त्विष्टकामधुक् ॥ ३-१० । ६०४

शिवाय ही गोष्ट ओळखूनच ब्रह्मदेवानें प्रजोद्भवाबरोबरच यज्ञ-संस्था अमलांत आणली व त्यानें प्रजांना सांगितलें, "बाबांनो, ही यज्ञसंस्था म्हणजे एक कामधेनु आहे. ६०४

देवान्भावयतानेन ते देवा भावयंतु वः ।
परस्परं भावयंतः श्रेयः परमवाप्स्यथ ॥ ३-११ । ६०५
इष्टान् भोगान् हि वो देवा दास्यंते यज्ञभाविताः ।
तैर्दत्तानप्रदायैभ्यो यो भुंक्ते स्तेन एव सः ॥ ३-१२ । ६०६

हिच्या पालनानें तुमचे सर्व मनोरथ पूर्ण होतील व तुमची भरभराट होईल. मात्र जर कां तुम्ही या संस्थेचा अव्हेर, अनास्था कराल तर तुम्ही फुकटखाऊ, चोर ठराल व तदनुसार शासन पावाल. ” ६०५-६०६

दैवमेवापरे यज्ञं योगिनः पर्युपासते ।
ब्रह्माग्नावपरे यज्ञं यज्ञेनैवोपजुह्वति ॥ ४-२५ । ६०७
श्रोत्रादीनींद्रियाण्यन्ये संयमाग्निषु जुह्वति ।
शब्दादीन्विषयानन्य इंद्रियाग्निषु जुह्वति ॥ ४-२६ । ६०८
सर्वाणींद्रियकर्माणि प्राणकर्माणि चापरे ।
आत्मसंयमयोगाग्नौ जुह्वति ज्ञानदीपिते ॥ ४-२७ । ६०९
द्रव्ययज्ञास्तपोयज्ञा योगयज्ञास्तथापरे ।
स्वाध्यायज्ञानयज्ञाश्च यतयः संशितव्रताः ॥ ४-२८ । ६१०
अपाने जुह्वति प्राणं प्राणेऽपानं तथापरे ।
प्राणापानगती रुध्वा प्राणायामपरायणाः ॥ ४-२९ । ६११
अपरे नियताहाराः प्राणान्प्राणेषु जुह्वति ।
सर्वेऽप्येते यज्ञविदो यज्ञक्षपितकल्मषाः ॥ ४-३० । ६१२
एवं बहुविधा यज्ञा वितता ब्रह्मणो मुखे ।
कर्मजान्विद्धि तान्सर्वानेवं ज्ञात्वा विमोक्ष्यसे ॥ ४-३२ । ६१३

शिवाय, या यज्ञसंस्थेची मर्यादा देवतांपुरतीच नव्हे तर ती त्याहिपेक्षां पुष्कळ विस्तृत अशी ब्रह्मदेवानें सांगितली आहे. यज्ञसंस्थेचे कमींत कमी चवदा प्रकार जे निर्दिष्ट करतां येतील ते असेः—

१ द्रव्ययज्ञ, २ देवयज्ञ, ३ ज्ञानेंद्रिययज्ञ, ४ विषययज्ञ, ५ स्वाध्यायज्ञानयज्ञ, ६ प्राणयज्ञ, ७ अपानयज्ञ, ८ प्राणापानयज्ञ, ९ अन्तरप्राणयज्ञ,

१० योगयज्ञ, ११ तपोयज्ञ, १२ जपयज्ञ, १३ इंद्रियप्राणकर्मयज्ञ, १४ ब्रह्मयज्ञ. ६०७–६१३

**यज्ञार्थात्कर्मणोऽन्यत्र लोकोऽयं कर्मबंधनः ।**
**तदर्थं कर्म कौंतेय मुक्तसंगः समाचर ॥** ३-९ । ६१४

ज्या कर्मामध्यें यज्ञक्रियेचा भाग नाहीं तें कर्म मात्र कर्त्याला फलभोग-प्रक्रियेच्या द्वारा बंधनकारक होणारच. मात्र फक्त यज्ञाकरतां[1] तूं कर्म खुशाल कर. ६१४

**यज्ञशिष्टाशिनः संतो मुच्यंते सर्वकिल्बिषैः ।**
**भुंजते ते त्वघं पापा ये पचंत्यात्मकारणात् ॥** ३-१३ । ६१५
**गतसंगस्य मुक्तस्य ज्ञानावस्थितचेतसः ।**
**यज्ञायाचरतः कर्म समग्रं प्रविलीयते ॥** ४-२३ । ६१६

जे लोक करावयाचें तें कर्म यज्ञाकरितां म्हणून निःसंगरीत्या करतात व त्या यज्ञाच्या फार तर प्रसादग्रहणद्वारां आपली उपजीविका करतात, ते सर्व पापापासून मुक्त होतात. मात्र याच्या उलट जे लोक स्वतःकरतांच कर्म करतात ते पापी होत. ६१५–६१६

**यज्ञशिष्टामृतभुजो यांति ब्रह्म सनातनम् ।**
**नायं लोकोऽस्त्ययज्ञस्य कुतोऽन्यः कुरुसत्तम ॥** ४-३१ । ६१७

वर सांगितल्याप्रमाणें यज्ञावशेषाचें यथेष्ट ग्रहण करणारे ब्रह्मपदप्राप्तीचे अधिकारी होत. परंतु यज्ञविरहित ज्यांचें कर्म असतें त्यांना इहलोकची जीवयात्राहि धड साधत नाहीं व परलोक तर नाहींच नाहीं. ६१७

**ब्रह्मार्पणं ब्रह्म हविर्ब्रह्माग्नौ ब्रह्मणा हुतम् ।**
**ब्रह्मैव तेन गंतव्यं ब्रह्मकर्मसमाधिना ॥** ४-२४ । ६१८

---

१. रस्त्यानें चालणारे दोन प्रवासी व त्यांना सापडलेली मोहोराची पिशवी ही जुन्या क्रमिक पुस्तकांतली गोष्ट पुष्कळ वाचकांच्या आठवणींतून गेली नसेल. पिशवी सापडली ती **मला** सापडली व मागून पोलीसचे शिपायी पिशवी उचलणारास पकडावयास आले असतां मात्र **आपण** गोष्ट वाईट केली. ही सामान्य दिसून येणारी वृत्ति ही यज्ञाचा व्यत्यास होय.

नाना प्रकारें यज्ञ करणाऱ्यांपैकीं ज्याला उद्देशून हवन करावयाचें तेंहि ब्रह्म, जें द्रव्य हवन करावयाचें तेंहि ब्रह्म, ज्या अग्निद्वारां हवन करावयाचें तो अग्निहि ब्रह्म, हवन करणारा स्वतःहि ब्रह्म, अशी ज्याची सर्व ब्रह्ममय भावना झाली तो यज्ञकर्म करणारा कर्मफलभोगाच्या कचाटींतून सुटून मोक्षाला जाणारच. ६१८

यत्करोषि यदश्नासि यज्जुहोषि ददासि यत् ।
यत्तपस्यासि कौंतेय तत्कुरुष्व मदर्पणम् ॥ ९-२७ । ६१९

सबब, अर्जुना, जें जें काय आहारविहारादि व अन्य कर्म करशील तें देखील सर्व मला अर्पण करण्याच्या बुद्धीनें कर. स्वतःकरतां करूं नकोस. ६१९

शुभाशुभफलैरेवं मोक्ष्यसे कर्मबंधनैः ।
संन्यासयोगयुक्तात्मा विमुक्तो मामुपैष्यसि ॥ ९-२८ । ६२०

म्हणजे त्या त्या कर्माच्या शुभाशुभफलभोगाच्या जबाबदारींतून तूं मोकळा होशील व याप्रमाणें तुझ्या ठिकाणीं कर्मसंन्यास व कर्मयोग यांचा योग्य समन्वय होऊन तूं मुक्त होशील. ६२०

तस्मादज्ञानसंभूतं हृत्स्थं ज्ञानासिनात्मनः ।
छित्त्वेनं संशयं योगमातिष्ठोत्तिष्ठ भारत ॥ ४-४२ । ६२१

सबब, तूं तूर्त मनांत बाळगीत असलेला अज्ञानजन्य संशय ज्ञानद्वारां काढून टाकून मी सांगितलेल्या समन्वयात्मक मार्गाचें अचरण कर. ६२१

भोक्तारं यज्ञतपसां सर्वलोकमहेश्वरम् ।
सुहृदं सर्वभूतानां ज्ञात्वा मां शांतिमृच्छति ॥ ५-२९ । ६२२

सर्व लोकांच्या अन्तर्यामीं असून त्यांना मित्रभावानें मदत करणारा असा जो मी तोच मी सर्व यज्ञांचा व सर्व तपांचा भोक्ता आहें हें ज्यानें जाणलें त्यालाच शांति मिळते. ६२२

हरिः ॐतत्सत्

इति रचनान्तरीकृतश्रीमद्भगवद्गीतासूपनिषत्सु० राजविद्याराजगुह्ययोगो नाम षोडषोऽध्यायः ॥ १६ ॥

---

# सप्तदशाध्याय

## कर्मफलसंन्यासयोग[१]

पूर्वाध्यायांत कर्मे ब्रह्मार्पणबुद्धीनें करणें श्रयेस्कर असल्याचें निवेदन केलें. परंतु तेवढयानेंच हातून कर्मे यथासांग होण्यास जी कर्त्याची मनोभूमिका लागते, ती पुरीशी तयार होत नाहीं. एक वेळ वृत्ति इतकी उदार बनूं शकेल कीं सहकार्य शक्य करण्याकरतां काय, पण पूर्वाध्यायाच्या उत्तरभागांत सांगितल्याप्रमाणें अगदीं ईश्वरार्पणबुद्धीनें, केवळ परोपकार करण्याकरतां, केवळ जगाच्या कल्याणाकरतांहि कर्मे करणें शक्य आहे. परंतु जें करावें त्यांत यश येत नाहीं, तें निष्फळ होतें, अशी जर वारंवार स्थिति होत जाईल तर त्या स्थितींतहि कर्मे करण्याची इच्छा टिकून राहील असें सामान्य अनुभवावरून दिसत नाहीं. पहिल्या उत्साहाच्या धडाडींत हातून प्रयत्न होतात, परंतु त्यांना अपयशाचे फटके बसतांच कर्त्याच्या नाड्या थंडावूं लागतात व तो शेवटीं कर्तृत्वहीन बनतो. किंवा, अन्य पक्षीं, जर कर्माला यशाचीं फलें येतील तर तीं इतकीं मादक असतात कीं, त्यांच्या आस्वादानें कर्त्याच्या अंगीं स्वकर्तृत्वाभिनिवेश येऊन बसतो, व दोन्हीहि पक्षीं परिणाम अध्यात्मिक दृष्ट्या अनिष्टच मानावा लागतो. ही भावना विषादप्रसंगीं अर्जुनाच्या मनाला चांगलीच झोंबत होती असें म्हणतां येईल. जय मिळणार कीं नाहीं हें कोणास ठाऊक (न चैतद्विद्मः कतरन्नो गरीयो यद्वा जयेम यदि वा नो जयेयुः। क्रमांक ३२) ही शंका अर्जुनाच्या मनाला डाचत नव्हती असें नाहीं. जय मिळणारच असल्यास लढावयाचें बघतां येईल. पण जय मिळणार नसल्यास विनाकारण कां धडपड करावी? अशा प्रकारचा युक्तिवाद फार सार्वत्रिक आहे. यवढेंच काय पण, जयाचा संभव असल्यासच कार्योन्मुख व्हावें हा केवळ सामान्य व्यवहारज्ञानाचा भाग समजला जातो. परंतु कार्याकार्याचा निर्णय करण्याची ही व्यापारी पद्धति श्रीभगवंताला मान्य नाहीं. कोणतेंहि कृत्य अविचारानें करावें अशा मताचा अवलंब श्रीभगवान् करीत नाहींत. परंतु स्वप्रकृतिधर्मानुरूप कर्म अविरतपणें व फळाची, जयापजयाची, अपेक्षा न धरतां

करीत राहणें हें भगवंताना इष्ट वाटतें.* " कर्तुरिच्छा बलीयसी " हें सुभाषित कर्त्याला कार्योन्मुख करण्यास ठीक असलें तरी, श्रीभगवंताच्या मतें यशसिद्धीला एकटा कर्ताच नव्हे पण त्यासह एकंदर पांच कारणांचा समुच्चय जरूर असतो, आणि इतर चार मिळणार कीं नाहीं या शंकेला बळी पडून कर्ता जर फुरगटून बसेल तर सर्व व्यवहार गोत्यांत येईल. सबब ही विचारसरणी त्याज्य होय व पूर्वीच सांगितल्याप्रमाणें " कर्मण्येवाधिकारस्ते मा फलेषु कदा चन " हेंच तत्त्व कार्यक्षम होय; आणि म्हणूनच समाजधारणेकरतां प्रत्येकानें फलाची अपेक्षा न ठेवतां प्रकृतिधर्मानुरूप अविरतपणें कर्म करीत रहावें असें भगवान् सांगतात.

या अध्यायाचें सूक्ष्म निरीक्षण करणारांना भगवान् प्रत्येक व्यक्तीला केवळ एक निर्जीव यंत्र बनवूं पाहून त्याकडून काम काढूं पहात आहेत, असें वाटण्याचा संभव आहे. यशाचा सात्त्विक आनंद व तदनुरूप व्यावहारिक सुख व्यक्तीला अनुभवूं न दिल्यास वैयक्तिक प्रेरणा अगर स्फूर्ति ( Individual Initiative ) शून्यत्वावर येऊन जगाचें नुकसान होईल असाहि ठराविक विवाद येथें पुढें आणणें शक्य आहे. परंतु याचें उत्तर दैवासुरसंपद्विभागांत दिलें गेलें आहे. सर्वांगीण सुधारणा, प्रगति, उत्क्रान्ति, संस्कृति या शब्दावडंबरांची पूर्ण कल्पना भगवंताना आहे व ती " नासतो विद्यते भावो नाभावो विद्यते सतः । उभयोरपि दृष्टोन्तस्त्वनयोस्तत्त्वदर्शिभिः" ॥७४॥ या श्लोकांत पूर्वीच निर्दिष्ट केली आहे.

भगवंताच्या मतें " कर्मफलत्यागयुक्त कर्माचरणानें " वैयक्तिक वर्तनाला नैतिक पूर्णत्व येतें व हें प्रस्थापित करून हा अध्याय व गीतेंतील प्रतिपाद्य विषय बहुतेक पूर्ण होतो.

---

* हिंदुस्थानसारख्या देशांत शेंकडा ८० लोक शेतीवर निर्वाह करीत आहे. तेथें शेतीच्या आयव्ययांचा विचार करून शेतींत फायदा असल्यासच आपण शेती करूं असें शेतकरी म्हणेल तर काय स्थिति होईल याचा विचार करूं गेल्यास भगवंताच्या म्हणण्यांत पुष्कळ अर्थ आहे असें म्हणतां येईल; आणि तसें पाहूं गेलें तर, शेतीशिवायच्या इतर त्रैवर्णिकांनाहि स्वतःच्या कष्टाचा मोबदला परदेशाच्या तुलनेंत मिळतो कीं काय हेंहि दर्शविणें कठीण नाहीं. परंतु त्यामुळें या चातुर्वर्णीयांना कर्मत्याग करावयास सांगणें इष्ट होईल काय ?

॥ अर्जुन उवाच ॥

**संन्यासं कर्मणां कृष्ण पुनर्योगं च शंससि ।**
**यच्छ्रेय एतयोरेकं तन्मे ब्रूहि सुनिश्चितम् ॥ ५-१ । ६२३**

अर्जुन म्हणतो—भगवन्, आपण एकदा कर्मसंन्यासाचा उपदेश करीत आहां तर लगेंच पुन्हा कर्मयोगाचा उपदेश करीत आहां. त्यानें माझा घोटाळा उडत आहे. तर या दोहोंपैकीं निश्चितपणें एक काय तें सांगा. ६२३

॥ श्रीभगवानुवाच ॥

**यं संन्यासमिति प्राहुर्योगं तं विद्धि पांडव ।**
**न ह्यसंन्यस्तसंकल्पो योगी भवति कश्चन ॥ ६-२ । ६२४**

यावर श्रीभगवान् उत्तर देतात—अर्जुना, अरे, ज्याला खरा* संन्यास म्हणतात तोच कर्मयोग होय. कारण, संकल्पत्यागाशिवाय संन्यास कसला ? ६२४

**सांख्ययोगौ पृथग्बालाः प्रवदंति न पंडिताः ।**
**एकमप्यास्थितः सम्यगुभयोर्विंदते फलम् ॥ ५-४ । ६२५**

संन्यास आणि मी उपदेशिलेला योग हे दोन होत असें म्हणणें हें अज्ञानाचें लक्षण होय. कारण यांपैकीं कोणत्याहि एकाचें आचरण नीट केलें कीं, दोहोंच्याहि आचरणाचें फळ मिळतें. ६२५

**यत्सांख्यैः प्राप्यते स्थानं तद्योगैरपि गम्यते ।**
**एकं सांख्यं च योगं च यः पश्यति स पश्यति ॥ ५-५ । ६२६**

खऱ्या संन्यासानें जें पद प्राप्त होतें तें कर्मयोगानेंहि होतें. सबब, जो या दोहोंना फलदृष्ट्या एकच मानतो त्यालाच त्या दोहोंचें खरें तत्त्व कळलें. ६२६

---

* हें पद लोकमान्यांनीं गीतारहस्यांत पान ६९३ वर वापरलें आहे; आणि संन्यासमार्गाची बाजू यथाशक्य संभाळून ठेवण्याच्या उद्देशानें गीतेंत या मार्गाला जें स्थान देण्यांत आलें आहे त्याच्या दृष्टीनें या पदाचा उपयोग करणें हाच उत्तम मार्ग वाटल्यावरून त्याचा उपयोग येथेंहि केला आहे.

अनाश्रितः कर्मफलं कार्यं कर्म करोति यः ।
स संन्यासी च योगी च न निरग्निर्न चाक्रियः ॥ ६-१ । ६२७

कर्मफलाची अपेक्षा न ठेवतां वर्णाश्रमविहित कर्तव्यें करणें हें लक्षण खऱ्या संन्याशाला व योग्यालाहि लागू पडण्यासारखें आहे, आणि या दृष्टीनें हे दोघेहि कर्मत्याग करणाऱ्यांपेक्षां वरिष्ठ दर्जाचे आहेत. ६२७

ज्ञेयः स नित्यसंन्यासी यो न द्वेष्टि न कांक्षति ।
निर्द्वंद्वो हि महाबाहो सुखं बंधात्प्रमुच्यते ॥ ५-३ । ६२८

ज्याला रागद्वेषादि द्वंद्वांची बाधा होत नाहीं तो संन्यासी होय. ६२८

संन्यासः कर्मयोगश्च निःश्रेयसकरावुभौ ।
तयोस्तु कर्मसंन्यासात्कर्मयोगो विशिष्यते ॥ ५-२। ६२९

तथापि एक गोष्ट खरी कीं, प्रस्तुतच्या[१] व्याख्येचा संन्यास आणि कर्मयोग हे दोन्हीहि मोक्षप्राप्तीच्या दृष्टीनें तुल्यबल असले तरी इहपरलोकसाधनाच्या संयुक्त दृष्टीनें पाहतां संन्यासापेक्षां कर्मयोग हाच जास्त महत्त्वाचा —उच्चतर दर्जाचा—आहे. ६२९

---

१. वरील " अनाश्रितः कर्मफलं०" आणि " संन्यासः कर्मयोगश्च० " या दोन श्लोकांतील कांहींशा विरोधामुळें टीकाकारांना त्यांचा समन्वय करणें फारच त्रासाचें झालें आहे व ही गोष्ट हे दोन्ही श्लोक एकाच विषयाचे अंगभूत व सबब एकत्र आणल्यानंतर ज्यास्तच डोळ्यांत भरणें शक्य आहे. मात्र हा केवळ गीता एकहाती नसल्याचा परिणाम होय. संन्याशी आणि निरग्नि यांचें साहचर्य फार पुरातन आहे. संन्यास म्हणजे केवळ कर्मफल-अनाश्रय नव्हे तर कर्मत्याग होय; आणि एवढ्याचमुळें संन्यासमार्गापेक्षां योगमार्ग श्रेष्ठ; या मताची घोषणा गातत भगवंतांना गीताध्येयाच्या दृष्टीनें करणें जरूर पडलें. सारांश, भगवंताच्या काळापर्यंत संन्यास म्हणजे निरग्नित्व हा अर्थ सर्वमान्य होता. त्यानंतर संन्यासमार्गाचा उद्धार करण्याच्या सद्धेतूनें कोणी संन्यासपक्षपाती लेखकानें " अनाश्रितः कर्मफलं० " हा श्लोक गीतेंतील सहाव्या अध्यायासह घुसडून दिला असल्यास नवल नाहीं.

संन्यासस्तु महाबाहो दुःखमाप्तुमयोगतः ।
योगयुक्तो मुनिर्ब्रह्म न चिरेणाधिगच्छति ॥ ५-६ । ६३०

शिवाय अन्य एक कारण असें आहे कीं, संन्यस्तवृत्ति स्वीकारणें, संभाळणें ही फार कष्टसाध्य बाब आहे. उलट कर्मयोगाचें अचारण तितकें बिकट नसून त्या यागानें ( Practice makes perfect या पद्धतीनें ) सिद्धीहि लवकर मिळते. ६३०

अयुक्तः कामकारेण फले सक्तो निबद्ध्यते ।
युक्तः कर्मफलं त्यक्त्वा शांतिमाप्नोति नैष्ठिकीम् ॥ ५-१२ । ६३१

ज्याला कर्मे करण्याची ही युक्ति माहीत नाहीं, तो फलभोगाच्या मोहांत गुंतला कीं, त्यामुळें कर्मविपाकप्रक्रियेप्रमाणें बद्ध होतो व ज्याला ही फलत्यागाची युक्ति ठाऊक आहे, तो कर्मे करूनहि शान्तिसुख अनुभवीत असतो. ६३१

कायेन मनसा बुद्ध्या केवलैरिंद्रियैरपि ।
योगिनः कर्म कुर्वंति संगं त्यक्त्वात्मशुद्धये ॥ ५-११ । ६३२

योगी लोक केवळ अंतःकरणशुद्धीकरितां कायिक, वाचिक, मानसिक, बौद्धिक वगैरे कर्मे करीत असतात. ६३२

आरुरुक्षोर्मुनेर्योगं कर्म कारणमुच्यते ।
योगारूढस्य तस्यैव शमः कारणमुच्यते ॥ ६-३ । ६३३

सिद्धीकरतां प्रयत्न करीत असतांना, योगी याप्रमाणें अंतःकरणशुद्धी-करितां कर्मे करतो, तर तोच सिद्धि प्राप्त झाल्यानंतर कर्मफलभोगाच्या भीतींतून सुटल्यामुळें निर्भय चित्तानें कर्मे करीत असतो. ६३३

नैव किंचित्करोमीति युक्तो मन्येत तत्त्ववित् ।
पश्यन्शृण्वन्स्पृशन्जिघ्रन्नश्नन्गच्छन्स्वपन्श्वसन् ॥ ५-८ । ६३४

प्रलपन्विसृजन्गृह्णन्नुन्मिषन्निमिषन्नपि ।
इंद्रियाणींद्रियार्थेषु वर्तंत इति धारयन् ॥ ५-९ । ६३५

अशा अवस्थेंत त्याचे सर्व ऐंद्रिय व्यवहार चालू असतां इंद्रियें आपआपल्या विषयांत रममाण होत आहेत व मी अगदीं त्या कर्मापासून तुटक, वेगळा आहें अशी त्याच्या मनाची भावना असते. ६३४–६३५

[1]ये हि संस्पर्शजा भोगा दुःखयोनय एव ते ।
आद्यंतवंतः कौंतेय न तेषु रमते बुधः ॥ ५-२२ । ६३६

कारण इंद्रियांना बाह्यस्पर्शापासून उत्पन्न होणारीं सुखें हीं खरोखर दुःखापासून उत्पन्न झालेलीं असून त्यांना आदीहि आहे व अन्तहि आहे. ही गोष्ट लक्षांत घेऊन ज्ञानी त्याच्यांत मौज मानीत नाहींत. ६३६

बाह्यस्पर्शेष्वसक्तात्मा विंदत्यात्मनि यत्सुखम् ।
स ब्रह्मयोगयुक्तात्मा सुखमक्षय्यमश्नुते ॥ ५-२१ । ६३७
यदा हि नेंद्रियार्थेषु न कर्मस्वनुषज्जते ।
सर्वसंकल्पसंन्यासी योगारूढस्तदोच्यते ॥ ६-४ । ६३८

या बाह्य स्पर्शापासून उत्पन्न होणाऱ्या सुखाची ज्यानें पर्वा बाळगली नाहीं त्याला त्याच्या अंतःकरणांत असलेल्या सुखशांतीची प्राप्ति होते व ब्रह्मशक्तीशीं ज्यानें आपलें ऐक्य प्रस्थापित केलें, त्याला तर हें सुख कायमचें अनुभवावयास मिळतें. सबब, इंद्रियविषयांत आणि ते विषय प्राप्त करून देणाऱ्या कर्मांत मौज मानावयाचें जेव्हां सुटतें, तेव्हांच योगपूर्ण होण्याची स्थिति येते. ६३७–६३८

सर्वकर्माणि मनसा संन्यस्यास्ते सुखं वशी ।
नवद्वारे पुरे देही नैव कुर्वन्न कारयन् ॥ ५-१३ । ६३९

---

१. इंद्रियसुखाचा उद्भव, ज्ञानेंद्रियांच्या ठिकाणीं असलेल्या मज्जातंतूंच्या अग्रावर बाहेरून कशाचा ना कशाचा तरी, उदाहरणार्थ हवेच्या लाटांचा, प्रकाशकिरणांचा, स्पर्श झाल्यामुळेंच होतो. यांना दुःखोद्भव मानण्याचें कारण मात्र हें कीं, ते स्थायीसुखाच्या हानीपासून उत्पन्न होणारे गोचरी सुखाचे अनुभव होत. थोडक्यांत हा मुद्दा स्पष्ट करणें कठीण असलें तरी सुख हें संज्ञानमय आहे आणि संज्ञान हें स्वास्थ्यहानिमय आहे हें सर्वश्रुतच आहे; आणि हाच भाव पुढील श्लोकांतहि व्यक्त आहे.

आणि अशा अवस्थेंत इंद्रियें स्वतःचे व्यापार करीत असतांहि त्यांचें कर्तृत्व कर्ता आपल्याकडे घेत नाहीं. ६३९

न प्रहृष्येत्प्रियं प्राप्य नोद्विजेत्प्राप्य चाप्रियम्।
स्थिरबुद्धिरसंमूढो ब्रह्मविद् ब्रह्मणि स्थितः॥ ५-२० । ६४०

अशा अवस्थेंत वागण्याचा उत्तम मार्ग म्हणजे सुखप्राप्तीनें हुरळून न जाणें व दुःखप्राप्तीनें उमळून न जाणें हा होय. ६४०

विद्याविनयसंपन्ने ब्राह्मणे गवि हस्तिनि।
शुनि चैव श्वपाके च पंडिताः समदर्शिनः॥ ५-१८ । ६४१

दृश्य विश्वांतील न्युनाधिक भाव हे केवळ क्षणिक समजून त्यांच्या परस्परविरोधी अशा जोड्या लावीत न बसतां ते सर्व केवळ व्यावहारिक भेदाच्या[1] किंमतीचे मानून तत्त्वदृष्ट्या त्यांना समान मानावेत. ६४१

इहैव तैर्जितः सर्गो येषां साम्ये स्थितं मनः।
निर्दोषं हि समं ब्रह्म तस्माद् ब्रह्मणि ते स्थिताः॥५-१९ । ६४२

विशेषतः अशी साम्यबुद्धि ज्यांना सदेह अवस्थेंतच प्राप्त झाली ते ब्रह्मस्वरूप होत; कारण ब्रह्म हें सर्वत्र समभावानें वागणारें आहे. ६४२

पंचैतानि महाबाहो कारणानि निबोध मे।
सांख्ये कृतांते प्रोक्तानि सिद्धये सर्वकर्मणाम्॥ १८-१३ । ६४३
अधिष्ठानं तथा कर्ता करणं च पृथग्विधम्।
विविधाश्च पृथक्चेष्टा दैवं चैवात्र पंचमम्॥ १८-१४ । ६४४
शरीरवाङ्मनोभिर्यत्कर्म प्रारभते नरः।
न्याय्यं वा विपरीतं वा पंचैते तस्य हेतवः॥ १८-१५ । ६४५

शिवाय, कर्मफलाबद्दल इतकी अनासक्ति ठेवण्याचें दुसरें एक कारण असं आहे कीं, कर्मफलप्राप्तिहि केवळ एकट्या कर्त्याच्या हातची बाब नव्हे; तर कोणतेंहि बरें अगर वाईट, शारीरिक, वाचिक व मानसिक कर्म फलद्रूप होण्यास कर्ता, साधनसामग्री, प्रक्रिया, स्थलकालानुकूल्य आणि त्या विशिष्ट

---

१. A difference of degree and not of category.

कर्मास वरिष्ठ ईश्वरी सत्तेची अनुकूलता या एकंदर पांच गोष्टींचा युक्त समवाय कारणीभूत होतो. ६४३–६४५

**तत्रैवं सति कर्तारमात्मानं केवलं तु यः ।**
**पश्यत्यकृतबुद्धित्वान्न स पश्यति दुर्मतिः ॥ १८-१६ । ६४६**

असें असतां, केवळ एकट्या स्वतः सर्व कर्त्यानेंच कर्मफलाबद्दल तीव्र आकांक्षा धारण करणें म्हणजे फल मिळाल्यास मिथ्याभिनिवेश व न मिळाल्यास नैराश्यजनित दुःख यांचीच मार्गप्रतीक्षा करणें होय. ६४६

**यस्य नाहंकृतो भावो बुद्धिर्यस्य न लिप्यते ।**
**हत्वापि स इमांल्लोकान्न हंति न निबध्यते ॥ १८-१७ । ६४७**

उलट, असला मिथ्या अहंकार ज्याच्या बुद्धीला चिकटलेला नाहीं, त्यानें सर्व जगाचा संहार जरी केला तरी त्याच्या मनांत स्वकर्तृत्वभाव नसल्यानें त्या संहाराच्या पापाची जबाबदारी त्यावर येत नाहीं. ६४७

**निराशीर्यतचित्तात्मा त्यक्तसर्वपरिग्रहः ।**
**शारीरं केवलं कर्म कुर्वन्नाप्नोति किल्बिषम् ॥ ४-२१ । ६४८**

ज्याला कसलीहि अपेक्षा नाहीं, जो दुसऱ्यानें दिलेलें कांहींहि घेत नाहीं व ज्यानें आपलें मन पूर्णपणें ताब्यांत ठेवलें आहे तो केवळ शरीरानें कर्में करीत असतांना त्याला मरणोत्तर त्या कर्मांच्या फलभोगाची भीति नसते.

याप्रमाणें कर्मफलाबद्दल आसक्ति ठेवल्यानंतर तृप्त अन्तःकरणानें कर्में करण्यांतच कर्ता गढून गेला असल्यास देखील त्यानें कांहींएक न केल्यासारखेंच आहे. ६४८

**योगयुक्तो विशुद्धात्मा विजितात्मा जितेंद्रियः ।**
**सर्वभूतात्मभूतात्मा कुर्वन्नपि न लिप्यते ॥ ५-७ । ६४९**

जो इंद्रियजेता आहे, ज्यानें अनासक्तीनें कर्में आरंभिलीं आहेत, ज्यांची बुद्धि शुद्ध आहे व आत्मदृष्टया जो स्वतःचें सर्व भूतांशीं ऐक्य ओळखूं शकतो, त्यानें करावयाचीं तीं कर्में केल्यास त्याला पाप असें कसलेंच लागत नाहीं. ६४९

ब्रह्मण्याधाय कर्माणि संगं त्यक्त्वा करोति यः ।
लिप्यते न स पापेन पद्मपत्रमिवांभसा ॥ ५-१० । ६५०

जो सर्व कर्में ब्रह्मार्पणबुद्धीनें करतो व त्या कर्माच्या फलाबद्दल आसक्ति ठेवीत नाहीं तो, कमळ हें पाण्यांत असूनहि ज्याप्रमाणें ओलें होत नाहीं, त्याप्रमाणें त्या कर्माच्या पापपुण्य फलभोगाच्या जबाबदारीनें स्पृष्ट होत नाहीं. ६५०

शक्नोतीहैव यः सोढुं प्राक्शरीरविमोक्षणात् ।
कामक्रोधोद्भवं वेगं स युक्तः स सुखी नरः ॥ ५-२३ । ६५१

याप्रमाणें कर्मफलाच्या ठिकाणची कामना व ती पूर्ण न झाल्यास येणारा क्रोध यांपासून जो सुटला तोच योगी व तोच सुखी. ६५१

कामक्रोधवियुक्तानां यतीनां यतचेतसाम् ।
अभितो ब्रह्मनिर्वाणं वर्तते विदितात्मनाम् ॥ ५-२६ । ६५२

अशा प्रकारच्या यतीला सर्वत्र ब्रह्मभावच अनुभवास येतो. ६५२

यतेंद्रियमनोबुद्धिर्मुनिर्मोक्षपरायणः ।
विगतेच्छाभयक्रोधो यः सदा मुक्त एव सः ॥ ५-२८ । ६५३

इंद्रियें, मन व बुद्धि यांचा जय करून आणि इच्छा, भय व क्रोध यांचा त्याग करून जो राहिला तो त्यानंतर सदैव मुक्तच. ६५३

योंऽतःसुखोंऽतरारामस्तथांतर्ज्योतिरेव यः ।
स योगी ब्रह्मनिर्वाणं ब्रह्मभूतोऽधिगच्छति ॥ ५-२४ । ६५४

जो इंद्रियसुखाची आकांक्षा न ठेवतां अंतःकरणांत सुख प्राप्त करून घेतो व तेथेंच शान्ति व ज्ञान यांचा ठेवा अनुभवूं लागतो तो योगी ब्रह्ममय होऊन ब्रह्मपदाला पोहोंचतो. ६५४

तद् बुद्धयस्तदात्मानस्तन्निष्ठास्तत्परायणाः ।
गच्छंत्यपुनरावृत्तिं ज्ञाननिर्धूतकल्मषाः ॥ ५-१७ । ६५५

आणि एकदां त्या परम तत्त्वांत ज्यांची बुद्धि रंगली, ज्यांचा आत्मा

तेथेंच ऐक्यसुख अनुभवूं लागून तेथेंच चिकटून राहूं लागला, त्याची पुनर्जन्ममरणांची यातायात चुकली. ६५५

**लभंते ब्रह्मनिर्वाणमृषयः क्षीणकल्मषाः ।**
**छिन्नद्वैधा यतात्मानः सर्वभूतहिते रताः ॥** ५-२५ । ६५६

अशा प्रकारचें ब्रह्मपद द्वैतातीत, निष्पाप, सर्वभूतहितरत असलेल्या योग्यालाहि प्राप्त होतें ( सबब अर्जुना, असला सर्वभूतहितरत योगी हो. ) ६५६

**हरिः ॐतत्सत्**

**इति रचनान्तरीकृतश्रीमद्भगवद्गीतासूपनिषत्सु० अधिभूतयोगो नाम द्वादशोऽध्यायः ॥ १२ ॥**

---

## अष्टदशाध्याय

# विषादनिरसनयोग

प्रस्तुत अध्याय हा श्रीमद्भगवद्गीतेचा उपसंहारात्मक अध्याय होय. या अध्यायांत नवीन असें कांहीं तत्त्व प्रतिपादन केलें आहे असें फारसें नाहीं. तथापि गीतेंतील प्रधान सिद्धांतोपदेशाच्या पुनरुच्चारणाला उपसंहारांत अवसर मिळाल्यास त्यानें प्रतिपाद्य विषयाची रसहानि न होतां रसपरिपोषच होणें शक्य व इष्ट असल्यामुळें अध्यायाच्या सुरुवातीस फलाशात्याग करीत असतांच वर्णाश्रमविहित प्रकृतिधर्मानुसार कर्में करीत राहण्याच्या उपदेशाची पुनरुक्ति अर्जुनाच्या प्रश्नाचें निमित्त करून भगवंताच्या मुखानें कवीनें मोठ्या कुशलतेनें करविली आहे. त्याग ही एक नवीन संज्ञा या अध्यायांत आलेली दिसते. पण त्या संज्ञेनें कोणताहि नवीन भाव उद्दिष्ट नाहीं. संन्यास म्हणजे कर्मत्याग व त्याग म्हणजे कर्मफलाशात्यागपूर्वक कर्माचरण होय. यानंतर श्रीभगवान् वर्णाश्रमविहित कर्में करण्याच्या उपदेशाच्या जोडीस चातुर्वर्णाश्रमविहित कर्मांची एक यादी अर्जुनाच्या माहितीसाठीं देत आहेत व त्यांत क्षात्रवीर अर्जुनाची स्वक्षात्रकर्तव्याची ओळख ताजी तरतरीत

करण्याचें कार्य होत आहे. ही वर्णाश्रमविहित कर्तव्याची योजना बाह्यारोपित नसून ती केवळ विशिष्ट वर्णाच्या अंतस्थ प्राकृतिक घटनेचें व्यवहारसिद्ध निरूपण होय; आणि तदनुरूप आचरण करावें या उपदेशाचें रहस्य एवढेंच कीं, ज्याअर्थी विशिष्ट प्राकृतिक घटना भावानुरूप कर्माचा स्वीकर घेतल्याशिवाय राहणार नाहीं त्याअर्थी त्याविरुद्ध आचरण करण्याच्या क्षणिक मोहानें प्रसंगातिक्रमण होऊं दिल्यास "इदं च नास्ति परं न लभ्यते" असला अनवस्थाप्रसंग टळावा हें होय. शिवाय ही प्राकृतिक घटना म्हणजेच सर्वस्व नव्हे. त्या घटनेला नियामक अशी वरील ईश्वरी शक्ति सर्वत्र आहे व प्रसंगविशेषीं ती विशिष्ट प्रकारें आविर्भूत होऊन, स्वतःच्या धोरणानुरूप विशिष्ट गोष्टी विशिष्ट प्राकृतिक घटनेकडून जरूर तर जबरदस्तीनेंहि घडवून आणणेंहि त्या शक्तीला शक्य आहे; ही गोष्ट भगवान् या अध्यायांत अर्जुनाच्या नजरेस पुन्हा आणीत आहेत. शेवटीं अर्जुनानें पिंडब्रह्मांडन्यायानें आपली अध्यात्मिक, अधिदैविक व अधिभौतिक अशी त्रिसंयुक्त व्यक्तिघटना ओळखून आपल्या अध्यात्मिक भावानुसार सर्वात्म्यैक्य ओळखावें, आपली अधिदैविक घटना भक्तियुक्त अंतःकरणानें ईश्वरार्पण करावी व आपल्या अधिभौतिक घटनेनुसार वर्णाश्रमविहित प्राप्तकाल कर्तव्य कर्मफलाशा न ठेवतां व निरहंकारवृत्तीनें करावें अशा प्रकारचा अत्यंत गहन, गंभीर, तत्त्वपूर्ण व व्यवहारसुकर असा अखेरचा उपदेश करून भगवान् गीतोपदेश समाप्त करतात. यानंतर अर्जुनाला "आतां या उपदेशानंतर तुला जें करावेंसें वाटत असेल तें स्वेच्छेनें कर." असें स्वकर्माबाबत वैयक्तिक क्रियास्वातंत्र्यहि देतात. अर्थात् अर्जुनाला भगवंताच्या उपदेशाचें रहस्य पूर्णपणें पटलें असल्यामुळें व गीतारंभीं उत्पन्न झालेला त्याचा विषाद नाहींसा झाला असल्यामुळें तो स्वकर्तव्य जें युद्ध तें करण्याची आपली तयारी भगवंताजवळ जाहीर करतो; आणि याप्रमाणें गीतोपनिषद् संपूर्ण व सफल होतें.

---

॥ अर्जुन उवाच ॥

संन्यासस्य महाबाहो तत्त्वमिच्छामि वेदितुम् ।
त्यागस्य च हृषीकेश पृथक्केशिनिषूदन ॥ १८-१ । ६५७

अर्जुन विचारतोः—भगवन्, आतां एकदा फक्त संन्यास आणि त्याग यांतील तात्त्विक भेद मला सांगा. ६५७

॥ श्रीभगवानुवाच ॥

काम्यानां कर्मणां न्यासं संन्यासं कवयो विदुः ।
सर्वकर्मफलत्यागं प्राहुस्त्यागं विचक्षणाः ॥ १८-२ । ६५८

श्रीभगवान् सांगतातः—अर्जुना, काम्यकर्मांचा त्याग म्हणजे संन्यास व फक्त कर्मफलाशेचा त्याग करून वर्णाश्रमविहित सर्व कर्मे करीत राहणें याचें नांव त्याग. संन्याससंज्ञेनें कर्मत्याग उद्दिष्ट आहे, तर त्यागसंज्ञेनें फक्त फलाशेचा त्याग उद्दिष्ट असून कर्माचरण उपदिष्ट आहे. ६५८

त्याज्यं दोषवदित्येके कर्म प्राहुर्मनीषिणः ।
यज्ञदानतपःकर्म न त्याज्यमिति चापरे ॥ १८-३ । ६५९

कोणी म्हणतात कर्मत्याग करावा, कोणी म्हणतात कर्मत्याग करूं नये. ६५९

निश्चयं शृणु मे तत्र त्यागे भरतसत्तम ।
त्यागो हि पुरुषव्याघ्र त्रिविधः संप्रकीर्तितः ॥ १८-४ । ६६०

पण या बाबतींत माझें निश्चित मत असें आहे कीं, प्रथम त्याग हा सात्त्विक, राजस व तामस असा त्रिविध आहे. ६६०

नियतस्य तु संन्यासः कर्मणो नोपपद्यते ।
मोहात्तस्य परित्यागस्तामसः परिकीर्तितः ॥ १८-७ । ६६१

वर्णाश्रमविहित कर्मांचा त्याग योग्य नव्हे. मोहामुळें त्याचा त्याग करणें हा तामस त्याग होय. ६६१

दुःखमित्येव यत्कर्म कायक्लेशभयात्त्यजेत् ।
स कृत्वा राजसं त्यागं नैव त्यागफलं लभेत् ॥ १८-८ । ६६२
कार्यमित्येव यत्कर्म नियतं क्रियतेऽर्जुन ।
संगं त्यक्त्वा फलं चैव स त्यागः सात्त्विको मतः ॥ १८-९ । ६६३

वर्णाश्रमविहित कर्मे त्रासदायक असल्याच्या सबबीवर त्यांचा त्याग करणें हा राजस त्याग होय. कर्मविपाकप्रक्रियेनुरूप त्यांना फलभोग शक्य आहे व त्यांत पुनर्जन्ममरणांच्या दुःखाचा अन्तर्भाव होतो, सबब तीं टाकावीत, ही संन्यासमार्गी विचारसरणी राजस त्यागाच्या रूपाची होय. पण वर्णाश्रम-विहित कर्मे निःसंगवृत्तीनें फलाशा न ठेवतां करणें हा सात्त्विक त्याग होय.

६६२–६६३

यज्ञदानतपःकर्म न त्याज्यं कार्यमेव तत् ।
यज्ञो दानं तपश्चैव पावनानि मनीषिणाम् ॥ १८-५ । ६६४

विशेषतः यज्ञकर्म, ज्ञानकर्म, तपःकर्म हीं कर्मे चित्तशुद्धीकारक असल्या-मुळें त्यांचा त्याग करूं नये. ६६४

एतान्यपि तु कर्माणि संगं त्यक्त्वा फलानि च ।
कर्तव्यानीति मे पार्थ निश्चितं मतमुत्तमम् ॥ १८-६ । ६६५

सबब, फक्त हीं कर्मे फलाशा न ठेवतां निःसंगवृत्तीनें करावींत हें याबाबत माझें निश्चित मत होय. ६६५

न द्वेष्ट्यकुशलं कर्म कुशले नानुषज्जते ।
त्यागी सत्त्वसमाविष्टो मेधावी छिन्नसंशयः ॥ १८-१० । ६६६

फायद्याच्या स्वकर्माची आवड व तोट्याच्या स्वकर्माचा तिटकारा असला दुजा भाव बुद्धिमान्, सत्त्वशील कर्माच्या ठिकाणीं ठेवीत नाहीं.

६६६

नहि देहभृता शक्यं त्यक्तुं कर्माण्यशेषतः ।
यस्तु कर्मफलत्यागी स त्यागीत्यभिधीयते ॥ १८-११ । ६६७

प्राकृतिक घटनेचा देह धारण करणाऱ्या कोणत्याहि व्यक्तीला कर्मत्याग विशेषपणें करणेंच शक्य नाहीं. सबब, फक्त फलाशात्याग केला म्हणजे झालें. ६६७

अनिष्टमिष्टं मिश्रं च त्रिविधं कर्मणः फलम् ।
भवत्यत्यागिनां प्रेत्य न तु संन्यासिनां क्वचित् ॥ १८-१२ । ६६८

कर्मांचें इष्ट, अनिष्ट व मिश्र अशा तीन प्रकारांचें फल फक्त कर्मफलाशेचा त्याग न करणारांनाच अनुभवावें लागतें. पण ज्यांनीं कर्मफलाशेचाच त्याग केला आहे, त्यांना या त्रिविध भेदाची बाधा होत नाहीं. ६६८

ब्राह्मणक्षत्रियविशां शूद्राणां च परंतप ।
कर्माणि प्रविभक्तानि स्वभावप्रभवैर्गुणैः ॥ १८-४१ । ६६९

चातुर्वर्णिकांनीं करावयाचीं वर्णाश्रमविहित कर्में हीं त्याच्या त्याच्या भिन्न भिन्न प्रकृतिधर्मानुसार पृथक् पृथक् आहेत; तीं अशीं:—६६९

शमो दमस्तपः शौचं क्षान्तिरार्जवमेव च ।
ज्ञानं विज्ञानमास्तिक्यं ब्रह्मकर्म स्वभावजम् ॥ १८-४२ । ६७०
शौर्यं तेजो धृतिर्दाक्ष्यं युद्धे चाप्यपलायनम् ।
दानमीश्वरभावश्च क्षात्रं कर्म स्वभावजम् ॥ १८-४३ । ६७१

अर्जुना, यांपैकीं रणांगणावर शत्रूला पाठ दाखवून पळून न जाणें हें क्षत्रियाचें कर्म तूं लक्षांत ठेवण्यासारखें आहे. ६७०–६७१

कृषिगोरक्ष्यवाणिज्यं वैश्यकर्म स्वभावजम् ।
परिचर्यात्मकं कर्म शूद्रस्यापि स्वभावजम् ॥ १८-४४ । ६७२
स्वे स्वे कर्मण्यभिरतः संसिद्धिं लभते नरः
स्वकर्मनिरतः सिद्धिं यथा विंदति तच्छृणु ॥ १८-४५ । ६७३

स्ववर्णाश्रमविहित कर्में फलाशा न ठेवतां करीत राहण्यानेंच प्रत्येक वर्णाच्या प्रत्येक व्यक्तीला मोक्ष मिळतो. ६७२-६७३

यतः प्रवृत्तिर्भूतानां येन सर्वमिदं ततम् ।
स्वकर्मणा तमभ्यर्च्य सिद्धिं विंदति मानवः ।। १८-४६ । ६७४

कारण ही कर्मभमि अगर हें प्राकृत जड जग म्हणजे महत् ब्रह्म अगर ब्रह्मशक्तीचा जड आविर्भाव होय आणि या जडब्रह्माची पूजा प्रकृतिधर्मानुरूप ठरविलेल्या स्ववर्णाश्रमविहित कर्माच्या निष्काम आचरणानेंच शक्य आहे; अन्य प्रकारें शक्य नाहीं. ६७४

श्रेयान्स्वधर्मो विगुणः परधर्मात्स्वनुष्ठितात् ।
स्वभावनियतं कर्म कुर्वन्नाप्नोति किल्बिषम् ।। १८-४७ । ६७५

सबब, परवर्णाश्रमविहित कर्में दिसण्यांत सोपीं दिसलीं तरी त्यांचा इव्यास करण्याऐवजीं स्ववर्णाश्रमविहित कर्में करणें हें केव्हांहि जास्त श्रेयस्कर होय. स्वप्रकृतिधर्मानुरूप आचरण करण्यांत पाप नसतें. ६७५

सहजं कर्म कौंतेय सदोषमपि न त्यजेत् ।
सर्वारंभा हि दोषेण धूमेनाग्निरिवावृताः ॥ १८-४८ । ६७६

तें दिसण्यांत दोषयुक्त दिसलें तरी त्या स्ववर्णाश्रमविहित कर्माचा कंटाळा, त्याग करूं नये; कारण सर्व वर्णाश्रमविहित कर्में सुरुवातीस थोडींफार दोषयुक्तच वाटतात. त्यांचें उज्ज्वल शुद्ध स्वरूप कालांतरानें प्रत्ययास येतें. ६७६

स्वभावजेन कौंतेय निबद्धः स्वेन कर्मणा ।
कर्तुं नेच्छसि यन्मोहात्करिष्यस्यवशोऽपि तत् ॥१८-६० । ६७७

अर्जुना, तूं स्वतःच्या क्षात्रप्रकृतिधर्मानुरूप युद्धकर्म करण्यास बांधलेला आहेस; आणि सध्यां थोडा वेळ भ्रमानें तूं तें कर्म करावयाचें नाकारीत असलास तरी वळ येतांच तें तूं अगदीं अगतिरीत्या, नाइलाज म्हणून करशील. ६७७

यदहंकारमाश्रित्य न योत्स्य इति मन्यसे ।
मिथ्यैष व्यवसायस्ते प्रकृतिस्त्वां नियोक्ष्यति ।। १८-५९ । ६७८

सांप्रत अहंकारानें " मी युद्ध करणारा, आणि ज्याअर्थी युद्ध हें पापमय आहे, त्याअर्थी मी लढूं इच्छित नाहीं," ही जी भाषा तूं बोलत आहेस

ती व्यर्थ होय. कारण, रणांगणावर शस्त्रास्त्राचा खणखणाट होऊं लागतांच तुझी क्षात्रप्रकृति तुला युद्ध करावयास लावीलच. ६७८

ईश्वरः सर्वभूतानां हृद्देशेऽर्जुन तिष्ठति ।
भ्रामयन्सर्वभूतानि यंत्रारूढानि मायया ॥ १८-६१ । ६७९

शिवाय, सर्व भूतांच्या ठायीं ईश्वर भरलेला आहे. तोच त्या सर्वांना चालना देतो व त्यांचें नियमन करतो. व्यक्ती या सर्व एका प्रचंड विश्व-यंत्रांतील लहान लहान भाग अगर चक्रें होत; आणि या यंत्राचें नियंतत्व वरिष्ठ अशा ईशशक्तीकडे आहे. त्या शक्तीच्या प्रेरणेनें हें विश्वयंत्र फिरत आहे. अशा स्थितींत या प्रचंड विश्वयंत्रापैकीं एका लहान चक्रानें मी फिरणार नाहीं असा आग्रह धरण्यांत काय अर्थ? ६७९

तमेव शरणं गच्छ सर्वभावेन भारत ।
तत्प्रसादात्परां शांतिं स्थानं प्राप्स्यसि शाश्वतम् ॥
१८-६२ । ६८०

सबब, हा प्रतिरोधाचा मार्ग सोडून तूं त्या वरिष्ठ शक्तीला शरण जा व तुझ्या वैयक्तिक व्यवसायाचें धोरण त्या वरिष्ठ शक्तीच्या धोरणाशीं जुळतें येईल असें कर; म्हणजे तुझे व्यवहार सुरळीत चालून तुला शांति मिळेल व शाश्वतपदप्राप्ति होईल. ६८०

सर्वगुह्यतमं भूयः शृणु मे परमं वचः ।
इष्टोऽसि मे दृढमिति ततो वक्ष्यामि ते हितम् ॥ १८-६४ । ६८१

याहिपेक्षां तुला अत्यंत गुह्य अशी एक गोष्ट, तूं मला फार प्रिय आहेस म्हणून सांगतों. ६८१

मन्मना भव मद्भक्तो मद्याजी मां नमस्कुरु ।
मामेवैष्यसि सत्यं ते प्रतिजाने प्रियोऽसि मे ॥ १८-६५ । ६८२

तूं माझ्या ईश्वरी भावाच्या ठिकाणीं तुझें चित्त स्थिर कर व त्या भावाची सर्व प्रकारें भक्ति कर, म्हणजे तूं त्या भावाप्रत येऊन मिळशील हें निश्चित समज. ६८२

सर्वधर्मान्परित्यज्य मामेकं शरणं व्रज ।[1]
अहं त्वा सर्वपापेभ्यो मोक्षयिष्यामि मा शुचः ॥ १८-६६ । ६८३

तूं नाना मतपंथ सोडून देऊन माझ्या ईश्वरी भावाचा आश्रय कर. तो ईश्वरी भाव तुला पापाच्या नाना कल्पनांपासून मुक्त करील. तूं विषण्ण होऊं नकोस. ६८३

मच्चित्तः सर्वदुर्गाणि मत्प्रसादात्तरिष्यसि ।
अथ चेत्त्वमहंकारान्न श्रोष्यसि विनंक्ष्यसि ॥ १८-५८ । ६८४

तूं या माझ्या ईश्वरी भावामध्यें जर तुझें चित्त स्थिर करशील तर तुझीं सर्व संकटें दूर होतील. मात्र अहंकाराचा आश्रय करून तूं हें न ऐकशील तर तुझी गति धड नाहीं. ६८४

तस्मात्सर्वेषु कालेषु मामनुस्मर युध्य च ।
मय्यर्पितमनोबुद्धिर्मामेवैष्यस्यसंशयम् ॥ ८-७ । ६८५

सबब, नेहमीं माझ्या ईश्वरी भावाचें चिंतन करीत राहून तूं यथेच्छ रणसंग्राम कर. तुझें मन व बुद्धि माझ्या ईश्वरी भावाकडे असल्यास तूंच त्या उच्च भावाप्रत निःसंशयपणें जाऊन मिळशील. ६८५

चेतसा सर्वकर्माणि मयि संन्यस्य मत्परः ।
बुद्धियोगमुपाश्रित्य मच्चित्तः सततं भव ॥ १८-५७ । ६८६

मनानें सर्व कर्मे तूं या माझ्या ईश्वरी भावाला अर्पण कर व त्या ईश्वरी भावालाच स्वतःला वाहून घेऊन निष्काम रीतीनें कर्मे करण्याच्या तुला सांगितलेल्या युक्तीनें कर्म कर. ६८६

मयि सर्वाणि कर्माणि संन्यस्याध्यात्मचेतसा ।[2]
निराशीर्निर्ममो भूत्वा युद्ध्यस्व विगतज्वरः ॥ ३-३० । ६८७

---

१. हे दोन श्लोक भक्तिमार्गोपदेशकर असल्यामुळें त्यांना भक्तियोगांतल्या अध्यायांत स्थान देणें युक्त वाटणें शक्य आहे. परंतु भगवद्गीतेचें रहस्य केवळ 'कर्मोपदेश' हें नसून त्याला भक्तीचेंहि एक पुष्टिपत्र असल्यामुळें या श्लोकांना येथें स्थान दिलें आहे.

२. हाच ज्ञानपूर्वक भक्तियुक्त कर्मोपदेश व हेंच गीतासार अगर गीतारहस्य होय.

अर्जुना, तुला पुनश्च सांगतों कीं, तूं आत्मद्वारां ब्रह्मशक्तीशीं आपलें ऐक्य ओळख, बुद्धिद्वारां तुझीं सर्व कर्में ईश्वराला अर्पण कर आणि फलाशा व कर्माबद्दल अहंकार न ठेवतां या कर्मभूमींत जडदेहानें खुशाल युद्ध कर. ६८७

इति ते ज्ञानमाख्यातं गुह्याद्गुह्यतरं मया ।
विमृश्यैतदशेषेण यथेच्छसि तथा कुरु ॥ १८-६३ । ६८८
कच्चिदेतच्छ्रुतं पार्थ त्वयैकाग्रेण चेतसा ।
कच्चिदज्ञानसंमोहः प्रणष्टस्ते धनंजय ॥ १८-७२ । ६८९

हें मीं तुला अत्यंत गुह्य असें ज्ञान सांगितलें. याचा पूर्ण विचार करून तुला योग्य वाटेल तें तूं आतां कर. अर्जुना, हें तूं सर्व चित्त देऊन ऐकत होतास ना? तुझा मोह आतां तरी नाहींसा झाला का? ६८८-६८९

॥ अर्जुन उवाच ॥

नष्टो मोहः स्मृतिर्लब्धा त्वत्प्रसादान्मयाच्युत ।
स्थितोऽस्मि गतसंदेहः करिष्ये वचनं तव ॥ १८-७३ । ६९०

अर्जुन यानंतर म्हणतो—भगवन्, आपल्या कृपेनें माझा मोह साफ नष्ट झाला, माझा संशयही पार गेला व मला कर्तव्यस्मृति पुन्हा प्राप्त झाली. आतां हा मी युद्धास उठलों पहा. ६९०

॥ श्रीभगवानुवाच ॥

इदं ते नातपस्काय नाभक्ताय कदाचन ।
न चाशुश्रूषवे वाच्यं न च मां योऽभ्यसूयति ॥ १८-६७ । ६९१
य इदं परमं गुह्यं मद्भक्तेष्वभिधास्यति ।
भक्तिं मयि परां कृत्वा मामेवैष्यत्यसंशयः ॥ १८-६८ । ६९२
न च तस्मान्मनुष्येषु कश्चिन्मे प्रियकृत्तमः ।
भविता न च मे तस्मादन्यः प्रियतरो भुवि ॥ १८-६९ । ६९३
अध्येष्यते च य इमं धर्म्यं संवादमावयोः ।
ज्ञानयज्ञेन तेनाहमिष्टः स्यामिति मे मतिः ॥ १८-७० । ६९४

श्रद्धावाननसूयश्च शृणुयादपि यो नरः ।
सोऽपि मुक्तः शुभांल्लोकान् प्राप्नुयात्पुण्यकर्मणाम्।। १८-७१। ६९५

॥ संजय उवाच ॥

इत्यहं वासुदेवस्य पार्थस्य च महात्मनः ।
संवादमिममश्रौषमद्भुतं रोमहर्षणम् ॥ १८-७४ । ६९६
व्यासप्रसादाच्छ्रुतवानेतद्गुह्यमहं परम् ।
योगं योगेश्वरात्कृष्णात्साक्षात्कथयतः स्वयम् ॥ १८-७५ । ६९७
राजन्संस्मृत्य संस्मृत्य संवादमिममद्भुतम् ।
केशवार्जुनयोः पुण्यं हृष्यामि च मुहुर्मुहुः ॥ १८-७६ । ६९८
तच्च संस्मृत्य संस्मृत्य रूपमत्यद्भुतं हरेः ।
विस्मयो मे महान् राजन् हृष्यामि च पुनः पुनः ॥
१८-७७ । ६९९
यत्र योगेश्वरः कृष्णो यत्र पार्थो धनुर्धरः ।
तत्र श्रीर्विजयो भूतिर्ध्रुवा नीतिर्मतिर्मम ॥ १८-७८ । ७००

संजय अखेर सांगतोः—राजा धृतराष्ट्रा ! हा श्रीकृष्णार्जुनांचा अंगावर अगदीं हर्षरोमांच आणणारा व अत्यंत गुह्यमय असा संवाद मी भगवान् व्यासांच्या कृपेनें ऐकूं शकलों. ह्या संवादाचें स्मरण मला वारंवार होत आहे व त्यामुळें मला फार आनंद होत आहे. शिवाय तें भगवान् श्रीकृष्णाचें अत्यंत अद्भुत असें विश्वरूप पाहूनहि मला राहून राहून, पुनः पुनः, अत्यंत आनंद वाटत आहे. आणि, राजा, माझें आतां असे मत बनलें आहे कीं, जिकडे भगवान् श्रीकृष्णासारखा चतुर, तत्त्वज्ञ मुत्सद्दी व जिकडे अर्जुनासारखा महायोद्धा त्या पांडवांच्या पक्षालाच विजयश्री अखेर माळ घालणार.
६९६-७००

हरिः ॐ तत्सत्

**इति रचनान्तरीकृतश्रीमद्भगवद्गीतासूपनिषत्सु० विषादनिरसनयोगो नाम अष्टादशोऽध्यायः ॥ १८ ॥**

**॥ श्रीकृष्णार्पणमस्तु ॥**

## प्रकरण ४ थें

# पुष्पांजलि व पुण्यस्मरण

मात्र गीता ही प्रस्तुत स्वरूपांत असो कीं रचनांतरित स्वरूपांत असो, ती एकहाती असो कीं अनेकहाती असो, ती ईश्वरप्रणित असो कीं मानवप्रणित असो, आणि गीतेचा अभ्यासक पुराणमताभिमानी असो कीं नवमतवादी असो, अगर स्वसंस्कृतीचा असो कीं परसंस्कृतीचा असो; कांहींहि झालें तरी या दिव्य ग्रंथाची अनेक कारणांस्तव मुक्त कंठानें सर्वत्र स्तुति होणें अपरिहार्यच आहे. गीतेच्या नव्याजुन्या भागांबद्दल कितीहि केसफाड करण्यांत विश्लेषक बुद्धीला कृतकृत्यता वाटत असली, तरी आहे या स्वरूपांत श्रीमद्भगवद्गीता आज निदान दीडहजार वर्षांवर अस्तित्वांत असून ती ज्ञान, भक्ति व कर्म यांपैकीं ज्याला जें स्वभावानुरूप रुचेल तें घेण्यास सांगत असतांहि ज्ञानपूर्वक भक्तियुक्त कर्ममार्गाच्या पूर्णोपदेशामृताचें दान या भरतभूमींतील आजवरच्या कोटकोट्यावधी लोकांस करीत आली आहे; आणि यामुळेंच ती हिंदुधर्मग्रंथांतच काय पण अखिल भूलोकिक धर्मग्रंथांत अग्रगण्यता पावली आहे. अर्थात्‌च हा केवळ श्रद्धेचा अगर भोळ्या भावनेचा परिणाम होय असें म्हणण्यांत अर्थ नाहीं. गीता श्रद्धेला अगर भावनेला किंमत देत नाहीं असें नाहीं; परंतु भगवद्गीतांतर्गत श्रद्धेचें व भावनेचें क्षेत्र मर्यादित असून गीतेंतील ज्ञानाचें[1] क्षेत्र त्या सर्वांना व्यापक असें आहे; आणि केवळ या ज्ञानाच्या—सत्यज्ञानाच्या व तत्त्वज्ञानाच्या—आधारावर गीतोपदेशाची उभारणी आहे, म्हणूनच गीतोपदेश टिकाऊ, सनातन आहे असेंच म्हणणें इष्ट आहे. या प्रकारच्या ज्या कांहीं सत्तत्त्वरत्नांचा गीता हा अपूर्व निधि आहे, त्यांचें थोडक्यांत यथामति परीक्षण करण्याच्या प्रयत्नांतच श्रीमद्भगवद्गीतेला शाब्दिक आरती उजळण्यासारखें होणार असल्यामुळें त्या आनंदमहोत्सवांत वाचकांना थोडा वेळ गुंतविल्यास ते रागावणार नाहींत असें मानावयास हरकत नाहीं.

---

१ नहि ज्ञानेन सदृशं०। ज्ञानी त्वात्मैव मे मतः । बुद्धियोगमुपाश्रित्य० ।

श्रीमद्भगवद्गीतेंत वेदान्तमताचा अन्तर्भाव पूर्वींचाच होता कीं मागून झाला याबद्दल पंडितांमध्यें मतभेद असला तरी प्रस्तुत गीतेची तत्त्वज्ञानात्मक भूमिका फारच भरभक्कम आहे यांत शंका नाहीं. विश्व हें ब्रह्मशक्तीचाच व ब्रह्मशक्तीनें अंतर्बाह्य व्याप्त असा आविर्भाव होय,[१] ही ती भूमिका होय. ही भूमिका अद्याप हादरलेली नाहीं व यापुढें हादरण्याचा संभवहि दिसत नसून उलट ती भरभक्कम असल्याचाच प्रत्यय येण्याचा संभव आहे.[२] आणि ही भूमिका जोंपर्यंत भक्कम आहे तोंपर्यंत तीवरच रचलेली इमारत चिरटण्या-कलण्याची देखील भीति नाहीं.

याच मताला अनुसरून या ब्रह्मशक्तीशीं एकरूप असलेला व केवळ सचेतन अचेतन या व्यावहारिक भेदांपैकीं सचेतनांच्या जीवितव्यवहाराच्या दृष्टीनें पृथक् शब्दानें निर्देशिलेला आत्मा हा सर्व विश्वांत, सर्व भूतांच्या ठिकाणीं, एक, अखंड व अविभक्त अशा स्वरूपांत असून त्रिगुणात्मक प्राकृतिक जड घटनांच्या द्वारें त्याचा आविर्भाव मात्र भिन्न घटनानुरूप भिनभिन्न होतो व यामुळेंच व्यवहारांत वस्तुभिन्नत्व व व्यक्तिभिन्नत्व प्रत्ययास येतें, असें भगवद्गीता सांगते.[३]

ही ब्रह्मशक्ति स्वतःमध्यें, स्वतःपासून विश्वाचा उद्भव घडवून आणण्याच्या क्रमांत जो एक अंशमात्र आविर्भाव पावते तो आविर्भाव हिरण्यगर्भ, जीव-भूताप्रकृति, पुरुषोत्तम अगर ईश्वर या संज्ञेनें ज्ञात असून तोच आविर्भाव त्यानंतरची विश्वाची उभारणी, नियमन, संधारणा व विसर्जन घडून आणतो.[४] हा आविर्भाव कांहींसा सगुण असल्यामुळें ती तिच्याच प्राकृतिक घटनाबद्ध अशा अखंडांशरूपी व्यक्तिमात्रांनीं उपासना अगर भक्ति करण्यास पात्र आहे व त्यामुळें त्यांना निर्भयता, साहाय्य व प्रेम यांचा आधार मिळून त्यांना

---

१ अहं सर्वस्य प्रभवो० । निर्गुणं गुणभोक्तृ च । अन्यां प्रकृतिं जीवभूतां० । मम योनिर्महद्ब्रह्म० । मे भिन्ना प्रकृतिरष्टधा० । विष्टभ्याहमिदं० । २ या बाबतचे सर ऑलिव्हर लॉजचे ईथरबद्दल ग्रंथ व आइनस्टाईननें आपल्या "Side-Lights on Relativity" या ग्रंथांत ईथरला दिलेली मान्यता पहा. ३ यथाकाशस्थितो वायुः । यथा प्रकाशयत्येकः० । समं सर्वेषु भूतेषु० । यदा भूतपृथग्भावं । गुणेभ्यश्च परं वेत्ति । ४ पिताहमस्य जगतो । गतिर्भर्ता प्रभुः० ।

त्यांचें ऐहिक व प्रसंगोपात्त कष्टमय जीवित नीतीनें, सुखानें व आनंदानें कंठणें शक्य होतें[१], असें गीता सांगते. हा ईश्वर अज्ञात, अव्यक्त पण सामान्य जनांनीं आपआपल्या अल्प समजुतीनें नाना विचित्र रूपगुणांनीं युक्त असा मानलेलाच ज्या अर्धशिक्षितांना ठाऊक आहे व सबब जे त्याचें खरें रूप जाणूं शकत नाहींत, त्यांच्या अज्ञानाची गीता कींवच करते[२]. आणि हा ईश्वर ज्याची त्याजबद्दल जशी भावना असेल त्याप्रमाणें त्याला प्रत्ययास येतो[३], असें सांगून कोणी कोणत्याहि रूपानें व कोणत्याहि भावानें ईश्वराची उपासना केली तरी ती अखेर एकाच ईश्वराला पावते असें सर्वधर्म—सर्वस्वभाव—संग्राहक मत प्रतिपादन करते.[४] विशेषतः एकदा सन्मार्गावर पाऊल थोडा वेळ पडलें तरीहि मग क्रमाक्रमानें तिकडेच जाण्याची प्रवृत्ति वाढत जाऊन, लवकर अगर उशीरा पण अखेर, अत्यंत पापाचरण करणारालाहि गती मिळते हें गीता अट्टहासानें सांगत आहे.[५] अखंड निरयगतीचें तत्त्व गीतेंत सर्वोच्च मानलेलें नाहीं.[६]

शिवाय हा विश्वव्यापी विश्वनियामक ईश्वर केवळ अव्यक्त, अज्ञात स्थितींतच राहून तेथून सर्व जगाचें नियमन करतो असें नाहीं, तर ज्या वेळीं या जड जगांत विशिष्ट महत्त्वाच्या कारणाकरतां दिव्य शक्तीच्या महात्म्याची मूर्तिमंत रूपांत जरूरी भासते त्या वेळीं आपल्या दिव्य शक्तीनें भूतलावर अवतार घेऊन[७] विश्वपालनाचें कार्य करूं शकतो व त्याशिवायहि हा ईश्वर श्री, सत्ता, सामर्थ्य, सौंदर्य, कला, काव्य, यांनीं युक्त अशा नानारूप विभूतिद्वारां विशेष आविर्भावानें युक्त होऊन नेहमींच जगांत वावरत असतो अशी गीतेची घोषणा आहे.[८] परंतु प्रसंगविशेषीं जगांत आसुरी संपत्तीनें युक्त असलेल्या घटनांचा सुळसुळाट होऊन एकंदरींत संक्षोभ फार माजल्यास ईश्वराला आपलें सर्वभक्षक कालरूप थोडा वेळ प्रगट करून विस्तृत प्रमाणावर संहारकार्यहि घडवून आणावें लागते[९] असें गीता प्रतिपादन करते.

---

१ तेषां नित्याभियुक्तानां० । २ अवजानंति मां मूढाः० । ३ ये यथा मां प्रपद्यन्ते० । ४ येप्यन्यदेवताभक्ता० । ५ अपि चेत्सुदुराचारो० । ६ नहि कल्याणकृत् काश्चित्० । प्रयत्नाद्यतमानस्तु० । ७ परित्राणय साधूनां० । ८ यद्यद्विभूतिमत्सत्वं० श्री । ९ कालोऽस्मि लोकक्षयकृत्० ।

याप्रमाणें बौद्धिक व शुद्ध तात्त्विकदृष्ट्या गीता शुद्धाद्वैतवादी, भावनादृष्ट्या विशिष्टाद्वैतवादी व व्यवहारदृष्ट्या सांख्यद्वैतवादी आहे. शुद्ध जडभौतिक शास्त्रज्ञांना तर या विश्वांत जड जगाशिवाय अन्य कांहीं आहे असें वाटत देखील नाहीं हें देखील गीताकार जाणून आहेत. मात्र गीतेंत कोणता तरी विशिष्ट वाद ग्राह्य आहे अगर त्याज्य आहे असें म्हणणें जसें चुकीचें होईल, त्याचप्रमाणें गीतेंत या सर्व वादांची पंचमेळ खिचडी भरलेली आहे असेंहि म्हणणें चुकीचें होईल. गीता सुटसुटीत मांडणीच्या दृष्टीनें विशिष्ट वादाला चिकटून राहण्याचा पोरकटपणा करीत नाहीं.[1] तर, या अनंत आश्चर्यमय विश्वाचें ज्ञान ज्या मानवग्राह्य भावांनीं होणें शक्य आहे त्या शुद्धाद्वैत, विशिष्टाद्वैत व शुद्धद्वैत या सर्व तत्त्ववादांना द्रष्ट्याच्या कमीअधिक परिपूर्ण दृष्टिकोणाप्रमाणें पृथक् अगर संयुक्त स्थान आहे असें गीतेचें गांभीर्यपूर्वक विधान आहे.

मानवी जीविताच्या व्यवहाराच्या दृष्टीनें गीता ही व्यक्तिवादाचा तीव्र विरोध व निषेध करणारी आहे. गीतेंत निर्ममत्वाचा, निरहंकारत्वाचा, निर्द्वंद्वत्वाचा, निःसंगत्वाचा, निष्कामत्वाचा इतका अट्टहासपूर्वक उपदेश ठिकठिकाणीं केलेला[2] आहे कीं, त्यानंतर व्यक्तीचें व्यक्तित्व म्हणून कांहीं शिल्लक उरतें असें दिसत नाहीं. प्रस्तावनेंत स्पष्ट केल्याप्रमाणेंच जागतिक सर्व व्यवहार प्राकृतिक त्रिगुणांचा[3] आणि तोहि ईश्वरी नियंत्रणाखालीं चाललेला[4], व व्यक्तिभाव हा केवळ जडघटनेच्या अनुषंगानें, अज्ञानामुळें उत्पन्न होणारा, अतएव त्याज्य होय, असेंच गीता सांगते.

भगवद्गीतेची याच अनुषंगानें असलेली कर्माची शिकवण याच धोरणाची आहे. कार्यसिद्धि होण्यास केवळ कर्ता पुरत नाहीं,[5] सबब अर्थात्‌च कर्मफलभोगाची जबाबदारीहि कर्त्यावर तितकीशी नाहीं; आणि निर्ममत्वबुद्धीनें आणि ईश्वरार्पणबुद्धीनें कर्में केल्यास तर कर्मबंध नाहींच नाहीं हें वारंवार सांगण्यांत गीतेचे कित्येक श्लोक खर्ची पडले आहेत. शिवाय अनेक तात्त्विक ग्रंथांपैकीं गीता हीच काय ती उघडउघडपणें कर्मवादी आहे. कर्मवादाचा पुरस्कार गीतेइतका अन्य कोणत्याहि ग्रंथानें केल्याचें दिसत नाहीं आणि

---

१ नान्यदस्तीति वादिनः । २ अहंकारं बलं दर्पं कामं क्रोधं च संश्रिताः । ३ नान्यं गुणेभ्यः कर्तारम्०। ४ ईश्वरः सर्वभूतानां० । ५ पञ्चैतानि महाबाहो० ।

कर्माला याप्रमाणें प्रोत्साहन देतां देतां कर्मफलाच्या चरकांत न सांपडण्याची युक्तिहि गीताच सांगते, आणि म्हणूनच गीतेस कर्मयोगशास्त्र हें सार्थ नांव लोकमान्यांनीं दिलें आहे.

शिवाय गीतेंत ज्या प्रकारच्या कर्मांचा उपदेश आहे तें कर्मधारणाप्रचुर असें आहे. तथापि तमोगुणानें कर्मच्युति न होऊं देणें एवढेंच बचावाचें धोरण गीतेचें आहे. रजोगुणी कर्मप्रेरणा गीता करीत नाहीं. कारण ही प्रेरणा प्राणिमात्राच्या ठिकाणीं स्वाभाविकपणेंच वसत असते. शिवाय शम, दम, अचापल, आत्मविनिग्रह, वगैरे गीतेंतील गुणांची यादी ज्यानें नीट तपासून पाहिली असेल त्याला राजस व अतिरेकी कर्मप्रवृत्तीला आळा घालण्याकडेहि गीता पुष्कळच लक्ष देते असें दिसेल. त्यांतहि ही धारणा जितकी वैयक्तिक आहे त्यापेक्षां ती सामाजिक फार आहे असें सहज दिसून येईल. गीतोपदिष्ट समाजरचना सुसंस्कृत, चातुर्वर्ण्यबद्ध व गुणानुरूप श्रमविभागाधिष्ठित अशी आहे; आणि फलाशा न ठेवतां प्रकृतिधर्मानुरूप ज्यानें त्यानें आपआपलें कार्य करीत रहावें[1] व जनतारूपी जनताजनार्दनाची सेवा करण्यांतच देहपात करावा,[2] म्हणजे देखील मुक्ति मिळते असें गीता सांगते. विशेषतः वैयक्तिक मोक्षाच्याच केवळ मार्गे न लागतां लोकसंग्रहाकरितां निःस्वार्थबुद्धीनें कार्यरत होण्यानेंच मोक्षाचा मार्ग खुला होत असल्याचें जें महत्तत्त्व गीतेंत आहे त्यांत व्यक्ति आणि समाज यांचे परस्पर हितसंबंध अत्यंत निगडित होण्याची शक्यता भरपूर आहे व अशा रीतीनें समाजाचा रथ धिम्या वेगानें चालू ठेवण्यांत गीतेची कुशलता उत्तम रीतीनें प्रत्ययास येते.[3] हेंच श्रीमद्भगवद्गीतांतर्गत समाजशास्त्र होय. आधुनिक पाश्चिमात्य समाजशास्त्रज्ञ बर्नार्ड शॉ यांचा Equality of Income or Status and Diversity of Professions according to Qualifications हा नाना सामाजिक कूटें सोडविण्यास समर्थ असलेला व पृथ्वीवरच स्वर्ग-मोक्ष आणूं पाहणारा उपदेश पुराणकालीन श्रीमद्भगवद्गीतेंतील या समाजधारक उपदेशापेक्षां फारसा वेगळा दिसत नाहीं.

---

१ स्वे स्वे कर्मण्यभिरतः० । २ यतः प्रवृत्तिर्भूतानां० । ३ लोकसंग्रहमेवापि संपश्यन् कर्तुमर्हसि ।

याच प्रकारचा दुसरा एक मुद्दा म्हणजे ऐहिक जीविताकडे पाहण्याच्या गीतेंतील असामान्य दृष्टिकोणाचा. हा दृष्टिकोण म्हणजे एकीकडे संस्पर्शजन्य[१] इंद्रियसुखभोग हे तत्त्वत: दु:खमूलक व दु:खान्तक असल्या-मुळें केवळ त्यांमध्येंच गुरफटून न जातां व दुसरीकडे, स्वत:ची प्राकृतिक[२] देहघटना हीहि महद्ब्रह्मघटनाच होय—अब्रह्मण्यम् असें कांहींच नाहीं—हें ओळखून, मनांतून इंद्रियविषयजप व बाहेरून हठात् इंद्रियदमन असला मिथ्याचार[३] न करतां अगर आसुरी वृत्तीनें अन्त:शरीरस्थ आत्मतत्त्वाला विनाकारण न शिणवितां,[४] वर्णाश्रमविहित शारीर कर्मे[५] ईश्वरार्पणबुद्धीनें व अध्यात्मचित्तानें करावयास कसलीच हरकत नाहीं, ही खूणगांठ मनांत बांधून, आणि सर्व विश्व हें वासुदेवमय आहे हें ओळखून त्या विश्ववासुदेवाचें वर्णाश्रमविहित कर्मद्वारां प्रेमानें आराधन करतांकरतांच जन्ममरणांचे अनेक फेरे घ्यावे लागले तरी ते घेण्यास मोठ्या खुषीनें व निधड्या छातीनें तयार असणें यांतच खऱ्या कसोटीचें महात्मत्व[६] आहे हा—तो दृष्टिकोण—होय. याला विविध मनोरम विश्ववासुदेवाचें सानंद स्वागत—joyous acceptance of the Universe—असें पाश्चिमात्य तत्त्ववेत्यांच्या भाषेंत म्हणतां येईल.

कदाचित् हा मुद्दा इतका निर्विवाद मानला जाणार नाहीं. पण वस्तुस्थिति अशी आहे कीं, हिंदुतत्त्वज्ञानावरील बहुतेक ग्रंथ वाचकाला प्रथम वैराग्यविषाचें चषक पाजून त्याला साक्रेटिसाप्रमाणें मुमुर्षू अगर मुमुक्षु बनावितात व कर्मविन्मुखता, निश्चेष्टता आणि शान्ति यांचा मार्ग दाखवितात. पण श्रीमद्भगवद्गीता याच्या कांहीं उलट कार्य करूं पाहते. वैयक्तिक कर्मफलभोगाच्या बागुलबुवाला भिऊन अर्जुनाच्या नाड्या थंड पडूं लागतांच श्रीकृष्णानें जें गीतामृतपान त्याला दिलें त्यानें तो पुन्हां सचेत होऊन युद्धास तयार झाला. ही गीतकथनाच्या आद्यंताची स्थिति लक्षांत घेतां गीतेचा ऐहिक जीविताकडे पाहण्याचा दृष्टिकोण अगदीं असामान्य आहे व जो आहे तो फारच उत्साहजनक, स्फूर्तिदायक आहे ही गोष्ट पटण्यास अडचण पडूं नये.

---

१ ये हि संस्पर्शजा भोगा:० । २ मम योनिर्महद् ब्रह्म० । ३ कर्मेंद्रियाणि संयम्य० । ४ कर्षयन्त: शरीरस्थं० । ५ शारीरं केवलं कर्म० । ६ बहूनां जन्मनामन्ते० ।

यानंतर गीतेचा एक विशेष म्हणजे गीता ही व्यक्ति आणि विश्व यांच्या दरम्यान एक प्रकारचें संवादित्व अगर समधर्मत्व उत्पन्न करण्याचा अगर प्रस्थापित करण्याचा प्रयत्न करते. विश्वरचना ही अध्यात्मिक, आधिदैविक व आधिभौतिक अशा तीन विशिष्ट पद्धतींची व एकएकांतर्गत व संमिश्र स्वरूपाची आहे व पिंडघटना अगर व्यक्तिघटनाहि पिंडब्रह्मांडन्यायानें त्याच नमुन्याची आहे. परंतु प्राकृतिक घटनाभेदामुळें व्यक्तीवर मोहाचें व अज्ञानाचें पटल आल्यामुळें वारंवार अनेक प्रकारचे अनवस्थाप्रसंग उत्पन्न होतात. अशा प्रसंगीं गीता ही व्यक्तीला स्वतःची त्रिविध[1] घटना समजावून सांगून व त्या त्रिविध घटनेनुरूप[2] ज्ञान, भक्ति व कर्म यांचीं क्षेत्रें व त्यांचे परस्परसंबंध दाखवून देऊन, ज्याप्रमाणें लोहचुंबकाच्या साहाय्यानें साध्या पोलादाच्या तुकड्यांतील अस्ताव्यस्त पडलेल्या लोहमण्यांना व्यक्तिशः चुंबक बनवून त्या सर्वांचा मिळून एक महाचुंबक बनवितात, त्याप्रमाणें सर्व व्यक्तींचा मिळून एक अत्यंत सुसंघटित एकजीव सामष्टिक देह—विराट पुरुष—बनविण्याचा प्रयत्न करिते. हें कार्य अत्यंत महत्त्वाचें गणलें पाहिजे. भगवद्गीतांतर्गत नीतिमत्ताहि अध्यात्मिक अधिष्ठानाची आहे असें लोकमान्यांनीं गीतारहस्यांत जें दर्शविलें आहे तें या दृष्टीनें विचारणीय आहे.

अखेरीस थोडक्यांत असें म्हणतां येईल कीं, ज्ञान, भक्ति व कर्म या तीन संयुक्त अंगांनीं सजलेला गीताधर्म, मानवी स्वभावाची त्रिसंयुक्त घटना लक्षांत घेऊन तदनुसार अत्यंत कुशलतेनें रचलेला अगदीं स्वाभाविक व सबब सर्व मानववंशव्यापी धर्म होय. गीताधर्म हाच अखिल मानवसमाजाच्या गरजा पुऱ्या पाडून त्यांना इहपरलोकीं कल्याणाचा मार्ग दाखविणारा एकमेवाद्वितीयम् असा विश्वधर्म होय हें अगदीं निर्विवाद आहे.

गीतेंत कांहीं पुराणमतमतांतरांची भेसळ असेल; परंतु ती अपरिहार्य व उपेक्षणीय आहे. तत्त्वज्ञान या विषयाचा नाना दृष्टींनीं अभ्यास करणारे प्रो. राधाकृष्ण म्हणतात कीं, कोणाहि तत्त्वज्ञाला पूर्वविचारपरंपरा अजीबात सोडून देऊन अगदीं नवविचारपरंपरा प्रस्थापित करणें शक्य नाहीं.

---

१ इंद्रियाणिपराण्याहुः० । २ आत्मौपम्येन सर्वत्र० ।

गुलाबाच्या फुलाच्या भोंवतीं त्याच्या पूर्वपीठिकेचीं पानेंच काय पण बोचणारे कांटेहि असतात. परंतु गुलाबाचें फूल म्हणजे पानें नव्हेत व कांटे तर नव्हेतच नव्हेत. याच दृष्टीनें पाहतां गीतेंतील पुराणमतनिर्देश कसाहि असो गीतेचा परमोच्च विकास व उत्तुंगता किती आहे याकडे पाहूं जातां ती मेरु-शिखराप्रमाणें डोळे दिपवून टाकणाऱ्या ज्ञानसूर्याशीं एकरूप होण्याइतकी उच्च व प्रचंड आहे असें मान्य केल्याशिवाय गत्यंतर नाहीं.

मात्र, या असल्या मोडक्यातोडक्या शब्दांनीं श्रीमद्भगवद्गीतेची करावयाची ही आरती श्रीमद्भगवद्गीतेचें गुणगायन पूर्णपणें करूं शकेल असा हव्यास अगर आकांक्षा कां धरावी ? भगवद्गीतेची संपूर्ण स्तुति ही प्रस्तुत लेखकाच्या अगदीं आवांक्याबाहेरची आहे. सबब, अखेर, अत्यंत नम्र भावानें एवढेंच म्हणावयाचें कीं, श्रीभगवान् कृष्णासारख्या महापुरुषानें, ईश्वररूप दिव्य द्रष्टयानें, व ब्रह्मस्वरूपज्ञात्यानें जगाच्या कल्याणाकरतां ज्या गीतेची या भारतभूमींत प्रतिष्ठापना केली त्या श्रीमद्भगवद्गीतेचा व तिच्याप्रमाणें त्या दिव्यरूप भगवान् श्रीकृष्णाचा जय असो! विजय असो !! त्रिवार जय असो !!!

ॐतत्सद्ब्रह्मार्पणमस्तु

# पुण्यस्मरण

श्रीमद्भगवद्गीतेंतील सारभूत श्लोक वेगळे काढून त्यांची लघुगीता बनविण्याचा प्रयत्न अनेक लेखकांनीं केलेला आहे. परंतु गीतेंतील तत्त्वज्ञान व व्यवहारोपदेश हीं दोन्ही इतकीं उच्च आहेत कीं, त्यांचें सांगोपांग विवरण केल्याविना गीतेचा मथितार्थ सांगणेंच शक्य नाहीं. गीतेंत भरताड अगर बताणा असा फारच थोडा आहे. प्रसिद्ध जर्मन शास्त्रज्ञ आइन्स्टाईन हे नुकतेंच अमेरिकेस गेले असतां तेथून परत निघतांना त्यांना बोटीवर पोहोंचविण्यास आलेल्या लोकांनीं त्यांस त्यांच्या सापेक्षतासिद्धांताचें रहस्य आपणांस दोनतीन मिनिटांत थोडक्यांत सांगण्यास विनंति केली. आइन्स्टाईननें त्यांच्या या विनंतीस दिलेलें उत्तर एवढेंच होतें कीं, बाबांनो! या कृत्यास मला दोनतीन मिनिटें पुरणार नाहींत तर निदान दोनतीन वर्षें लागतील! अशांतलाच कांहींसा प्रकार भगवद्गीतेचा आहे. श्रीमद्भगवद्गीता थोडक्यांत सांगून कांहीं न कळण्यासारखी आहे. तथापि केवळ श्रीमद्भगवद्गीतोपदेशाचें प्रतिक्षण स्मरणीय रहस्य म्हणून एकादें आद्य महत्त्वाचें व सारभूत असें विधान निवडून काढावयाचें झाल्यास तें पूर्वींच दर्शविलेलें

मयि सर्वाणि कर्माणि संन्यस्याध्यात्मचेतसा ।
निराशीर्निर्ममो भूत्वा युद्धस्य विगतज्वरः ॥

हें होय.

---

# परिशिष्ट अ

मद्रासच्या ७४५ श्लोकी गीतेंत प्रस्तुत गीतेपेक्षां कमीअधिक असलेले श्लोकः–

पुढील श्लोक प्रस्तुत गीतेंत असलेले मद्रासी गीतेंत वगळले आहेत.

अध्याय १ ला, श्लोकानुक्रमांकः–४, ५, ६, ७, ८, ९, ३२, ३३, ३४, ३५, ३६, ३७, ३८, ३९, ४०, ४१, ४२, ४३, ४४, आणि ४६. एकूण २०

अध्याय २ रा, श्लोकानुक्रमांक १, ४, ८, व ९. एकूण ४

अध्याय ३ रा, ............२. एकूण १

......४ था, ............४. एकूण १

......६ वा, ..........३८. एकूण १

.....११ वा, १९, २०, २२, २३, २४, २५, २६, २७, २९, ३०, ३१ व ३५. एकूण १२

एकूण कमी ३९

महाभारताच्या पुढील अनेक पर्वांतील श्लोक या गीतेस नवीन जोडले आहेतः—

| | |
|---|---|
| मद्रासी गीतेचा अध्याय १ला यांत भीष्मपर्व, अध्याय २३पैकीं श्लोक | २४ |
| म० गी०चा अध्याय २रा यांत अनुशासनपर्व, अध्याय ४८पैकीं श्लोक | २२ |
| म० गी०चा अध्याय ७ वा यांत भीष्मपर्वांतील श्लोक | १ |
| म० गी०चा अध्याय २० वा यांत उद्योगपर्व अध्याय ४२ पैकीं श्लोक ३ व ४६ पैकीं श्लोक ७ मिळून | १० |
| म० गी० अ० ३१ वा यांत श्लोक | १ |
| म० गी० अ० २३ वा यांत शान्तिपर्वापैकीं श्लोक | २ |
| म० गी० अ० २६ यांत भीष्मपर्व, अध्याय ६५ पैकीं श्लोक | २४ |
| | एकूण ८४ |

# परिशिष्ट आ

## फरुखाबाद येथें एका ब्राह्मणाच्या घरीं सांपडलेल्या ताम्रपटावर खोदलेल्या ७० श्लोकी गीतेची श्लोकसूचि

अर्जुन उवाच

१–२८ पूर्वार्ध

१–३१ उत्तरार्ध

१–३२ पूर्वार्ध

१–४६ पूर्ण

श्रीभगवानुवाच

२—३ पूर्ण

२–११

२–१६

२–१८

२–२८

२–३१ उत्तरार्ध

२–३७

२–४८

२–५३ उत्तरार्ध

२–५५

२–५६

२–५८

२–६९

३–११

३–१३

३–३५

४—५

४––७

४––९

४–१४ पूर्वार्ध

४–१८

४–२२

४–२८

४–३३ उत्तरार्ध

४–३४ पूर्वार्ध

अर्जुन उवाच

५—१ उत्तरार्ध

श्रीभगवानुवाच

५—२

५––६ उत्तरार्ध

५––७

६—५

६–१०

६–१३

६–१९ पूर्वार्ध

६–३२

---

६–३०

७—४

७—५ उत्तरार्ध

७—६ उत्तरार्ध

७––७ चतुर्थपादहीन

७—८ उत्तरार्ध
७—९ उत्तरार्ध
७—१० पूर्वार्ध
७—१६
७—१८ पूर्वार्ध
७—१९ तृतीयचरण
७—२९
८—३ चतुर्थपादहीन
१५—१६
१५—१८
८—१२

---

८—५
८—७ पूर्वार्ध
९—१
९—१६
९—१७ उत्तरार्ध
९—२७ स्फुरणानामहं ब्रह्मा
१०—२५ चतुर्थपाद
चरण
१०—३१—३
१०—२६—१
१०—३३—१
१०—३०—४
१०—३०—३
वानराणां च मारुतिः
नराणां नराधिपमस्मि
२०—२१—१
१०—२९—३

१०—२६—३
१०—२३—१
१०—२२—४
१०—३०—१
१०—३१—२
१०—३७ पूर्वार्ध
१०—४०
अर्जुन उवाच
११—३ उत्तरार्ध
श्रीभगवानुवाच
११—५
११—८ तृतीयपादहीन
अर्जुन उवाच
११—२८
११—२९
११—३१—१
श्रीभगवानुवाच
११—३०—२
अर्जुन उवाच
११—३९—३
११—४०—१
श्रीभगवानुवाच
११—५३
११—५५
१३—२२
१३—३२
१३—३३
१४—६

| | |
|---|---|
| १४–१८ | १४–२६ |
| १४–२४ | १८–६८ |
| १४–२५ | अर्जुन उवाच |
| २–४५ पूर्वार्ध | १८–७३ |

---

# परिशिष्ट इ

फरुखाबादच्या प्रतींतील श्लोकांपेक्षां बालीबेटांतील प्रतींत अधिक असलेले श्लोक

| | अध्याय | श्लोकसंख्या |
|---|---|---|
| देहितोऽनोस्मिन् | २–१३ | १ |
| परित्राणाय साधूनां | ४–८ | $\frac{1}{2}$ |
| य एनं वेत्ति हंतारं | २–१६ | १ |
| रसोऽहमप्सु कौन्तेय | ७–८ | $\frac{1}{2}$ |
| पुण्यो गंधः पृथिव्यां च० } तपश्चास्मि तपस्विषु | ७–९ | $\frac{3}{4}$ |
| बुद्धिर्बुद्धिमतामस्मि तेजस्तेजस्विनामहं | ७–१० | $\frac{1}{2}$ |
| बलं बलवतां चाहं | ७–११ | $\frac{1}{4}$ |
| मय्यार्पित मनोबुद्धिमामेवैष्यस्य० | ८–७ | $\frac{1}{2}$ |
| विभूतियोगांतील श्लोक | | ४$\frac{1}{2}$ |
| | एकंदर श्लोक | ९$\frac{1}{2}$ |

बालीच्या प्रतींत नसलेले श्लोक

| | | |
|---|---|---|
| नष्टो मोहस्मृतिः | १८–७३ | १ |
| अव्यक्तादीनि | २–२८ | १ |
| त्रैगुण्यविषयावेदा | २–४५ | $\frac{1}{2}$ |
| योगस्थः कुरु कर्माणि | २–४८ | १ |

| | | |
|---|---|---|
| यच्छ्रेय एतयोरेकं | ५– १ | १/२ |
| अक्षरं ब्रह्मपरमं | ८– ३ | १ |
| उदाराः सर्व एवैते | ७–१८ | १/२ |
| द्वाविमौ पुरुषौ लोके | १५–१६ | १ |
| उपद्रष्टानुमंता च | १३–२२ | १ |

हस्तलिखित व छापील अशा दोन्ही प्रतींत नसलेल्या विभूतिः–

१ अहमात्मा गुडाकेश ( १०–२० )

मरीचिर्मरुतामस्मि । वेदानां सामवेदोस्मि । देवानामस्मि वासवः ।
इंद्रियाणां मनश्चास्मि । वसूनां पावकश्चास्मि । पुरोधसां च मुख्यं मा ।
सेनानीनां स्कंदः । सरसां सागरः । गिराम् एकाक्षरम् ।
जपयज्ञः । कामधुक् । अनंतः नागानां । कालः कलयतामहम् ।
पवनः पवतां । स्रोतसां जान्हवी ।

२ सर्गाणामादिरन्तश्च द्वंद्वः सामासिकस्य च[१६] ।

३ अहमेवाक्षयः कालो धाताहं विश्वतो मुखः ।

४ मृत्युः सर्वहरश्चाहं उद्भवश्च भविष्यतां ।

५ कीर्तिः श्रीर्वाक्च नारीणां ।

६ यच्चापि सर्वभूतानां बीजं ॥

बृहत्साम[१७] तथासाम्नां गायत्री[१८] छंदसां ।
द्यूतं छलयतां[१९] । तेजः[२०] तेजस्विनां ।
जयोस्मि[२१] । व्यवसायोस्मि[२२] । सत्त्वं[२३] सत्त्ववतां ।
दण्डो[२४] दमयतां । नीतिः[२५] जिगीषतां । ज्ञानं ज्ञानवतां । मौनं[२६] गुह्यानां । ज्ञानं ज्ञानवतां ।

याप्रमाणें १८ हस्तलिखित प्रतींत, १८ मुद्रित प्रतींत व २७ नवीन भरती केलेल्या मिळून ६३ व शिवाय वर ज्यांच्याजवळ १ ते ६ मोठे आंकडे दिले आहेत त्या श्लोकांतील विभूति.

---

# परिशिष्ट ई

जर्मन पंडित गॉर्बे याच्या मतें गीतेंत मागाहून घुसडून दिलेले श्लोकः—

| अध्याय | श्लोक | एकूण | विषयाचें सामान्य स्वरूप |
|---|---|---|---|
| १ | १ ते १९ | १९ | गीता भारतांतून पृथक् करतांना विषय-प्रवेशाच्या सोयीसाठीं बनविलेले |
| २ | १७ | १ | वेदान्तमताचा प्रक्षेप |
| २ | ७२ | १ | ,, ,, |
| ३ | ९ ते १८ | १० | मीमांसामतप्रक्षेप |
| ३ | २३ | १ | अध्याय ४ श्लोक ११ चा केवळ अनुवादक |
| ४ | २४ | १ | वेदान्तमतप्रक्षेप |
| ४ | ३१ व ३२ | २ | ,, |
| ४ | ३४ | १ | गुरुसेवेची परंपरा राखण्याकरितां रचलेला प्रक्षेप |
| ४ | ३५ | १ | वेदान्तमतप्रक्षेप |
| ५ | ६, ७, १०, १६ ते २२, २४ ते २६ | १३ | वेदान्तमत प्रक्षेप |
| ६ | २७ ते ३२ | ६ | ,, |
| ७ | ७ ते ११, १४,१५, १९, २५,२६,२९,३० | १२ | ,, |
| ८ | १ ते ४, २० ते २८ | १३ | मृत्यूच्या काळाबद्दलचे वेदान्त आणि ब्राह्मण मतांचे प्रक्षेप |
| ९ | १ ते ६ | ६ | |
| ९ | १६ ते १९ | ४ | सर्वेश्वरवादी मताचे प्रक्षेप |

| अ. | श्लोक | एकूण | विषयाचें सामान्य स्वरूप |
|---|---|---|---|
| ९ | २९ | १ | समत्व व प्रियत्व यांतील विरोधाभासाचा प्रक्षेप |
| १० | १२ ते ४२ | ३१ | वेदान्तमतप्रक्षेप |
| ११ | ७, १३, १५, १६, १८ व १९ | ६ | सर्वेश्वरवादी मताचे प्रक्षेप |
| ११ | ३७ ते ४० | ४ | वेदान्तमताचे प्रक्षेप |
| १३ | २ | १ | ,, |
| | ४ | १ | यांतील उपनिषदांचा उल्लेख एकंदर सांख्यविवेचनपद्धतीशीं जुळत नाहीं. सबब प्रक्षिप्त. |
| १३ | १२ ते १८<br>२७ ते २८<br>३० ते ३३ | १३ | वेदान्तमताचे प्रक्षेप |
| १५ | १२ ते १५ | ४ | वेदान्तमतप्रक्षेप; हा आनुपूर्व्य बिघडवितो. |
| १७ | २३ ते २८ | ६ | ॐच्या उपयोगाबद्दल मागाहून घुसडलेला भाग. |
| १८ | ४५ ते ४६ | २ | वेदान्तमतप्रक्षेप |
| १८ | ५० ते ५४ | ५ | ,, |
| १८ | ७४ ते ७८ | ५ | भारतांत गीता घुसडून देण्याकरतां रचिलेला संजयकृत उपसंहारप्रक्षेप. |

एकूण १७०

# परिशिष्ट उ

श्रीमद्भगवद्गीतांतर्गत उपनिषदातीत वैशिष्ट्यें.

श्रीमद्भगवद्गीता व उपनिषदें यांचा परस्पर संबंध दाखविण्याकरतां या दोन्ही ग्रंथांतून साधारणपणें सांपडणाऱ्या विषयांचा उपयोग केला जातो. परंतु जीं तत्त्वें उपनिषदांत आढळत नाहींत पण गीतेंत अढळतात व ज्यांमुळेंच

गीतेला महत्त्व व गीतोपनिषत्त्व आलें आहे, त्यांचा संग्रह पृथकपणें केल्यास उपयुक्त होईल असें वाटल्यावरून तो येथें केला आहे:—

१ (अ) प्रकृतिस्त्वां नियोक्ष्यति ।
(आ) स्वभावजेन कौंतेय निबद्धः स्वेन कर्मणा ।
कर्तुं नेच्छसि यन्मोहात् करिष्यस्यवशोऽपि तत् ।

२ (अ) कर्मेंद्रियाणि संयम्य य आस्ते मनसा स्मरन् ।
इंद्रियार्थान् विमूढात्मा मिथ्याचारः स उच्यते ।
(आ) यस्त्विंद्रियाणि मनसा नियम्यारभतेऽर्जुन ।
कर्मेंद्रियैः कर्मयोगमसक्तः स विशिष्यते ।

३ (अ) यस्य नाहं कृतो भावो बुद्धिर्यस्य न लिप्यते ।
हत्वाऽपि स इमाँल्लोकान्न हन्ति न निबध्यते ।
(आ) कर्मभिः न स बद्धयते ।
(इ) त्यक्त्वा कर्मफलासंगं नित्यतृप्तो निराश्रयः ।
कर्मण्यभिप्रवृत्तोऽपि नैव किंचित् करोति सः ।
(ई) ब्रह्मण्याध्याय कर्माणि संगं त्यक्त्वा करोति यः ।
लिप्यते न स पापेन पद्मपत्रमिवांभसा ।
(उ) कर्मण्येवाधिकारस्ते मा फलेषु कदाचन ।
(ऊ) समसिद्धावसिद्धौ च कृत्वापि न निबध्यते ।

(अ) कुरु कर्मैव तस्मात्त्वं पूर्वैः पूर्वतरं कृतं ।
(आ) कर्म ब्रह्मोद्भवं विद्धि ।
(इ) एवं प्रवर्तितं चक्रं नानुवर्तयतीह यः ।
अघायुरिंद्रियारामो मोघं पार्थः स जीवति ।
(ई) यज्ञदानतपः कर्म न त्याज्यं कार्यमेव तत् ।
(उ) यतः प्रवृत्तिर्भूतांना येन सर्वमिदं तम् ।
स्वकर्मणा तमभ्यर्च्य सिद्धिं विन्दति मानवः ।

५ (अ) लोकसंग्रहमेवापि संपश्यन्कर्तुमर्हसि ।
(आ) न बुद्धिभेदं जनयेत् अज्ञानां कर्मसंगिनाम् ।
जोषयेत्सर्वकर्माणि विद्वान् युक्तः समाचरन् ।

६ ( अ ) संन्यासः कर्मयोगश्च निःश्रेयसकरावुभौ ।
तयोस्तु कर्मसंन्यासात्कर्म योगो विशिष्यते ।
( आ ) तपस्विभ्योऽधिको योगी ज्ञानिभ्योऽपि मतोधिकः ।
कर्मिभ्यश्चाधिको योगी ।

७ नादत्ते कस्यचित्पापं न चैव सुकृतं विभुः ।
अज्ञानेनावृतं ज्ञानं तेन मुह्यंति जन्तवः ।

८ ईश्वरः सर्वभूतानां हृद्देशेऽर्जुन तिष्ठति ।
भ्रामयन् सर्वभूतानि यंत्रारूढानि मायया ।

९ कर्षयन्तः शरीरस्थं भूतग्राममचेतसः ।
मां चैवान्तःशरीरस्थं०

१० श्रेयान स्वधर्मो विगुणः परधर्मात्स्वनुष्ठितात् ।
स्वधर्मे निधनं श्रेयः परधर्मो भयावहः ।

११ चांतुर्वर्ण्यं मया सृष्टं गुणकर्मविभागशः ।
तस्य कर्तारमपि मां विद्ध्यकर्तारमव्ययम् ।

१२ ( अ ) यदायदाहि धर्मस्य ग्लानिर्भवति भारत ।
अभ्युत्थानमधर्मस्य तदात्मानं सृजाम्यहम् ।
( आ ) परित्राणाय साधूनां विनाशाय च दुष्कृताम् ।
धर्मसंस्थापनार्थाय संभवामि युगेयुगे ।

१३ ( अ ) ये यथा मां प्रपद्यन्ते तान्स्तथैव भजाम्यहम् ।
( आ ) यो यच्छ्रद्धः स एव सः ।

१४ मम योनिर्महद् ब्रह्म तस्मिन गर्भं दधाम्यहम् ।

१५ प्रकृतेः क्रियमाणानि गुणैः कर्माणि सर्वशः ।

१६ नान्यं गुणेभ्यः कर्तारं यदा द्रष्टानुपश्यति ।

१८ यस्तु कर्मफलत्यागी स त्यागीत्यभिधीयते ।

---

*

# परिशिष्ट ऊ

## चरणसूचि

मूलगीतेंतील त्याचप्रमाणें रचनांतरीकृत गीतेंतील श्लोकारंभ, श्लोकोत्तरार्धारंभ आणि तद्व्यतिरिक्त बहुतेक सर्व संपूर्ण विधानें, यांच्या वर्णकोशक्रमानुक्रमें पुढील सूचि रचिली आहे.

| वर्णकोशानुक्रमें चरण | श्लोकस्थान: मूलगीतेंतील अ.श्लोक | श्लोकस्थान: रचनांतरांतील श्लोक | वर्णकोशानुक्रमें चरण | श्लोकस्थान: मूलगीतेंतील अ.श्लोक | श्लोकस्थान: रचनांतरांतील श्लोक |
|---|---|---|---|---|---|
| अ | | | अथ केन० | ३—३६ | ५७६ |
| अकर्मणश्च० | ४—१७ | ५५५ | अथ चित्तं० | १२—९ | ४११ |
| अकीर्तिं चापि० | २—३४ | ५३ | अथ चेत्त्व० | १८—५८ | ६८४ |
| अक्षरं ब्रह्म० | ८—३ | १२६ | अथ चेत्त्व० | २—३३ | ५६ |
| अक्षराणाम० | १०—३३ | ३३४ | अथ चैनं० | २—२६ | ७६ |
| अग्निर्ज्योतिः० | ८—२४ | २४५ | अथवा बहु० | १०—४२ | ३४४ |
| अघायुरिं० | ३—१६ | ५५८ | अथवा योगि० | ६—४२ | २५४ |
| अच्छेद्योय० | २—२४ | ६९ | अथ व्यवस्थि० | १—२० | २० |
| अजानता० | ११—४१ | ३८९ | अथैतदप्य० | १२—११ | ४१३ |
| अजो नित्यः० | २—२० | ६६ | अदृष्टपूर्वं० | ११—४५ | ३९२ |
| अजोऽपि स० | ४—६ | १८६ | अदेशकाले० | १७—२२ | ५०२ |
| अज्ञश्चाश्र० | ४—४० | १५० | अद्वेष्टा सर्व० | १२—१३ | ४१७ |
| अज्ञानेना० | ५—१५ | १५८ | अधर्मं धर्म० | १८—३२ | ५१८ |
| अज्ञानं चाभि० | १६—४ | ५३२ | अधर्माभि० | १—४१ | ४१ |
| अतत्त्वार्थ० | १८—२२ | ५०८ | अधश्च मूला० | १५—२ | ४५० |
| अतोऽस्मि० | १५—१८ | १८५ | अधश्चोर्ध्वं० | १५—२ | ४५० |
| अत्येति तत्० | ८—२८ | २६६ | अधिभूतं० | ८—४ | १२६ |
| अत्र शूरा० | १—४ | ४ | अधियज्ञः | ८—२ | १२५ |

---